# ब त्ता शी

आणि

## अि त र क था

प्र ल्हा द् के श व अ त्रे



प्रकाशन क्रमांक १०८

ग. पा. प र चु रे प्र का श न म न्दि र, मु ब अी ४

मल्य साडेतीन रुपये

प्रकाशक :
**ग. पां. परचुरे**
'ग. पा. परचुरे प्रकाशन मन्दिर'
गोरेगावकर चाळ क्र. २
गिरगाव, मुंबअी ४

आवृत्ति पहिली
१५।८।१९५४



सजावट
**रघुवीर मुळगांवकर**

मुद्रक :
**वि. पु. भागवत**
मौज प्रिन्टिंग ब्यूरो
खटाववाडी, गिरगाव
मुंबअी ४



माझे बालमित्र

**श्रीमंत सरदार**

**बाळासाहेब पुरंदरे**

सासवड

**ह्यांना हा कथासंग्रह**

**सप्रेम अर्पण**



माझ्या गोष्टीचा हा चौथा संग्रह. पहिली गोष्ट 'बत्ताशी' ही मला गी द मॉपसॉच्या 'बॉल ऑफ फॅट' वरून सुचली. 'कार्लाइलची बायको' ही गोष्ट मी त्याच्या अनेक इंग्रजी चरित्रावरून तयार केली. 'बहिरससाणा' आणि 'तुळशीची कुडी' हे बोकॅशिओच्या सुविख्यात गोष्टींचे अनुवाद होत. 'महात्मा कपोत' हा 'पंचतंत्रा' वरून घेतला. 'पिलभट स्वर्गाला कसा गेला?' आणि 'जावईबापू' ह्या शेवटच्या दोन गोष्टी गुजराती भाषेतल्या लोककथावरून तयार केल्या. बाकीच्या गोष्टी स्वतंत्र आहेत.

१३ ऑगस्ट १९५४

**प्रल्हाद केशव अत्रे**

# अनुक्रम

# प्र. के. अत्रे–वाङ्मय

**नाटकें**

साष्टांग नमस्कार

घराबाहेर

उद्यांचा संसार

भ्रमाचा भोपळा

मी उभा आहे

पराचा कावळा

वंदे भारतम्

पाणीग्रहण

जग काय म्हणेल ?

एकच प्याला

कवडीचुंबक

गुरुदक्षणा

वीरवचन

वसंतसेना

ब्रह्मचारी

**काव्य**

झेंडूचीं फुलें

गीतगंगा

**कथासंग्रह**

बत्ताशी आणि इतर कथा

ब्रँडीची बाटली

साखरपुडा

वामकुक्षी

**अितर**

हशा आणि टाळ्या

मी कसा झालो ?

हास्यकथा

पत्रकार अत्रे

चांगुणा (कादंबरी)

ललितवाङ्मय

अत्रे उवाच

स्वराज्याचा अरुणोदय

निशिगंध

दूर्वा आणि फुलें

# १ बत्ताशी

लाहोरच्या एका हिंदू वेश्येची ही गोष्ट आहे. तिचें खरें नाव विंदा. पण लोक तिला 'बत्ताशी' (हिंदीत पताशी) ह्या नावानें ओळखत. तिचा गौरवर्णाचा नि लाल ओठाचा हसतमुख चेहरा बघून माणूस बत्ताशासारखा विरघळून जात असे म्हणून म्हणा किंवा तिचें मजुळ आवाजातलें गोड बोलणे बत्ताशासारखें मिष्ठास वाटत होते म्हणून म्हणा, कुणी तरी तिला बत्ताशी म्हणावयास एकदा सुरुवात केली असेल झालें. अन् मग पुढे तिचें तेंच नाव लोकप्रिय झालें.

अनारकली रस्त्यावरल्या एका प्रसिद्ध चौकात तिचें तीनमजली घर होते. मोठमोठ्या राजा-महाराजाच्या किंवा जमीनदार-जहागीरदाराच्या मोटरी हमेश तिच्या घरासमोर तासन् तास उभ्या असत. हिरव्या चिकाच्या पडद्यानीं आणि काचेच्या रंगीबेरंगी मण्याच्या माळानी तिच्या माडीच्या खिडक्या नेहमीं झाकलेल्या असत. आणि त्यामधून अस्पष्टपणे उमटणारे सारंगीचे मधुर आलाप किंवा तबल्याच्या ठेक्यावर वाजणारा पैंजणाचा झंकार रस्त्यावरून जाणाऱ्या-येणाऱ्याच्या कानावर पडला कीं 'हीच ती बत्ताशीची हवेली' अशा ओळखीनें त्याचा पाय क्षणभर तेथें रेंगाळल्यावाचून आणि सस्मित मस्तकें वर उचावल्या-वाचून राहात नसत.

लाहोरच्या सर्व श्रीमतीचें आणि विलासाचें प्रदर्शनच जणु काहीं अनारकली रस्त्यावर भरलें होते म्हणानात. पंजाबातल्या सर्व लावण्याची आणि रंगेलपणाची रहदारी सकाळ-संध्याकाळ त्या रस्त्यावरून ख्यालीखुशालीनें वहात असे. ऐषआरामाच्या शोधासाठीं किंवा पैशाची उधळपट्टी करावयासाठी बाहेर पडलेल्या तरुण श्रीमताची अनारकली म्हणजे एक मोठी उतारपेठच होती. पण सत्तेचाळीस सालच्या ऑगस्ट महिन्यामध्यें अनारकलीच्या या शोभेला आणि सौंदर्याला एकदम ग्रहण लागले आणि त्यावर स्मशानाची कळा पसरली.

पधरा ऑगस्टला आता दोनचार दिवसच अवकाश राहिला होता. देशाची

फाळणी होऊन भारताला आणि पाकिस्तानला स्वातंत्र्य मिळणार होते. लाहोरचा समावेश पाकिस्तानमध्यें झाला होता. अनारकली रस्त्यावर पिढ्यान् पिढ्या धदा करणारे मोठमोठे हिंदू आणि शीख व्यापारी आपापल्या पेढ्या आणि दुकानें बंद करून चिताक्रात चेहऱ्यानीं आपल्या भीपण भवितव्याची वाट पाहात बसले होते. वेश्याच्या आणि नायकिणींच्या विलासी माड्याच्या खिडक्या हळूहळू बंद होऊं लागल्या होत्या आणि रात्रीच्या वेळी त्यामधून बाहेर येणारा विजेचा झगझगाट आणि नृत्यसगीताचा सुरेल किलबिलाट आस्ते आस्ते मदावू लागला होता. रस्त्यावर ठिकठिकाणी अर्धचद्राकित पाकिस्तानी झेडे आणि निशाणें उभीं राहून पंधरा ऑगस्टला येणाऱ्या स्वातत्र्याच्या स्वागतासाठीं गर्दी करूं लागलीं होतीं.

पाकिस्तानमधून हिंदूना नि शीखाना यापुढें 'अर्धचंद्र' मिळणार असल्याची पुरेशी इशारत तेवढ्यानें जणु काहीं त्याना मिळणार नाहीं, म्हणून रस्त्यावरून आनदानें बेहोप होऊन चाललेल्या 'मुस्लीम लीग'च्या स्वयंसेवकाचीं टोळकीं त्याच्या मोठमोठ्या दुकानापुढें आणि मकाणापुढें थाबून 'पाकिस्तान झिदाबाद'च्या आणि 'अल्ला हो अकबर'च्या गगनभेदी घोपणा करून वाट चालत असलेल्या नव्या इस्लामी राजवटीची नादी पुकारीत होतीं. दारे बद करून भयभीत मुद्रेनें आत बसलेल्या सर्व हिदू आणि शीख स्त्री-पुरुषांचा त्या घोषणानीं थरकाप उडत असे. एकेक क्षण किंवा तास जसजसा उलटूं लागला, तसतसा कृतात कालपुरुप आपली राक्षसी पावले दाणदाण वाजवीत जवळ जवळ येत चालला असा त्याना भास होऊं लागला.

बारा ऑगस्टपासून तर सर्वांच्या मुळी झोपाच उडाल्या! तेरा ऑगस्टला पहाटे एक भयकर बातमी उठली अन् ती वणव्यासारखी चहूकडे पसरत गेली कीं, 'स्वातंत्र्यदिना'च्या दिवशीं लाहोरातील सर्व हिंदूंची अन् शीखांची कत्तल होणार आहे. मग मात्र सर्वांच्या हृदयाचा ठाव सुटला. आणि धीराचे बाध फुटले. जो तो आपल्या मुलामाणसासह बरोबर जेवढी मालमत्ता नेता येईल तेवढी घेऊन लाहोरातून भारताच्या सरहद्दीकडे धावत सुटला.

लाहोरापासून भारताची सरहद्द तशी काहीं फार दूर नव्हती. पन्नास मैलाच्या आंत-बाहेर. पण एवढें अंतर तरी कसें तोडायचें? आगगाड्या तुडुब भरून गेल्या. स्टेशनाच्या आवारात पाऊल ठेवायला जागा राहिली नाहीं. गाड्या, टांगे अन् मोटारी ह्यानीं एकेका दिवसात एकेका वर्षाची कमाई करून घेतली.

पण एवढेंही करून शेकडों लोकाना वाहनें मिळाली नाहींत. देवाचें नाव घेऊन सरळ समोरचा रस्ता पायानीं तुडवीत ते निघाले. लाहोरापासून जेवढें दूर आणि भारतीय सरहद्दीच्या जेवढें जवळ, तेवढी आपल्या सुरक्षिततेची शाश्वती जास्त अशी सर्वांची समजूत होती.

प्राणापुढें पैशाची काय किमत? मोठमोठ्या सावकारानीं आणि धनिकानी मृत्यूच्या भयानें लक्षावधि रुपयाच्या आपल्या मालमत्तेवर आणि व्यापारावर तुळशीपत्र ठेवले. मोटरीखेरीज ज्यानी रस्त्यावर कधी पाऊल टाकलें नाहीं असे लक्ष्मीपुत्र अनवाणी पायानी शेतातून आणि काट्याकुट्यातून ठेचाळत चालू लागले. भयभीत मानवतेच्या असहायतेचें असें भेसूर आणि हृदयद्रावक चित्र जगाच्या इतिहासात क्वचितच पाहावयाला सापडेल.

बत्ताशीला लाहोर सोडून जावयाची वास्तविक काहींच जरूर नव्हती. बोलून-चालून ती वेश्या. तिला कसली जात अन् धर्म? तिच्या श्रीमत आश्रयदात्यात सर्व धर्मांचे लोक होते. किंबहुना आपण हिंदू आहोत ह्याची आठवण तरी तिला कधी होती कीं नाहीं ह्याची शंका आहे. देशाची फाळणी झाली अन् लाहोर पाकिस्तानात गेले, ह्या गोष्टीशी तिचा काय संबध होता? पण 'पाकिस्तान'चें स्वप्न साकार होणार असल्याच्या वेडाने काहीं काहीं मुसलमानाचीं डोकीं इतकीं फिरून गेली कीं, कुठे काय करावयाचें अन् कसें वागावयाचें ह्याचा सुमारच त्याना राहिला नाहीं.

बत्ताशीच्या शयनमदिरात मुरलीधराची एक सुंदर संगमरवरी मूर्ति होती. राजस्थानमधल्या एका महाराजानीं तिच्या आजीला प्रेमाची भेट म्हणून ती दिली होती. जवळ जवळ तीन पिढ्या ती तेथें वास्तव्य करून होती म्हणानात. जून का जुलै महिन्यात एक दिवस लखनौचा कोणी तरी एक श्रीमत मुसलमान व्यापारी बत्ताशीकडे आला. तिच्या पलगाशेजारीं सस्मित मुखानें मुरली वाजवणाऱ्या कृष्णाची ती मूर्ति उभी असलेली बघून त्याचें डोके एवढें पिसाळलें कीं त्यानें ती मूर्ति एकदम उचलली आणि खिडकींतून सरळ खाली रस्त्यावरच्या फरसबदीवर फेकून दिली.

त्या क्षणीं बत्ताशीच्या जीवनांत क्राति घडून आली. हिंदू आणि मुसलमान ह्यामधल्या भेदाचा शोध त्या दिवशीं प्रथम तिला झाला. तिच्या उन्मादक नेत्रांतून क्रोधाच्या ज्वाला भडकून एकदम बाहेर पडल्या. आपण हिंदू आहोंत, आणि श्रीकृष्ण हा आपला देव आहे ह्याची दाहक जाणीव त्या क्षणी तिला पहिल्यानें

झाली. मुरलीधराच्या मूर्तीचे दोन तुकडे हृदयाशीं धरून ती तीन दिवस अहोरात्र रडली.

देशाच्या फाळणीचा अर्थ त्या वेळीं तिच्या ध्यानात आला. आपल्या हीन व्यवसायामुळें आपल्या देवाची आणि धर्माची अशी विटंबना झाली हे तिच्या लक्षात आलें. मस्तकापासून अलग झालेल्या मुरलीधराच्या पायावर हात ठेवून, 'आजपासून मी माझ्या शरीराचा विक्रय करणार नाहीं' अशी त्या रात्रीं तिनें शपथ घेतली. अनारकली रस्त्यावरची हिंदू शीखांचीं दुकानें आगामी संकटाच्या भयानें बद होण्याच्या आधी कित्येक दिवस बत्ताशीच्या माडीच्या खिडक्या बद झालेल्या होत्या.

तेरा ऑगस्ट रोजीं सकाळीं शहरांत सर्वत्र धावपळ सुरू झालेली दिसताच्च लाहोर सोडून बाहेर पडावयाचा बत्ताशीनेंही एकदम निश्चय केला. लाहोरचे आतां तिला कांहींच आकर्षण उरलें नव्हतें. आपल्या गडगंज संपत्तीची आणि तीन पिढ्याच्या मालमत्तेचीही तिला पर्वा राहिलेली नव्हती. पण लाहोर सोडून तिनें जायचें कसें? आपल्या घराचा दरवाजा बद केल्यापासून तिला आता कोणी आप्त आणि मित्रही राहिले नव्हते. बाहेरच्या जगाचा अन् तिचा संबधच जणुं काहीं तुटला होता.

दिवसा घरातून बाहेर पडणें तिला शक्य नव्हतें. सारें लाहोर तिला ओळखीत होतें. ती लाहोर सोडून जाते आहे ह्या गोष्टीची केवळ मुसलमानानींच नव्हे तर हिंदूंनीं आणि शीखानी सुद्धा थट्टा केली असती. आणि तिच्या हिंदुत्वाभिमानाचें हसू झाले असतें. बरें, रात्रीच्या अंधारात तिनें एकटें घराबाहेर पडणेंही धोक्याचें होतें. शहरांतलें सारें वातावरण गुडानीं आणि मवाल्यानीं नुसते उधसून गेलें होतें. वेश्येलाही आपल्या अब्रूचें भय असतें. नाहीं असें नाही.

पूर्वी तिच्या आश्रयदात्यापैकीं कोणाही मोटरवाल्यानें दिल्लीपर्यंत तिला आपल्या मोटरीमधून सहज पोहोचविलें असतें. तिनें नुसती इच्छा प्रदर्शित करावयाचाच्च त्या वेळीं काय तो प्रश्न होता. पण आता ती गोष्ट शक्य नव्हती. कोणाही मोटरवाल्या पाकिस्तानी धनिकानें तिला ह्या वेळीं भारतांत पोहोचवलें नसतें. अन् हिंदू आणि शीख श्रीमत स्वतःच आपापल्या मोटरींमधून पळून जाण्याच्या गडबडींत गुतले होते. तिच्यावर मोहोबत करण्याच्या थोडेच ते त्या वेळीं मनःस्थितींत होते? तिच्याजवळ दोन मुसलमान नोकर होते. पण ते इतर

हिंदूंच्या मालमत्तेवर हल्ला मारण्यासाटीं गांवभर भटकत होते. त्यामुळें त्यांचा तिला कांहींच उपयोग नव्हता.

संध्याकाळच्या वेळीं विषण्ण आणि व्यथित मनःस्थितींत ती आपल्या घराच्या मागल्या गॅलरींत उभी असता, बोळामध्यें एक मोटर लॉरी गुपचुप येऊन उभी राहिल्याचें तिनें पाहिलें. तिचा ड्रायव्हर शीख आहे असें पाहताच ती घाईघाईनें जिना उतरून मागील दारानें बाहेर आली. तो शीख ड्रायव्हर तिला ओळखत होताच. तिच्या चेहऱ्याकडे पाहताच तिच्या मनातला आशय तावडतोब त्याच्या लक्षात आला. त्यानें हलकेच तिला सागितलें, "उद्या पहाटे तीन वाजता ही मोटर लॉरी सातआठ हिदू आणि शीख स्त्री-पुरुषाना घेऊन भारताकडे जावयास निघणार आहे. त्यामध्यें तुम्हाला एक जागा मिळूं शकेल."

त्या शीख ड्रायव्हरच्या रूपानें स्वर्गातला एकादा देवदूतच आपल्या साहाय्याला धावून आला कीं काय असें बत्ताशीला वाटले. तिनें आपल्या बोटातली हिऱ्याची आगठी एकदम काढून त्याला देऊन टाकली. "मी पहाटे बरोबर पावणेतीन वाजतां येईन. तुम्ही तयार असा." त्यानें तिला हसून सागितलें. हर्षभरित अंतःकरणानें बत्ताशी घरात धावत आली. थोड्या वेळानें ती मोटर लॉरी निघून गेली.

घरात होते तेवढे रोकड पैसे, दागदागिने आणि थोडेसे कपडे तिनें एका लहानशा पेटींत भरले. बरोबर एक फळाचा करंडा आणि एक मिठाईची टोपली घ्यावयाचें तिनें टरविलें. न जाणो, वाटेत आपल्याला किवा मोटरींतील आपल्या सहप्रवाशाना भूक लागली तर असावें जवळ खाण्याचें काहीं तरी! तशी बत्ताशी अंतःकरणानें फार दयाळू आणि समजूतदार होती.

त्या रात्रीं तिला झोप येणें शक्यच नव्हते. ती निजली नाहीं. घरातले दिवे बंद करून ती अंधारात तशीच जागत बसली. मधून मधून रस्त्यावरून जाणाऱ्या 'मुस्लीम लीग'च्या स्वयसेवकाची भेसूर आरडाओरड तिच्या कानी पडे. आणि त्यामुळें तिच्या काळजात धस्स होई. लाहोरच्या किल्ल्यावरचे बाराचे टोके रात्रीच्या अंधारातून स्पष्टपणें तिला ऐकूं आले. त्यानंतर मात्र प्रत्येक क्षण तिला युगायुगासारखा वाटूं लागला.

मधून मधून लष्करी अधिकाऱ्याची एकादी जीपगाडी मोठ्या वेगानें रस्त्यावरून जाई. ती दचकून उठे. तिला वाटे आपलीच गाडी आली. त्या शीख ड्रायव्हरनें सागितल्याप्रमाणें बरोबर पावणेतीन वाजतां ती मोटर लॉरी तिच्या

घराच्या मागल्या बोळात येऊन शांतपणें उभी राहिली. बत्ताशी धावत ग्यालरींत गेली. तिनें खाली बघितले. होय, तीच ती. क्षणभरही विलंब न करता एका हातात पेटी, दुसऱ्या हातात करंडी आणि काखेत टोपली घेऊन ती घाईघाईनें जिना उतरून बाहेर रस्त्यावर आली. घराचें मागील दार बंद करण्यांत देखील तिनें वेळ घालवला नाहीं.

मोटरीच्या मागल्या बाजूला तो शीख ड्रायव्हर उभा होताच. त्यानें न बोलता तिचें सामान आत ठेवले आणि हात देऊन तिला वर चढविलें. बाहेर जसा गुडुप काळोख पसरला होता, तसा आत मोटरीमध्येंही दाट अंधार पडला होता. काहीं दिसत नव्हतें. शेजारच्या माणसाला आपला धक्का लागूं नये म्हणून बत्ताशी अंग चोरून आपल्या जागेवर बसली. थोडीशी कुठे ती स्थिर होते तोंच मोटर हलली.

ज्या घरात तिच्या तीन पिढ्या मोठ्या वैभवानें राहिल्या, जेथें नाना तऱ्हेच्या सुखाचा आणि विलासाचा तिनें मनमुराद उपभोग घेतला, त्या घराचा कायमचा निरोप घेताना बत्ताशीनें ढुकून देखील त्याच्याकडे पाहिलें नाहीं. आपल्या मालकिणीच्या कठोरपणाचा अचंबा करीत, अंधारात नाहींशा होणाऱ्या तिच्या मूर्तीकडे सताड उघड्या तोंडानें तो तीनमजली निर्जीव इमला बघतच उभा राहिला.

शहरातील हमरस्ते चुकवीत आणि आडमार्गांनीं वळणें घेत मोटर अंधारातून झपाट्यानें चालू लागली. वाटेत एकदोन चौक्यावर पोलिसानी हटकल्यासारखे केलें. पण ड्रायव्हरनें गाडीचा वेग यत्किंचितही कमी केला नाहीं. मोटरीच्या आतली मंडळी श्वास रोखून अंधारात बसली होती. जणुं काहीं आपल्या श्वासाची चाहूल बाहेर कोणाला लागेल अन् मग आपल्या प्रवासावर (अन् प्राणावर) एकदम गंडातर कोसळेल अशी त्याना क्षणोक्षणीं भीति वाटत होती.

मोटरच्या चाकापेक्षाही सर्वांच्या नाड्या अधिक वेगानें धावत होत्या. आणि एंजिनपेक्षा अधिक जोरानें त्याची हृदयें धडधडत होती. लाहोरच्या परिसरातून कधीं एकदाचें आपण बाहेर पडतो आहोत असें त्याना झालें होतें. त्यामुळे मोटरींत माणसें कोण कोण आहेत अन् आपल्या शेजारीं कोण बसलें आहे हें जाणून घेण्याची उत्सुकता देखील त्यांपैकीं कोणाला वाटली नाहीं. आपल्या शरीराचे स्नायू लाकडासारखे ताठ करून जो तो आपल्या जागेवर

निश्चेष्टपणें बसला होता. जणुं काहीं आपलें सर्व सामर्थ्य इच्छाशक्तीमध्यें ओतून तिच्या जोरानें मोटरीचें 'अश्वबल' वाढविण्याचा ते प्रयत्न करीत होते.

दिवस उन्हाळ्याचे होते. पण रात्र पुष्कळच उलटली होती. अन् पहाट फुटायला फारसा अवकाश नव्हता. त्यामुळें हवेंत चागलाच गारटा पडलेला होता. वाराही सोसाट्यानें वाहूं लागला होता. घरट्याच्या तोंडाशीं एखादें चिमणीचें पिल्लू जसें थरथर कापत बसावें, तसें रेशमी दुपट्ट्यानें आपलें तोंड अर्धवट झाकून बत्ताशी मागल्या बाजूला गुपचुप बसली होती.

लाहोरची शीव ओलांडून मोटर चागली चार-पाच मैल दूर गेल्याची जेव्हा सर्वांना जाणीव झाली, तेव्हां मोटरीतल्या निश्चल आकृतींची थोडीफार हालचाल सुरू झाली अन् श्वासोच्छ्वासाचा आवाज ऐकू येऊ लागला. कुसूरच्या दिशेनें ड्रायव्हरनें मोटर काढली. कुसूर हा जरी लाहोर जिल्ह्याचा भाग असला, तरी त्याचा समावेश भारतात झालेला होता. त्यामुळें लाहोरपासून कुसूर हेच भारताच्या जास्तींत जास्त जवळ असें ठिकाण होतें.

सुरक्षिततेच्या म्हणजे भारतात लौकर पोहोंचण्याच्या दृष्टीनें त्यानीं कुसूरला जाणे हेच अधिक इष्ट होतें. पण लाहोर जसें मागे पडलें तसे चागले रस्तेही संपून गेले. आणि दहा-पंधरा मैलानंतर खळग्याचा अन् खाच-खड्ड्याचा रस्ता सुरू झाला. त्याबरोबर मोटरीचा वेग मंदावला अन् तिला एक सारखे धक्के बसू लागले. मोटरींतील माणसें एकमेकाच्या अंगावर आदळू लागली. शेजारीं बसलेला एक जाडजूड माणूस तर बत्ताशीच्या अंगावर चारदोन वेळा आपटला. अन् एकदा तर त्याच्या खिळेदार बुटाचा पाय नेमका तिच्या पायाच्या करंगळी-वरच पडला. तिच्या तळव्यापासून डोक्यापर्यंत एकदम प्राणातिक कळ उठली. पण तिनें हूं का चू सुद्धा केलें नाहीं.

चाळीस मैलाचें अंतर म्हणजे काहीं फार नाहीं, पण ते तोडायला त्याना जवळजवळ दोन-अडीच तास लागले. दोनतीन वेळा रस्ता चुकला. बरेंच लाब जाऊन पुन्हा मोटर परत वळवावी लागली. चारदोन वेळा एंजिनमध्यें काही तरी बिघाड होऊन मोटर बंद पडली. ड्रायव्हर मुकाट्यानें खालीं उतरे. एंजिनचें झाकण उघडून दहापाच मिनिटें काहीं तरी खटपट करी. आणि धीमे-पणानें आपल्या जागेवर येऊन पुन्हा पूर्वीप्रमाणें मोटर सुरू करी.

मोटर थाबली किंवा रस्ता चुकल्यामुळें मागे वळली म्हणजे मोटरींतल्या मडळीच्या तोंडचें अगदीं पाणी पळे. आणि त्याच्या जिवाची उलघाल होई.

कोणी तरी एवढ्यात येऊन आपल्या मोटरीला गराडा तर घालणार नाहीं ना असें भय वाटून त्याच्या सर्वांगाचा थरकाप होई.

दिशा फटफटल्या. अंधार निवळला. मोटरींतल्या माणसाना एकमेकाचे चेहरे दिसू लागले. तरी अजून कसा रस्ता संपला नाहीं, अजून कशी कुसूरची हद्द लागली नाहीं, ह्या विचारानें जो तो अस्वस्थ झाला. रस्ता तर चुकला नाहीं असा एक विचारही कट्यारीप्रमाणें कित्येकाचीं काळजें कापीत गेला.

अंगात भगवी कफनी घातलेल्या आणि शुभ्र पांढरी दाढी असलेल्या एका वृद्ध पुरुषानें शेवटीं अधीर होऊन ड्रायव्हरला विचारलेंच, "सरदारजी, अजून कुसूर किती दूर आहे?"

"दहा मैल!" ड्रायव्हरनें भावनाशून्य स्वरात उत्तर दिलें.

"म्हणजे फार झाल तर अर्धा तास!" आपल्या दाढीवरून हात फिरवीत अन् मान हलवीत तो वृद्ध स्वतःशीच पुटपुटला.

"नमस्ते स्वामीजी!" समोर बसलेला एक मध्यम वयाचा, डोक्याला काश्मिरी टोपी असलेला अन् अंगात गळेबंद लोकरी शेरवानी घातलेला लठ्ठ माणूस त्या वृद्धाला नमस्कार करून म्हणाला.

"कोण—लालाजी? अरे, तुम्ही आहात का?" स्वामीजी किंचित् हसून म्हणाले.

"हो, अन् ही माझी पत्नी स्वरूपादेवी!" 'स्वरूपा'शी कसलाही संबंध नसलेल्या अन् आपल्याइतक्याच लठ्ठ असलेल्या आपल्या पत्नीची ओळख करून देत लालाजी म्हणाले.

"हे स्वामी सच्चिदानंदजी. आपल्या शहर कॉंग्रेसचे प्रेसिडेंट!" लालाजींनीं आपल्या बायकोला स्वामीजींची ओळख करून दिली.

स्वामीजींच्या डाव्या बाजूला एक काळ्याभोर दाढीमिशांचा धिप्पाड शीख आपल्या पत्नीसह बसला होता. डाव्या हातानें आपल्या दाढीमिशा जोरजोरानें कुरवाळीत त्यानें लालाजींना विचारलें, "मेयो रोडवर आपलें जवाहिराचें दुकान आहे—"

"होते!" विपण्ण स्वरात लालाजींनीं दुरुस्ती केली.

शीख गृहस्थ एकदम ओशाळा झाला.

तेव्हां स्वामीजी त्याच्याकडे वळून म्हणाले, "हो, तेच हे लाला रामस्वरूपजी. आमच्या कॉंग्रेस कमिटीचे ट्रेझरर—"

"मी डॉक्टर चीमासिंग—" शीखानें आपली ओळख करून दिली. "कॅन्टोन्मेंटमध्यें माझा दवाखाना आ–होता! ह्या माझ्या मिसेस."

"मी ओळखते कुलदीप बहेनना" स्वरूपाराणी उद्गारल्या. "आमच्या महिला समाजाच्या ह्या वर्षाच्या त्या सेक्रेटरी निवडल्या गेल्या आहेत ना?"

कुलदीप बहेननीं आपला मासल जबडा किंचित् उघडून स्वरूपाराणीकडे बघितल्यासारखे केले.

"गुड मॉर्निंग स्वामीजी!" ड्रायव्हरच्या मागे कोपऱ्यात बसलेला पिंजारलेल्या केसाचा एक उंच हाडकुळा माणूस आपल्या तोंडावरचा मफलर बाजूला न करता भसाड्या आवाजात ओरडला. एवढ्या तारस्वरात आतापर्यंत कोणीच बोलले नव्हतें. सगळ्यानीं दचकून त्याच्याकडे पाहिलें.

"हॅलो, कॉम्रेड चौधरी! तुम्ही ह्या गाडीत असाल अशी माझी कल्पना नव्हती!" स्वामीजी अस्खलित इंग्रजीत उद्गारले. कॉम्रेड चौधरी हा लाहोरमधला कम्युनिस्ट पक्षाचा सुप्रसिद्ध कार्यकर्ता होता.

"कॉंग्रेसची हायकमांड ह्या मोटरीतून पळून चालली आहे, ह्याची मला तरी कुठे कल्पना होती?" स्वामीजींकडे आणि लालाजीकडे आळीपाळीनें पाहात विकट हास्य करीत कॉम्रेड उत्तरला. त्या विनोदाला दुसऱ्या कुणींच साद न दिल्यानें त्याचें तें हास्य त्या वेळीं फारच भयाण वाटले.

लालाजीच्या बाजूला एक महाराष्ट्रीय जोडपे अन् स्वरूपाराणीच्या शेजारीं एक मद्रासी जोडपे बसलेले होतें.

भारताची सरहद्द आता अर्ध्या तासापेक्षा दूर नाही ह्या जाणिवेनें सर्वच्याच मनावरचा ताण कमी झालेला दिसला आणि जसा जसा जास्त उजेड वाढू लागला, तसा तसा सर्वांनाच धीर आल्यासारखे वाटूं लागलें. त्यामुळें रात्रीच्या अंधारात अवाक्षरही ज्यांनीं तोंडामधून काढलें नाहीं ती मंडळी आता नवा कंठ फुटल्याप्रमाणें मोकळेपणानें बोलूं लागली.

प्रा. घाटपांडे हे लाहोरच्या सरकारी कॉलेजात इतिहासाचे प्राध्यापक होते. अन् त्याच्या पुनर्विवाहित पत्नी मुद्राबाई ह्याना वाङ्मयाचा आणि लेखनाचा थोडासा नाद होता. त्याचीं काश्मीरचीं अन् उत्तर हिंदुस्थानचीं प्रवासवर्णनें कुठें कुठें मासिकातून प्रसिद्ध होत असत. सुब्रह्मण्यम् हा मद्रासच्या कुठल्या तरी विमा कपनीचा लाहोर शाखेचा प्रमुख होता. त्याची बायको चगम्मा हा द्राविड सौंदर्याचा एक मोटा वैशिष्ट्यपूर्ण नमुना होता. तिला पाहताच हपी

विरूपाक्षाच्या देवळात आढळून येणाऱ्या प्राचीन शिल्पकलेचीच कोणालाही आठवण झाली असती.

ह्याखेरीज आणखी दोनतीन कोणी तरी माणसें मोटरीमध्यें होतीच. ही एवढी गर्दी एऱ्हवीं त्या गाडींत जाणवली नसती. पण सामानाच्या गर्दीमुळें सर्वांची अशी खेचाखेच झाली होती कीं, अंग आखडून सर्वांना बसावें लागलें होते. पण प्राण वाचवण्याच्या धावपळींत अवघडलेल्या गात्राकडे लक्ष देण्याइतकी कोणाला शुद्ध होती? सगळेजण आपापसात बोलत होते. पण बत्ताशी मात्र मान खालीं घालून अन् दुपट्ट्यानें आपले तोंड झाकून गप्प बसली होती. त्यामुळें तिच्याकडे कोणाचेंच लक्ष गेलें नाहीं. आणि तिलाही त्याचें लक्ष आपल्याकडे वेधून घेण्याची इच्छा नव्हती. कारण ही सगळी मडळी तिच्या दृष्टीला अपरिचित होती. अशा लोकाशी तिचा पूर्वी कधींच संबध आला नव्हता. तिच्याकडे येणारी मडळीं निराळीं असत!

मोटरमधल्या सर्व माणसावरून नजर फिरवीत सुब्रह्मण्यम् आपल्या द्राविडी हिंदीमध्यें दात विचकून म्हणाला, "इस मोट्टरमें तो हिंदुस्थानका चोट्टा नक्शा मेरेकू नज्जर आता है!" आपल्या पतीच्या विनोदाचा कोणावरही फारसा परिणाम झालेला नाहीं हें बघून चगम्माच आपलें प्रचड अंग हलवीत 'ओक्साबोक्शी' हसू लागली. सगळी मडळी अचब्यानें तिच्या अक्राळविक्राळ दतपंक्तीकडे बघू लागली.

तोंच धावत्या मोटरीला एकदम ब्रेक लावले गेले. कानठळ्या बसविणारा कर्कश आवाज चाकातून निघाला. अन् आतली मडळी एकमेकाच्या अंगावर जोरानें फेकली गेली.

"ठेहेरो!" ढग गडगडावेत तसा पाच-सहा आवाजाचा एकदम बाहेर स्फोट उडाला. सहा बदुकींच्या नळ्या ड्रायव्हरच्या छातीवर रोखल्या गेल्या. मोटारीच्या चाकावरचे ड्रायव्हरचे हात आपोआप वर उचलले गेले.

"कौन है अंदर?" एका भीषण आवाजानें विचारलें.

"सिर्फ पॅसेंजर्स—" ड्रायव्हर निर्जीवपणें उत्तरला, "कु–कुसूर जानेवाले हैं!"

"नहीं जा सकते!" तो भीषण आवाज पुन्हा गरजला, "निकालो बाहर सब लोग और सामान!"

ह्या अनपेक्षित संकटानें तर आतल्या मंडळीची बोबडी वळली. त्याच्या

तोंडचें पाणी पळालें. बंदूकवाल्या पोलिसांनीं मोटरीला गराडा घातला आणि आतली माणसें अन् सामान भराभर बाहेर फेकून द्यायला सुरुवात केली. दहा मिनिटाच्या आत मोटर मोकळी झाली.

बाहेर आता चांगलेंच उजाडले होतें. उजव्या बाजूला डाकबंगल्यासारखी एक सरकारी इमारत होती. बंदूकवाले लोक पोलिस नव्हते. ते लष्करी शिपाई दिसत होते. अर्थात् मुसलमान होते. पाकिस्तानच्या निर्मितीला आता एकच दिवस राहिला होता. पण त्याच्या इस्लामी जुलमाला आधीच सुरवात झाली होती. त्या 'पाकिस्तानी' शिपायाचा तो रुद्रावतार आणि त्याच्या हातातल्या त्या संगिनीच्या बंदुका बघून मोटरीतल्या मंडळीला एका क्षणात आपल्यावरच्या संकटाची कल्पना आली.

भयानें त्याच्या शरीरातले रक्त गोठून गेल्यासारखे झालें. सर्वांगाला घाम सुटला. भारताची सरहद्द अवघी दोनच मैल तेथून दूर होती. स्वातंत्र्याचा प्याला इतका ओठाजवळ आला असता शेवटच्या क्षणाला हे संकट अचानक उद्भवावें ह्याचे त्याना विशेष दुःख झालें. मोटरींतून काढलेल्या सामानाची रास त्या इमारतीच्या दगडी भिंतीजवळ शिपायानीं रचली. मोटरीतल्या मंडळींना त्याच्याशीं बोलण्याचें धैर्यच नव्हतें. एवढेंच नव्हे, पण आपापसात देखील बोलण्याचें त्याना भय वाटलें. ओठ मिटून भेदरलेल्या डोळ्यानी ते एकमेकाकडे नुसते टकमक पाहात राहिले.

शेवटीं स्वामी सच्चिदानंदजींनी धैर्य केले. त्या शिपायाच्या पुढाऱ्याजवळ मोठ्या अदबीनें जाऊन त्यानी विचारलें, "आम्ही लाहोरचे लोक आहोत. आमचें कांहीं कोणाशीं भांडण नाही. हिंदु-मुसलमान हे भाई भाई आहेत असें आम्ही मानतो. आम्हाला आपण का बरे अडविता ?"

"आम्हाला काहीं सांगू नका !" त्या शिपायानें थोडेसें नरमून उत्तर दिलें, "कॅप्टनसाहेब आले म्हणजे त्याना हें तुम्ही सांगा ! कोणालाही इथून जाऊन द्यायचें नाहीं असा त्याचा आम्हाला सक्त हुकूम आहे !"

स्वामीजींचें बोलणेंच खुटलें. कोण जे त्याचे कॅप्टनसाहेब आहेत ते येईपर्यंत आता थांबण्यावाचून गत्यंतरच नव्हते हें त्याना कळून चुकलें. तोपर्यंत सर्व मंडळी एका झाडाखालीं वर्तुळ करून बसली. बत्ताशी त्या झाडाच्या आडोशाला जाऊन उभी राहिली. त्यामुळें तिच्याकडे कोणाचेंच लक्ष गेले नाहीं. अन् तसें लक्ष देण्याच्या कोणी मनःस्थितींतही पण नव्हते.

सर्वांना 'कॅप्टनसाहेबां'ची काळजी लागून राहिली. सुदैवानें तो चांगला माणूस असला तर ठीक. पण जर का सैतान निघाला तर? छे! तो विचारही त्याना असह्य झाला. एकाद्या कसाईखान्यापुढें मेंढरें जशीं निश्चल उभीं असतात, तसे हताश चेहरे करून ते स्वस्थ बसले होते. सामान्य देहधर्माची देखील त्याना आठवण राहिली नाहीं. मग खाण्यापिण्याची तर गोष्टच दूर.

दहा-साडेदहाच्या सुमारास एक लष्करी 'जीप' धुरळ्याचे लोट उडवीत मोठ्या वेगाने लाहोरच्या बाजूकडून आली अन् त्या इमारतीसमोर एकदम थांबली. आतून कॅप्टनसाहेब मोठ्या रुबाबात उतरले. बंदूकवाल्या शिपायानी त्याना खडी ताजीम दिली.

कॅप्टनसाहेब पुऱ्या लष्करी पोषाखात होते. सहा फूट उंचीची त्याची बांधेसूद आकृति, गव्हासारखा तेजस्वी वर्ण अन् वर ऐटीनें वळलेल्या झुबकेदार काळ्याभोर मिशा पाहून कोणाचीही नजर त्याच्याकडे खिळूनच राहिली असती. सुंदर माणसामध्येंच ते निश्चितपणें जमा होण्यासारखे होते. इमारतीच्या तोंडाशीच सामानाच्या रचून ठेवलेल्या ढिगाकडे त्यानीं किंचित् हसून पाहिलें अन् झाडाखाली बसलेल्या माणसाकडे नजर टाकून शिपायाच्या प्रमुखाशी ते कांहीं तरी पुटपुटले.

एवढ्यात स्वामीजी आणि लालाजी हात जोडून त्याच्यापुढें गेले.

"सगळीं माणसें तुम्ही त्या झाडाखाली ओळीनें उभी राहा! मी आलोच आता." असें त्याना सांगून कॅप्टनसाहेब आत निघून गेले. एकच वाक्य कॅप्टनसाहेब बोलले. पण तेवढ्यानें स्वामीजींचा त्याच्याविषयीं चांगला ग्रह झाला. लालाजीनाही तसेंच वाटलें. त्यानीं ते स्वामीजींना बोलूनही दाखविलें.

"बघू काय होतें ते. नेईल परमेश्वर सगळें निभावून!" स्वामीजी गंभीरपणें उद्गारले.

एका रांगेमध्यें उभे राहण्याला कॉम्रेड चौधरीनें विरोध केला.

"ही शुद्ध पिळणूक आहे!" तो चिडून म्हणाला.

शेवटीं सुब्रह्मण्यम् त्याच्या हातापाया पडला तेव्हा तो कबूल झाला. "भांडनेका ये कुछ टाईम है क्या?" सुब्रह्मण्यम् प्रो. घाटपांड्याच्या कानात पुटपुटला.

तोंडात सिगरेटची एक लांबलचक नळी घालून धुराचे भपकारे सोडीत कॅप्टनसाहेब थोड्या वेळानें तेथें आले. मधोमध उभे राहून ते एकेकाला पायापासून डोक्यापर्यंत न्याहाळू लागले. डॉ. चीमासिंग अन् दुसऱ्या एका

शीखाला बघून त्यांनीं आपल्या तोंडातली नळी चावल्यासारखे केलें. स्त्रिया काहीं अंतरावर उभ्या होत्या.

"ती आमची बायका मडळी आहेत!" लालाजी हसून मोठ्या लाचारीनें म्हणाले.

"ती का पाठ फिरवून उभी आहे?" पाठमोऱ्या उभ्या असलेल्या बत्ताशीला बघून कॅप्टनसाहेब चमकून उद्गारले. चगम्मानें तिचे दोन्ही बाहुटे धरून भरदिशीं तिला फिरवून घेतले. एकाद्या घाबरलेल्या सशाप्रमाणें उघड-झाप करणाऱ्या आपल्या काळ्याभोर पापण्यामधून बत्ताशीनें कॅप्टनसाहेबाकडे क्षणभर बघितल्यासारखे केले.

त्याबरोबर मत्रमुग्ध झालेल्या माणसाप्रमाणें कॅप्टनसाहेब तिच्याकडे डोळे रोखून पाहातच उभे राहिले. त्याच्या चेहऱ्यात एकदम झालेला बदल सर्वांच्या लक्षात आल्यावाचून राहिला नाहीं. काहीं वेळानें कॅप्टनसाहेब भानावर आले. आणि स्वामीजीना आपल्या मागोमाग ऑफिसात यावयाला सागून ते निघून गेले. जाण्यापूर्वी बत्ताशीकडे पुन्हा एकवार दृष्टिक्षेप करायला मात्र ते विसरले नाहीत.

कॅप्टनसाहेबाशीं आत बोलणें करून बाहेर यावयाला स्वामीजीना अर्धा तास लागला. तेवढ्या वेळात एका शिपायानें सर्वांची नावें एका कागदावर टिपून नेलीं. स्वामीजींभोवतीं सर्व मंडळीनें एकदम गर्दी केली.

"काय म्हणणे आहे त्याचे?" डॉ. चीमासिगानी दाढी पिरगाळीत विचारलें.

"जानेकू देएगा ना वो?" सुब्रह्मण्यम् जोरानें मान हलवून म्हणाला.

"दहा हजार रुपये मागतोय तो." स्वामीजी चिंतातुर स्वरात म्हणाले.

"हात्तिच्या. एवढेंच!" लालाजी उद्गारले, "दहा हजार रुपये दिल्यानतर तर तो आपल्याला जाऊन देईल ना?"

"मीं त्याला सागितलें कीं, देशसेवेसाठीं बैरागी झालेला मी एक माणूस आहे! मी कुठून पैसे देणार? बाकीच्याना विचारतो!" स्वामीजी म्हणाले.

"हे आमचे हजार रुपये घ्या!" चीमासिगानीं आपल्या विजारीच्या खिशातून हजाराची एक नोट झटकन् काढून स्वामीजीपुढें धरली.

"राहू द्या हो!" लालाजी त्याचा हात मागे सारीत म्हणाले, "मी देतो दहा हजार. कुसूरला पोहोंचल्यावर मग आपण बघू कोणीं किती द्यायचे ते."

इतक्यात आतून एक शिपाई आला.

"बिंदा कौन है ?" त्यानें विचारलें, "कॅप्टनसाहेब अंदर बुलाते हैं।"

पायापासून डोक्यापर्यंत बत्ताशीच्या अंगांत शिळक चमकली. तिच्या काळजात कांटा उठला. पण ही घाबरण्याची वेळ नाहीं हें तिनें ओळखलें. आपला दुपट्टा अंगावर सांवरून ती चटकन् शिपायाच्या मागोमाग गेली.

सर्वजण तिच्याकडे रोखल्या नजरेनें पाहूं लागले. मघाशीं तिला पाहिल्यावर कॅप्टनसाहेबाच्या चेहऱ्यांत कां एकदम बदल झाला, हें आतां सर्वांच्या लक्षांत आलें.

"ही कोण आहे हो ?" कॉम्रेड चौधरीनें विचारलें.

"तुम्ही नाहीं ओळखीत ?" डोळे मिचकावून लालाजी म्हणाले, "माझे तरी तिच्याकडे आताच लक्ष गेलें. ही ती अनारकली रोडवरची आपली—"

लालाजींनीं 'बत्ताशी' हें नांव उच्चारल्या न उच्चारल्यासारखें केलें. पण सर्वांच्या लक्षांत त्यांच्या सांगण्याचा आशय आला. आणि तशाही परिस्थितींत सर्वांच्या चेहऱ्यावर हास्याची एक लकेर चमकून गेली.

"वा–बा–बा !" आपल्या वासलेल्या तोंडावर डाव्या हाताचा पंजा आदळत सुब्रह्मण्यम् उद्गारला.

बायका आपापसांत कुजबुजूं लागल्या. पुरुष कां असे चमत्कारिकपणें हसले हें त्यांच्या लक्षांत आलें नाहीं. सुंद्राबाईनीं आपल्या यजमानांना विचारलें, "कोण आहे ती ?"

"पी–आर–ओ–एस—" प्रा. घाटपांडे आपल्या बायकोच्या कानांत कुजबुजले.

"इश्य !" सुंद्राबाई वेडावाकडा चेहरा करीत एकदम उद्गारल्या. त्यांनीं ती बातमी हसत सगळ्या बायकांना सांगितली.

"ही मेली कशाला लाहोर सोडून आपल्याबरोबर येते आहे ?" 'महिला समाजा'च्या सेक्रेटरी सौ. कुलदीप चीमासिंग उद्गारल्या.

"ही घाण पाकिस्तानांतच राहिलेली बरी. आपल्याबरोबर भारतांत नको !" स्वरूपाराणींनीं आपला अभिप्राय दिला.

"ही घाणेरडी बाई ह्या मोटरींत आहे, हें जर मला समजलें असतें, तर मी ह्या मोटरींतून मुळीं आलेंच नसतें !" चंगम्मा आपला जबडा विस्फारित म्हणाल्या.

एवढ्यांत आंतून घाईघाईनें बत्ताशी बाहेर पडली. तिचे ओठ थरथर

कांपत होते. चेहरा प्रक्षुब्ध झाला होता. गालावरचे लाल ठिपके अधिकच भडक झाले होते. सारेजण तिच्याकडे टवकारून पाहूं लागले.

"काय झालें?" स्वामीजींनीं विचारलें.

"कांहीं नाहीं!" असें पुटपुटत ती एका बाजूला पाठ फिरवून उभी राहिली. बायकांपैकीं कोणी तिच्याजवळ गेलें नाहीं.

पुन्हा कॅप्टनसाहेबांचें स्वामीजींना बोलावणें आलें तेव्हां लालाजींनीं दहा हजारांच्या नोटांचें पुडकें स्वामीजींच्या हातांत ठेवलें. पण पंधरा मिनिटांनीं स्वामीजी आंतून बाहेर आले तेव्हां त्यांच्या हातांत नोटाचें तें पुडकें तसेंच होतें. आणि त्यांचा चेहरा विशेषच चिंताक्रांत दिसत होता.

त्याबरोबर सर्वांच्या तोंडावरचें तेज एकदम मावळलें. स्वामीजी पैसे घेऊन आंत गेले, तेव्हां आतां आपली लौकरच सुटका होणार अशा आनंदांत सारे होते.

"कां, घेत नाहीं तो पैसे?" लालाजींनीं विचारलें.

"छे, आतां तो भयंकरच भडकला आहे!" स्वामीजी खालीं पाहात म्हणाले.

"कारण?" प्रा. घाटपांड्यांनीं विचारलें.

स्वामीजी बोलले नाहींत. त्यांनीं बत्ताशीकडे नुसता दृष्टिक्षेप टाकला.

"हात्तिच्या! हेंच ना?" लालाजी हसत म्हणाले, "मग त्याला एवढें भडकायला काय झालें! ती तर—"

लालाजींचें वाक्य मध्येंच थांबवून स्वामीजी म्हणाले, "तिनें त्या कॅप्टनच्या मघाशीं मुस्काडींत मारली!"

लालाजींचें तोंड एकदम पडलें. त्यांच्या सर्व अंगावर कांटा उभा राहिला. डोळे फाडून बाकीचे सारे बत्ताशीकडे बघूं लागले.

"अब क्या होगा?" सुब्रह्मण्यमनें रुद्ध स्वरांत विचारलें.

कातर स्वरांत स्वामीजी म्हणाले, "कॅप्टननें मला आतां स्पष्टच सांगितलें कीं 'ही' जर आपल्याला आज 'मिळाली' नाहीं तर उद्यां सकाळीं 'पाकिस्तान'चा झेंडा उभारण्यापूर्वी तुम्हां सर्वांच्या रक्ताचा सडा इथें शिंपडीन!"

स्वामीजींचे ते शब्द ऐकतांच आपल्या धमन्यांतून रक्ताच्या ऐवजीं बर्फाचें पाणी वहातें आहे कीं काय असा सर्वांना भास झाला. त्यांचीं मस्तकें महिरून गेलीं. हतबुद्ध होऊन ते एकमेकांकडे बघूं लागले.

इतक्यांत पुन्हा आंतून शिपाई आला आणि तो ओरडून म्हणाला, "बिन्दाको कॅप्टनसाब जलदी बुलाते हैं!"

"नहीं आऊंगी!" गरकन् फिरून एखाद्या वाघिणीप्रमाणें बत्ताशी कडाडली, "कभी नहीं आऊंगी—"

"असं बोलू नये, बाई!" लालाजी भीत भीत तिच्याजवळ गेले आणि मोठ्या अजीजीनें म्हणाले, "फार मोठे अधिकारी आहेत ते. त्यांनीं बोलावलें तर गेलेंच पाहिजे. नाहीं म्हणून कसें चालेल?"

"त्यांनीं तरवारीनें माझे दोन तुकडे केले तरी मी जाणार नाहीं!" बत्ताशी त्वेषानें म्हणाली.

बत्ताशीचा तो क्रुद्ध अवतार आणि तिच्या डोळ्यांतील निश्चयाचें तें तेज बघून लालाजी हादरूनच गेले. लाहोरांत तिच्या घरीं पूर्वी लालाजी दोनचार वेळां गेलेले होते. त्या वेळच्या तिच्या आचारांत आणि विचारांत एवढी क्रांति होण्याचें काय कारण हें त्यांच्या ध्यानांत येईना.

फारच गंभीर पेचप्रसंग निर्माण झाल्याचें सर्वांच्या ध्यानीं आलें. बायकांनाही त्याचा हळूहळू सुगावा लागला. पण ह्यांतून मार्ग कसा काढावयाचा? बत्ताशीची समजूत घालावयाची कोणीं? आणि कशी?

एवढा वेळ होईपर्यंत बारा वाजून गेले होते. कोणाच्या पोटांत अन्नाचा कण गेला नव्हता. तहानभूक सारें विसरून गेले होते. आपणा सर्वांचे प्राण आतां बत्ताशीच्या हातीं आहेत अशी सर्वांची खात्री होऊन चुकली.

सौ. कुलदीप चीमासिंग चिडून म्हणाल्या, "बोलूनचालून वेश्या ही! सगळा जन्म गेला हिचा घाण गोष्टी करण्यांत! आणि आज हा भलताच संचार हिच्यामध्यें कुठून झाला?"

"बरें, तो कॅप्टन दिसायला तरी वाईट आहे का? मी म्हणतें, हजारांत असा माणूस मिळायचा नाहीं!" स्वरूपाराणी मिटक्या मारीत म्हणाल्या.

प्रा. घाटपांडे आपल्या बायकोला म्हणाले, "तुम्ही एवढ्या लेखिका, तुम्ही आपल्या बुद्धिकौशल्यानें त्या बाईचें मन खात्रीनें वळवूं शकाल!"

तेव्हां सुंद्राबाई भडकून म्हणाल्या, "इश्य, भलतंच कांहीं तरी! मी त्या मेलीचं असल्या घाणेरड्या गोष्टीसाठीं मन वळवूं म्हणतां? तुम्हांला हें मला सांगायला लाज कशी वाटत नाहीं?"

कशाला आपण आपल्या बायकोला सांगायला गेलों असें प्रा. घाटपांड्यांना होऊन गेलें.

स्वामीजींना लालाजी म्हणाले, "स्वामीजी, तुम्ही आम्हां सर्वांपेक्षां वृद्ध

आहांत. पवित्र आहांत. तुम्हीं जर तिला समजावून सांगितलेंत तर ती नाहीं म्हणणार नाहीं."

स्वामीजी व्यथित स्वरांत उत्तरले, "लालाजी, काय सांगताहांत तुम्ही मला हें ! तुम्ही माझ्या वार्धक्याची अन् चारित्र्याची थट्टा का करताहांत !"

शेवटीं कॉम्रेड चौधरी म्हणाले, "लालाजी, चला, आपण तिला जाऊन सांगूं." त्या दोघांच्या बरोबर प्रा. घाटपांडे अन् सुब्रह्मण्यमही गेले.

ग्लानि आल्यासारख्या मनःस्थितींत झाडाखालीं बुंध्याला टेकून बत्ताशी शांतपणें बसली होती.

कॉम्रेडनें तिच्याशीं बोलावयाला सुरुवात केली, "बाई, आम्ही निर्वाणीची एक विनंति करायला तुमच्याकडे आलों आहोंत. तुम्हांला ठाऊक आहे कीं आपले सर्वांचे प्राण आतां सर्वस्वीं तुमच्या हातीं आहेत."

"मला माझ्या प्राणांची पर्वा नाहीं !" बत्ताशी उसळून म्हणाली. "तुमचे प्राण वांचविण्यासाठीं मी माझ्या अब्रूची राखरांगोळी करून घेऊं म्हणतां कीं काय !"

लालाजी हसले. ते तिला म्हणाले, "तुमचे विचार एवढे बदलले असतील अशी माझी कल्पना नव्हती."

"तुम्ही काय म्हणतां तें माझ्या लक्षांत आलें," बत्ताशी गंभीर स्वरांत म्हणाली. "होय, मी चांगली बाई नाहीं. वेश्या आहें मी. पण वेश्येलाही अब्रू असते, आपल्या देशाचा आणि धर्माचा अभिमान असतो हें कदाचित् तुम्हांला कळणार नाहीं. देशाचे तुकडे करणाऱ्या हाताला मी स्पर्शसुद्धां करणार नाहीं. त्यापेक्षां आगींत उडी मारीन."

"पण आम्ही तर तुमचे देशबांधव आहोंत ना ! आमचे प्राण वांचविण्यासाठीं तुम्हांला एवढें करावयाला काय हरकत आहे ?" कॉम्रेड चौधरी म्हणाला. "जी गोष्ट तुम्हांला आम्हीं करायला सांगत आहोंत ती वाईट आहे हें आम्हीं कबूल करतों. पण तिचा हेतु आणि परिणाम तुम्ही लक्षांत घ्या. चांगलें ध्येय साध्य करण्यासाठीं वाटेल त्या साधनांचा अवलंब करायला हरकत नाहीं !"

"हें तुमचें कम्युनिस्टांचें तत्त्वज्ञान झालें," लालाजी म्हणाले. "पण आमच्या कॉंग्रेसच्या तत्त्वज्ञानाप्रमाणेंसुद्धां तुमचें कृत्य समर्थनीय ठरेल. आम्हां सर्वांचे प्राण वांचविणें ही फार मोठी अहिंसा होय. ह्या अहिंसेचें पुण्य तुम्हांला लागेल."

"आपल्या देशाच्या आणि देशबांधवांच्या रक्षणासाठीं शीलाचीच काय पण आपल्या प्राणाचीही आहुति देणाऱ्या अनेक स्त्रिया इतिहासात होऊन गेल्या आहेत," प्रा. घाटपांडे आवेशानें म्हणाले.

शेवटीं सुब्रह्मण्यम् आपल्या द्राविडी हिंदींत म्हणाले, "धर्मशास्त्रमें तो इसकू बलिदान बोलते हैं. शरीरकू थोडासा ढब्बा लगेगा. झूट कायकू बोलना ? पर तुम्हारा जो आत्मा है ना वो तो शुद्धच रहेगा. सच्ची !"

पण कोणत्याही युक्तिवादाचा तिच्या मनावर परिणाम होणें शक्य नव्हते. तिचा निश्चय अढळ होता. 'चौधरी शिष्टमंडळ' निराश होऊन परत आले. त्यानंतर शेवटीं स्त्रियानीं तिची मनधरणी करावयाचें ठरविलें. चागले दोन तास त्या तिच्याभोवतीं गराडा घालून बसल्या. नाना तऱ्हेनें त्यानीं तिची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. दुसऱ्याचे प्राण वाचविण्यासारखे जगांत पुण्य नाहीं, ह्या पुण्यकृत्यानें ती स्वर्गाला जाईल, सीतासावित्रीप्रमाणें भारताच्या इतिहासात तिचें नाव अमर होईल, एवढेंसुद्धा त्यानीं तिला सांगितलें. पण ती कांहीं त्या गोष्टीला तयार होईना. शेवटीं त्या बायका चिडून तिला वाटेल त्या शिव्या देऊं लागल्या. आणि चंगम्मा तर तिला मारायला धावली.

दुपार टळली. उन्हें उतरली. संध्याकाळचा सुमार झाला. कॅप्टनसाहेबाचा शिपाई मधून मधून बाहेर येऊन त्यांच्या संतापाच्या आणि क्रोधाच्या भयानक बातम्या त्याना सागून जात होताच. प्रत्येक क्षणाक्षणाला मृत्यु जवळ येत चालला अशी आता सर्वांची खात्री पटली. सारे आपापल्या जागेवर निपचित बसून होते. अंधार पडला. बंगल्यांत आणि बगल्याच्या बाहेर दिवे लागले. कॅप्टनसाहेबांनीं आंतमध्यें आता 'प्यायला' सुरुवात केल्याची भयंकर बातमी शिपायानें येऊन त्याना सागितली. पिऊन ते एकदम बेहोष झाले म्हणजे मग काय त्यांच्या हातून घडेल हें काहीं सागता यायचें नाहीं हें अंगावर काटा आल्याचा अभिनय करून त्यानें सागितलें. शेवटीं बायकांचा तर धीरच सुटला. बत्ताशीच्या भोवतीं वेढा घालून ओक्साबोक्शीं रडावयाला त्यांनीं सुरुवात केली. चंगम्मा तर रडून रडून आणि केस पिंजारून एकाद्या हडळीसारखी दिसूं लागली. आणि कांहीं वेळानें तिच्या अंगांत डाकिणीचाच संचार झाला. ती ताडकन् एकदम उठली आणि बत्ताशीच्या कमरेभोवतीं मिठी मारून तिनें तिला वर उचललें.

"कशी जात नाहींस त्याच्याकडे तें बघतें! मीच तुला त्याच्याकडे नेऊन

पोहोंचवतें!" भेसूर आवाजात चंगम्मा ओरडली.

सहनशीलतेवरचा तो ताण बत्ताशीला असह्य झाला. तिच्या निश्चयाचा आणि धैर्याचा अधिक टिकाव लागणें ह्यामुळें आतां अशक्य होतें.

"सोडा मला! जातें मी!" बत्ताशी दीनवाण्या स्वरात म्हणाली.

हर्षाच्या भरांत चगम्मानें तिला दाणकन् खाली आदळले. बत्ताशीनें स्वतःला कसेंबसें सावरलें आणि ती स्वामीजींकडे धावत गेली. त्या अंधारातसुद्धां त्यांची दाढीवाली वृद्ध आकृति स्पष्टपणें ओळखूं येत होती.

स्वामीजींच्या पायावर डोकें ठेवून बत्ताशी म्हणाली, "बाबा, सर्वांनीं मला त्या सैतानाकडे जावयाला सांगितलें, पण तुम्हीं मात्र सागितले नाहींत. तुमचें हृदय मीं ओळखलें. पण आता त्याच्याकडे जातें. मला क्षमा करा अन् तुमचा आशीर्वाद द्या."

स्वामीजींच्या डोळयातून एकदम घळघळा अश्रू वाहूं लागले. अंधारात ते कोणाला दिसण्यासारखे नव्हते.

"बेटा—" सद्गदित स्वरांत ते म्हणाले, "कशाला माझा आशीर्वाद मागतेस? मी पापी आहें! आम्ही सर्व पापी आहोंत. प्राणाच्या लोभानें आम्ही पाप करतों आहोत! तूं पापी नाहींस. परमेश्वर ह्या पापाबद्दल आम्हांला कधीं क्षमा करणार नाहीं. तुझें मात्र तो कल्याणच करील!"

बत्ताशी शातपणें उठली आणि स्वतःच्याच पावलानीं त्या 'वाघाच्या गुहें'त चालत गेली. अर्ध्यापाऊण तासानें मोटरीमध्यें सामान भरावयाचा शिपायांना आतून हुकूम सुटला. दहा मिनिटांच्या आंत मोटरींत सर्व सामान भरलें गेलें. बायकामंडळी हर्षभरित अंतःकरणांनीं आत जाऊन बसली. बत्ताशीच्या मिठाईची टोपली चंगम्माच्या हातीं लागली. तिनें एकटीनें त्या टोपलीचा फडशा उडवून टाकला. बाकीच्या बायकांनीं तिच्या फळांचा करंडा संपवून टाकला.

"चलो, स्वामीजी!" मोटर निघायच्या वेळीं लालाजी स्वामीजींना म्हणाले. स्वामीजी अंधारात स्वतःशींच रामधून म्हणत बसले होते. अन् बंगल्यामधून कॅप्टनसाहेबांच्या हास्याच्या मोठमोठ्यानें खिंकाळ्या उठत होत्या.

"तुम्ही जा, लालाजी. मी येत नाहीं!" स्वामीजी शांत स्वरानें म्हणाले. "मी येईन उद्या सकाळीं. तिला घेऊन—"

"अन् त्यांनीं तुमच्या जिवाला काहीं बरेंवाईट केलें तर?—" लालाजी घाबरून म्हणाले.

"आतां आणखीन् आपल्या जिवाचें कांहीं बरेंवाईट व्हावयाचें राहिलें आहे काय?" रुद्ध कंठानें स्वामीजी म्हणाले. "जा तुम्ही—"

लालाजी न बोलतां मोटरींत जाऊन बसले. मोटर निघून गेली. कुसूरला मोटर पोहोंचली त्या वेळीं बरोबर बारा वाजले होते. कुसूरच्या चौकामधल्या उंच खांबावर तिरंगी झेंडा चढत होता. मोटर थांबली. आतली मंडळी खालीं उतरून गर्दींत सामील झाली.

हजारों मुखातून एकदम आरोळी उठली, "भारतमाता की जय!"

हिंदुस्थानाच्या भूमीवर दोन स्वतंत्र राष्ट्राचा जन्म त्या वेळीं होत होता—आणि त्याच क्षणीं त्यांची फाळणी पण होत होती!

* * *

# २ कार्लाइलची बायको

कार्लाइल हा इंग्रजी वाङ्मयांतील एक अमर लेखक आहे. तेजस्वी, मोहक आणि प्रभावी गद्य लिहिणारा त्याच्यासारखा लेखक इंग्रजी भाषेंत क्वचित् होऊन गेला असेल. मानवी हृदयाचा आणि आत्म्याचा त्याचा अभ्यास अद्‌भुत होता. शेक्सपीअरच्या खालोखाल मानवी स्वभावाचीं इतकीं विविध आणि विलक्षण चित्रें एवढ्या कलात्मक कोमलतेनें आणि विदारक स्पष्टतेनें कोणत्याही लेखकानें रंगविलीं नसतील. मानवी जीवनाची कहाणी हा वाङ्मयाचा चिरंतन विषय असून कलावंतांनीं आणि लेखकांनीं ती कहाणी जशी घडली असेल तशी प्रामाणिकपणानें आणि निष्ठुरतेनें सांगितली पाहिजे हा त्याचा संदेश होता.

जीवनांतील सत्याचा तो महान् पुरस्कर्ता होता. इतिहासांतील अनेक थोर पुरुषांवर सत्याची कुऱ्हाड जशी त्यानें आयुष्यभर निर्दयतेनें चालविली, त्याचप्रमाणें आपल्या आयुष्याच्या अखेरीस त्या सत्याच्या कुऱ्हाडीचा घाव त्यानें आपल्यावरही मारून घेतला. आणि आपल्या जीवनांतील एक विलक्षण सत्य प्रकट करून त्यानें जगाला जबरदस्त धक्का दिला. 'मी एक महान् द्रष्टा, तत्त्वज्ञानी आणि आदर्श पुरुष आहें अशी माझ्या ग्रंथांवरून भावी पिढ्यांची समजूत होईल; पण तसा मी नाहीं. मी इतर सामान्य माणसांप्रमाणें एक स्वार्थी, उन्मत्त आणि निर्दय माणूस होतों आणि माझ्या जीवनांत आलेल्या एका बुद्धिमान्, प्रतिभाशाली आणि त्यागी स्त्रीचा मीं अत्यंत निर्दयतेनें छळ केलेला आहे हें जगाला समजलें पाहिजे,' असा जगाबाहेर पाऊल टाकतांना कार्लाइलनें आपल्या मित्राजवळ लेखी कबुलीजबाब देऊन ठेविला.

हा कबुलीजबाब जेव्हां प्रसिद्ध झाला तेव्हां इंग्लंडमध्यें विलक्षण खळबळ उडाली. आदराच्या आणि लोकप्रियतेच्या शिखरावर उभी असलेली कार्लाइलची भव्य मूर्ति एका आठवड्यांत एकदम कोलमडून खालीं पडली. एकाद्या शोकान्त नाटकांतील नायिकेबद्दल प्रेक्षकाला जशी सहानुभूति वाटते त्याप्रमाणें कार्लाइलची

बायको ही तत्काळ सर्वांच्या सहानुभूतीचा विषय बनली. तिच्या जीवनाची हृदयद्रावक कहाणी वाचून कार्लाइलचे वाचक अश्रू ढाळूं लागले. सर्व जगाचे अंतःकरण जाणणारा हा माणूस आपल्या पत्नीच्या बाबतींत इतका भावनाशून्य असावा आणि तिचें हृदय त्याला कळूं नये हें वाचून त्याना कार्लाइलचा मनस्वी राग आला—छे, चीड आली.

आपल्या जीवनातील हें भयानक सत्य प्रकट करून शत्रूनें देखील केलें नसते एवढें आपलें नुकसान कार्लाइलनें करून घेतलें, असें त्याचे कांहीं मित्र म्हणाले. पण कार्लाइलच्या वाङ्मयाचा आत्मा ज्यानीं ओळखला होता त्याना त्याचें मुळींच आश्चर्य वाटलें नाहीं. ते म्हणाले, "सत्य सागण्यांतच ज्याचा जन्म गेला आणि सत्यावांचून ज्यानें आपल्या साहित्यांत दुसरें कांहींच सागितलें नाहीं, अशा महान् लेखकाच्या सत्यनिष्ठेची ही प्रामाणिक आणि तर्कशुद्ध परिपूर्ति आहे. आपल्या पत्नीच्या जीवनाचें रहस्य जर कार्लाइलनें सागितलें नसतें, तर मात्र आपल्या जीवनाशीं आणि तत्त्वज्ञानाशीं त्यानें विश्वासघात केला, असाच कालांतरानें इतिहासानें निर्वाळा दिला असता."

एकाद्या देवतेला प्रसन्न करण्यासाठीं भक्तानें आपलें शिरकमल आपल्या हातानें तोडून तिच्या पायांवर वहावें तसें कार्लाइलचें हें कृत्य होतें. आपल्या मोठे-पणाच्या वेदिकेवर जिनें आपल्या जीवनाचें उघड्या डोळ्यांनीं बलिदान केलें, त्या थोर स्त्रीला शेवटीं तरी न्याय मिळावा एवढयासाठीं कार्लाइलनें आपल्या उन्नत मस्तकावरचा कीर्तिमुकुट धुळींत भिरकावून दिला; अन् हात जोडून आणि मस्तक वाकवून पश्चात्तप्त मुद्रेनें जनतेचें न्यायासन देईल ती शिक्षा पत्करण्यासाठीं तो जगासमोर उभा राहिला. कार्लाइलच्या बायकोची ही हृदय-द्रावक कथा मराठी वाचकांना आज आम्ही प्रथमच सांगत आहोत.

कार्लाइलच्या बायकोचा जन्म १४ जुलै १८०१ रोजीं हॅडिंग्टन येथें झाला. तिचें मूळचें नांव जीनी वेल्श असें होतें. तिचा बाप डॉ. वेल्श हा एक बुद्धि-मान् आणि लोकप्रिय डॉक्टर होता. दिसावयालाही तो मोठा देखणा होता. जीनीची आईही फार सुदर होती. त्यामुळें आईबापांच्या सौंदर्याचा वारसा जीनीला जन्मतःच प्राप्त झाला. एवढेंच नव्हे तर सौंदर्याबरोबरच तिला त्यांच्याकडून बुद्धिमत्ता आणि संपत्ति यांचाही पण लाभ झाला.

आईबापांची ती एकुलती एक मुलगी असल्यानें लहानपणापासून ती अगदीं लाडांत आणि श्रीमंतींत वाढली. कोणत्याही गोष्टीची म्हणून तिला कमतरता

नव्हती. त्या दृष्टीनें मोठी भाग्यशाली मुलगी होती ती. ह्यामुळेंच तिची वृत्ति आनदी, खेळकर, रंगेल आणि हट्टी बनली.

मुलीपेक्षा मुलांमध्यें खेळणें तिला अधिक आवडे. अभ्यासांत, खेळण्यांत, धाडसाच्या कामांत आणि मारामारींत ती मुलानाही मागे टाकी. एकदां एका मुलाशीं ती 'मुष्टियुद्ध' खेळली, आणि त्याला तिनें चागलें बदडून काढलें. उंच उंच झाडावर आणि घरांच्या भिंतींवर चढून बसावयाचा त्यावेळीं तिला नाद असे. अभ्यासामध्येंसुद्धा सामान्यतः मुलाना जे विषय आवडत तेच तिलाही आवडत. गणित आणि लॅटिन हे विषय मुली क्वचित् घेत. पण जीनीनें त्या विषयामध्यें विलक्षण प्रगति दाखविली. भूमितीमधलीं अवघड अवघड उदाहरणें सोडविण्यांत तिचा हातखंडा असे.

ती अभ्यासासाठीं पहाटे पांच वाजता नियमितपणें उठे. लवकर उठतां यावें म्हणून ती पायाला एकादें वजन बाधून ठेवी. सागावयाची गोष्ट म्हणजे ही कीं, एकदा एकादा नाद तिनें घेतला कीं ती त्याचा अगदीं पिच्छा पुरविल्याखेरीज राहात नसे. लॅटिनच्या जोडीला तिनें फ्रेंच आणि इटालिअन याही भाषाचा अभ्यास केला. पुढें पुढें तिला कविता रचण्याचाही छंद लागला. अशा रीतीनें तिच्या आयुष्याचीं पहिलीं अठरा वर्षें अतिशय आनंदांत आणि उद्योगामध्यें गेलीं.

अठराव्या वर्षीं तिच्यावर एक संकट आलें. तिचे वडील दोषी तापानें एकाएकीं मरण पावले. जीनीचें आपल्या वडिलांवर अतिशय प्रेम होतें. तिला आपल्या आईपेक्षा वडिलांचेंच अधिक आकर्षण वाटे. आणि वडिलांनाही जीनीचा फार लळा होता. आपल्या व्यवसायाच्या निमित्तानें त्यांना तालुक्यामधून पुष्कळदां हिंडावें लागे. त्या वेळीं अनेकदां ते जीनीला बरोबर घेऊन जात. आणि मग अनेक विषयांवर ते जीनीशीं मोकळेपणानें बोलत. त्यामुळें दोन समवयीन मित्रांमध्यें जशी गट्टी जमावी तशी उभयतांची दोस्ती जमली. म्हणून बापाच्या मरण्यानें जीनीला अपरंपार दुःख झालें. तिच्या आयुष्यांतला एक मित्र आणि मार्गदर्शक गेला. आणि तो अशा वेळीं गेला कीं ज्या वयांत तिला त्याच्या मार्गदर्शनाची अतिशय आवश्यकता होती.

जीनी ही केवळ कोमल अंतःकरणाची आणि निव्वळ भावनाप्रधान मुलगी नव्हती. भावनेपेक्षां कल्पनेची आणि अनुभवाची उत्कटता तिच्यामध्यें अधिक होती. मनानें तशी ती पुरुषाप्रमाणें कठोर आणि विवेचक होती. असा स्वभाव

असणें हें स्त्रीला मोठें धोक्याचें असतें. कारण अशा स्त्रियांच्या जीवनामध्यें बुद्धि आणि भावना यांचा झगडा नेहमीं चालू असतो. आणि एकदां त्यांच्या मनाला एकाद्या गोष्टीचें आकर्षण वाटलें कीं, तेवढ्यासाठीं आपलें सर्वस्व खर्च करायला त्या मागेंपुढें पाहात नाहींत. जीनीच्या शोककथेचीं बीजें या तिच्या विशिष्ट स्वभावांत सांठविलेलीं होतीं.

या वयांत अनेक तरुण पुरुष तिच्या सांनिध्यांत आले. प्रारंभीं तिला त्यांच्याबद्दल जें विलक्षण आकर्षण वाटे, तें कांहीं दिवस किंवा महिने गेले म्हणजे पार नाहींसें होई. या काळांतील तिचीं जीं अनेक पत्रें उपलब्ध आहेत त्यांवरून तिच्या या अस्थिर स्वभावाची चांगली ओळख पटते. बेंजामिन नांवाचा एक तरुण तिला भेटला. त्याच्याबद्दल तिला एकदम आकर्षण वाटूं लागलें. एकदां तो नदीच्या पैलतीरावर उभा होता आणि जीनी अलीकडच्या तीरावर उभी होती. या प्रसंगाबद्दल तिनें आपल्या एका पत्रांत असें लिहून ठेविलें आहे कीं, "त्याला भेटण्यासाठीं नदी पोहून जावें असें त्या वेळीं मला वाटलें." पण कांहीं काळानंतर याच माणसाबद्दल तिचें मत एकदम इतकें पालटलें कीं, "पृथ्वीतलावर इतका तिरस्करणीय माणूस दुसरा कोणी नसेल" असें तिला वाटूं लागलें.

जॉर्ज टेनी नांवाच्या दुसऱ्या एका तरुणाशीं तिची मैत्री जडली. "हा तरुण अत्यंत हुषार आणि महत्त्वाकांक्षी आहे, पण तो आकर्षक नाहीं," असें आपल्या एका पत्रांत तिनें म्हटलें आहे. तर दुसऱ्या पत्रांत ती लिहिते, "जॉर्जचा मला मनांतून इतका राग येतो कीं त्याचें तोंड पाहूं नये असें वाटतें. पण त्याचीं पावलें वाजूं लागलीं कीं मी चटकन् आरशांत पाहून माझी वेषभूषा व्यवस्थित करूं लागतें." जीनीच्या चंचल आणि अनिश्चयी स्वभावाचा पुढें या जॉर्जलाच इतका कंटाळा आला कीं त्यानें तिचा नाद सोडून दुसऱ्याच एका मुलीशीं लग्न केलें. दोघांनीं एकमेकांचा निरोप घेतला त्या प्रसंगाचें वर्णनही जीनीनें आपल्या एका पत्रांत करून ठेवलें आहे. ती म्हणते, "निरोप घेतांना जॉर्ज काय बोलला त्यांतलें एक अक्षरसुद्धां मला ऐकूं आलें तर शपथ. इतकी माझी छाती आंतून धडधड उडत होती."

या काळांत जीनीला कादंबऱ्या वाचण्याचा विलक्षण नाद लागला आणि मौजेची गोष्ट ही कीं ती त्या कादंबऱ्यांमधील नायकांच्याच प्रेमपाशांत पडूं लागली. प्रत्यक्ष जीवनांत तिला ज्या तरुणाविषयीं आकर्षण वाटे त्या तरुणाची

ती त्या कादंबऱ्यांतील नायकांशीं तुलना करी आणि त्याबरोबर त्या तरुणाचें तिच्या मनांतील आकर्षण पार नाहींसें होई. रूसोच्या कादंबऱ्यांतील कांहीं नायकाचा उल्लेख करून तिनें एका पत्रांत असें लिहिलें आहे कीं, "सेंट प्रोसारखा प्रियकर मला कधीं मिळेल काय? वोल्मरसारखा पति मला आयुष्यांत कधीं लाभेल काय? या दोन नायकांशीं ज्याचें साम्य नाहीं अशा कोणाही तरुणाला मी माझें हृदय अर्पण करणार नाहीं. माझ्या ओळखीचे जॉर्ज रेनी, जेम्स एटकिन्, रॉबर्ट मॅकटर्क, जेम्स् बेर्ड हे आठवले कीं माझी मला लाज वाटूं लागते. देवा, देवा, कुठें सेंट प्रो आणि वोल्मर आणि कुठें हे लोक!"

रूसोची जूली इटांग नांवाची एक दुर्वर्तनी नायिका आहे. हिचा अनेक पुरुषांशीं संबंध आलेला त्यानें दाखविला आहे. तिच्याबद्दल जीनीनें असें लिहून ठेविलें आहे कीं, "जूलीसारखी मैत्रीण मला कदाचित् आवडणार नाहीं. पण तिच्या आयुष्यांतला मोह आणि पश्चात्ताप यांचा झगडा पाहिला कीं, एखाद्या पतिव्रतेपेक्षांही मला तिच्याबद्दल जास्त आदर वाटूं लागतो." एकोणिसाव्या शतकांत स्कॉटलंडमधल्या एका खेडेगांवांत राहणाऱ्या जीनीसारख्या एका अविवाहित तरुण मुलीच्या मनांत चाललेले हे विचार पाहिले म्हणजे तिच्या बुद्धिप्रगल्भतेचें आश्चर्य वाटूं लागतें.

त्याच सुमारास जीनीच्या आयुष्यांतली एक गंभीर प्रणयघटना घडून आली. तिच्या शाळेमध्यें एडवर्ड आयर्व्हिंग नांवाचा एक तरुण शिक्षक आला. तो उंच, देखणा आणि आकर्षक होता. त्याची जीनीला शिकवणी ठेवण्यांत आली. गुरु आणि शिष्या यांच्यामध्यें अगदीं आरंभापासूनच आकर्षण निर्माण झालें. या आकर्षणाचें रूपांतर साहजिकच प्रेमांत झालें. जीनीच्या स्वभावांतले दोष आयर्व्हिंग ओळखून होता. तो त्यांजबद्दल उघडपणें तिच्याशीं चर्चा करी आणि कठोर शब्दांमध्यें तिच्यावर टीका करी. तथापि असें असूनही तिजवरील त्याच्या प्रेमाची तीव्रता दिवसेंदिवस वाढतच गेली.

पण जीनीशीं ओळख होण्याआधीं मिस् मार्टिन नांवाच्या एका मुलीशीं आयर्व्हिंगचें लग्न ठरलें होतें. त्या मुलीच्या आईबापांना आयर्व्हिंगनें स्पष्टपणें सागितलें कीं, "माझें प्रेम आतां जीनीवर बसलें आहे, तेव्हां मला तुमच्या मुलीशीं लग्न करतां येणें अशक्य आहे." पण मिस् मार्टिन आणि तिचे आई-बाप कांहीं लेचेपेचे नव्हते. तीं मोठीं व्यवहारीं माणसें होतीं. त्यांनीं आयर्व्हिंगला पूर्वीच्या करारांतून मुक्त करण्याचें साफ नाकारलें. त्याचा परिणाम असा झाला

कीं, आयर्व्हिंगला जीनीच्या प्रेमावर पाणी सोडून मिस मार्टिनशींच लग्न करावें लागलें.

या प्रेमभंगाचा जीनीच्या मनावर अतिशय परिणाम झाला. ते दुःख विसरण्यासाठीं अन् धैर्य नि समाधान मिळविण्यासाठीं तिनें वाङ्मयाच्या सागरात उडी मारली. अष्टौप्रहर ती पुस्तकाचे भारे घेऊन वाचीत बसूं लागली. जर्मन भाषा शिकावयाला तिनें याच मनःस्थितींत प्रारंभ केला. आयर्व्हिंगची बदली दुसऱ्या गावीं झालेली होती. तथापि, तो मधून मधून जीनीला भेटण्यास येत असे. तिला तो विसरणें शक्यच नव्हते. अजून कांहीं चमत्कार होईल अन् आपलें जीनीशीं लग्न होईल असें त्याला मधून मधून वाटत असे. प्रेमभंग झालेल्या दुर्दैवी जीवाना असेंच वाटत असतें.

एके दिवशीं जीनीला भेटावयाला आयर्व्हिंग आला असताना तो आपल्याबरोबर एक मित्र घेऊन आला. तो दिसावयाला फारसा आकर्षक नव्हता. त्याची प्रकृतीही विशेष चांगली नव्हती. पण अद्वितीय बुद्धिमत्ता आणि थोर सौजन्य यांचा सोज्वळ संगम त्याच्या ठिकाणीं झालेला होता. त्यामुळें जीनीच्या मनावर प्रथमदर्शनींच त्याची छाप पडली हें सांगावयास नको. जर्मन भाषेवरील उभयताच्या प्रेमामुळें त्यांच्या त्या आकर्षणात आणखीच भर पडली. आयर्व्हिंगनें जीनीच्या आयुष्यात आणलेला त्याचा हा मित्र म्हणजेच थॉमस कार्लाइल होय. एका प्रियकरानें आपल्या प्रणयिनीच्या आयुष्यात दुसऱ्या प्रियकराला आणून सोडावें, हा योगायोग विलक्षणच म्हटला पाहिजे.

कार्लाइलची आणि जीनीची प्रथम भेट ज्या क्षणीं झाली ती संध्याकाळची वेळ होती. या भेटीचें वर्णन कार्लाइलनें पुढीलप्रमाणें नमूद करून ठेवलें आहे: "माझा मित्र एडवर्ड आयर्व्हिंग याच्याबरोबर एक दिवस मी हॅडिंग्टन येथें गेलो. आम्ही पायवाटेनें गप्पा मारीत मारीत असेच भटकत चाललों होतों. संध्याकाळची वेळ होती. लाल अंधुक संधिप्रकाश पडलेला होता. धुळीनें किंवा जलकणांनीं आकाश व्याप्त झालें होतें. अशा वेळीं माझ्या जीवनांत जिला पुढें स्थान प्राप्त झालें त्या प्रभावी मूर्तीला मीं प्रथम पाहिलें. मी तिच्या आईच्या घरांत तीनचार दिवस राहिलों. रोज संध्याकाळीं तासन् तास आम्ही बोलत बसत असूं. इतकी सुंदर, तेजस्वी आणि उत्कट होती ती! वाङ्मय हेंच तिच्या जीवनांतलें उच्चतम ध्येय होतें. ज्या जीवनांत पुस्तकें नाहींत किंवा बुद्धीची हालचाल नाहीं तें जीवन तिला बंदिवासासारखें वाटत होतें."

जीनीच्या सौंदर्यानें कार्लाइलच्या मनावर जसा परिणाम केला, तसा कार्लाइलच्या प्रभावी व्यक्तिमत्त्वाचाही जीनीच्या मनावर परिणाम झाल्यावाचून राहिला नाहीं. तथापि मौजेची गोष्ट अशी कीं, त्याच्या बुद्धिमत्तेपेक्षा तिला त्याच्या खेडवळ खडबडीतपणाचें आणि शारीरिक दुबळेपणाचेंच अधिक आकर्षण वाटलें. जीनीच्या स्वभावाची बैठकच अशी काहीं विलक्षण होती. तिच्या कल्पनेचा उगम तिच्या भावनेमधून होत असे. तर कार्लाइलचा स्वभाव तिच्या अगदीं उलट होता. त्याची भावना त्याच्या कल्पनेमधून उगम पावत असे.

जगांतील सौंदर्याचा आस्वाद इंद्रियजन्य अनुभवानें न घेता बुद्धीनें घेण्याची त्याची प्रवृत्ति होती. जगांतील सामान्य माणसाच्या जीवनांत प्रेम हा विकार असतो, तर कार्लाइलसारख्या अद्वितीय प्रतिभेच्या माणसाच्या जीवनांत प्रेम हा विचार असतो. प्रेमानें त्याच्या भावनेचा प्रक्षोभ न होतां, त्याच्या बुद्धींत वादळ माजतें. प्रेमामुळें त्याच्या बुद्धींत विलक्षण सामर्थ्य निर्माण होतें आणि त्याच्या प्रतिभेला चालना मिळते. यामुळेंच कवि आणि साहित्यिक हे सुंदर स्त्रियांच्या वर्चस्वाखाली सहज येऊं शकतात. आणि पुष्कळ वेळा ते प्रेमाचें केवढें मधुर आणि मनोहर काव्य लिहू शकतात ! कोमलतेनें आणि सौंदर्यानें लसलसणारे शेकडों उदात्त उत्तारे कार्लाइलच्या वाङ्मयामधून काढून दाखवितां येतील.

पण प्रेमविषयावर स्वामित्व गाजविण्याची उत्कटता त्याच्या अंगीं नव्हती. तो एक नुसता स्वप्नाळू ध्येयवादी कवि होता. भोगवादी माणसाचा जोम आणि रग हीं त्याच्यामध्यें मुळीच नव्हतीं. या दृष्टीनें जीनी वेल्शचा स्वभाव त्याच्या स्वभावाशीं मुळींच जमण्यासारखा नव्हता. पण कार्लाइलच्या प्रभावी आकर्षणाचा प्रतिकार करणें तिला अशक्य होतें. तिच्या अंतःकरणांत एक विलक्षण झगडा सुरू झाला. कार्लाइलशीं लग्न करण्याची तिची इच्छा नव्हती. पण तो आपल्यावर प्रेम करतो आहे या विचारानें तिला मनस्वी आनंद होत होता. एवढा लोकोत्तर बुद्धिमत्तेचा पुरुष आपल्या पायाशीं लोळण घेतो आहे या जाणिवेचा उन्माद तिच्या डोक्यांत शिरल्याशिवाय कसा राहील ?

काय करावें हेंच तिला कळेना. एकदा ती कार्लाइलला सांगे कीं, तूं माझ्या जीवनांत क्रान्ति केली आहेस, तर दुसऱ्या क्षणीं ती त्याच्या विद्वत्ताप्रचुर बोलण्याची आणि त्याच्या काव्यमय प्रणयाराधनाची थट्टा करी. कधीं ती त्याला आपल्या भाषणानें आणि भावनेनें वेडें करी, तर कधीं ती त्याच्याशीं भांडून त्याला घाबरवून टाकी. अशा तऱ्हेनें कार्लाइलच्या भावनेशीं किती तरी दिवस ती

नुसती खेळत होती. त्यामुळें गरीब बिचारा कार्लाइल अगदीं रंजीस येई. तो तिला म्हणे, "तुझ्यामध्यें कित्येक वेळां पिशाच्चाचा संचार होत असावा असें मला वाटतें!"

जेव्हां जीनीला कोणत्या तरी कारणामुळें वैताग येई तेव्हां ती कार्लाइलला अशीं सुंदर प्रेमाचीं पत्रें लिही कीं त्याला वाटे आतां आपल्याशीं लग्न करण्याची हिच्या मनाची तयारी झालेली आहे. पण लागलेच दुसऱ्या डाकेनें त्याला अशा तऱ्हेचें पत्र येई कीं : "प्रिय मित्रा, माझें तुझ्यावर प्रेम आहे. अतिशय प्रेम आहे. असें बोलणें अविचाराचें आहे हें मी जाणतें. तरी पण बोलतें, माझ्या स्वभावांतील सर्व उदात्तता तुझ्यावर प्रेम करण्यात प्रकट होते. पण तूं माझा भाऊ असतास तरी मीं तुझ्यावर असेंच प्रेम केलें असतें. पण हें बघ, मी तुझी केवळ एकनिष्ठ मैत्रीणच राहीन—जिवंत जीव असेतों-पर्यंत. पण तुझी पत्नी ? छे! नाहीं—नाहीं. कदापि नाहीं. मग तूं संपत्तीच्या आणि कीर्तीच्या कितीही उंच शिखरावर जाऊन बसलास तरी—" असलें पत्र वाचल्यानंतर कार्लाइलच्या मनाची काय स्थिति होत असेल याची कल्पना करतां येण्यासारखी आहे.

वास्तविक त्याच वेळीं कार्लाइलसारख्या बुद्धिमान् माणसानें उमगावयास पाहिजे होतें कीं, या मुलीचा आणि आपला स्वभाव जमण्यासारखा नाहीं. पण मानवी जीवन हें इतकें चमत्कारिक आहे कीं कांहीं कांहीं गोष्टी त्याच्या डोळ्या-समोर घडल्या तरी त्या त्याला दिसत नाहींत आणि दिसल्या तरी उमगत नाहींत. विवाहाच्या बाबतींत तरी माणसाची अशी हमखास मनःस्थिति होते. पुष्कळ वेळां आपली बुद्धि जो निर्णय घेते, त्याच्या उलट दिशेनें आपण चालत जातों. आणि हें करावें का तें करावें अशा अनिश्चयाच्या मनःस्थितींत पुष्कळसा वेळ गेला म्हणजे इच्छाशक्तीही निर्जीव होऊं लागते.

आणि स्त्री-पुरुषाची पुष्कळ दिवस ओळख किंवा मैत्री असली म्हणजे त्यांचे स्वभाव एकमेकांशीं जमण्यासारखे नसले तरी त्यांच्या मनांत एकमेकांवर हक्क गाजविण्याची किंवा एकमेकांपासून विशेष अपेक्षा बाळगण्याची प्रवृत्ति निर्माण होते. जसा जसा काळ अधिक जातो तसा तसा हा मैत्रीचा दुवा तुटूं नये असें त्यांना मनांतून उत्कटपणें वाटूं लागतें. त्यांतून पुरुषाची प्रवृत्ति आक्रमणाची असते, तर स्त्री ही निष्ठावंत असते. ह्यामुळें बुडणारीं माणसें जशीं एकमेकांना घट्ट मिठी मारतात, त्याप्रमाणें स्त्रीपुरुषांच्या दीर्घकालीन विरोधामधूनच पुष्कळ

वेळां त्यांचें ऐक्य घडून येतें. कार्लाइल आणि जीनी यांच्या बाबतींत नेमकें असेंच घडून आलें.

जवळजवळ पांच वर्षेपर्यंत उभयतांमध्यें हें प्रणयाचें युद्ध चाललें होतें. या कालामध्यें या दोघांनीं एकमेकांना शेकडो पत्रे लिहिलीं. दोन विलक्षण बुद्धिमान् आणि प्रतिभाशाली व्यक्तींनीं भावनेच्या आवेगांत लिहिलेलीं हीं पत्रे आहेत. यांना प्रेमपत्रे म्हणणें योग्य होणार नाहीं. पण कादंबरीच्या कक्षेबाहेर लिहिलेलीं इतकीं आकर्षक आणि विलक्षण पत्रे क्वचितच आढळून येतील. स्त्रीपुरुषाच्या भावनांमधील आणि विचारांमधील अनेक सूक्ष्म गुंतागुंती हीं पत्रें वाचलीं म्हणजे समजून येतील.

एका पत्रांत कार्लाइलनें जीनीला लिहिलें आहे. "तूं एकसारखी हसतेस नि थट्टा करतेस. त्या वेळीं भारी आकर्षक दिसतेस. पण मला तें आवडत नाहीं. तुझी मुद्रा उदास अन् विषण्ण असावी असें मला मनांतून वाटतें. आणि तेंच तुझ्या हिताचेंही आहे. उत्कट, प्रेमळ अन् गंभीर जेनवर माझें खरें प्रेम आहे. चपळ, खेळकर अन् थट्टेखोर जेन मला आवडत नाहीं. तुझ्या स्वभावांत अशी प्रवृत्ति असावी ही खरोखरच दुःखाची गोष्ट आहे." या पत्रावरून उभयतांच्या स्वभावविरोधावर विशेष प्रकाश पडतो.

त्यानंतर जीनीनें कार्लाइलला लिहिलेलें एक पत्रही मोठें विलक्षण आहे. ती त्याला लिहिते: "मी तुझ्यावर प्रेम करतें. आणि तसें जर नसतें तर मी अत्यंत कृतघ्न आणि मूर्ख ठरलें असतें. पण तुझ्याबद्दल मला प्रेमाची ओढ नाहीं. म्हणजे माझ्या बुद्धीला आणि अस्तित्वाला सर्वस्वीं झाकून टाकील असें माझ्या भावनेचें स्वरूप नाहीं. आदर आणि सहानुभूति या दोन भावनांवर आधारलेली ती सरळ, प्रामाणिक आणि स्थिर ममता आहे. त्यामुळें कौटुंबिक सुखाची इमारत उभारण्याच्या दृष्टीनें ती अधिक योग्य आहे. सारांश, माझें तुझ्यावरील प्रेम जीवन घडविणारें नाहीं; जीवनावर परिणाम करणारें आहे."

मध्यंतरीं कार्लाइलला असें वाटलें कीं आपण शहरांत राहण्यापेक्षां खेडवळ वातावरणांत राहावें. म्हणून स्कॉटलंडमधील एक शेत विकत घेण्याचा आपला विचार आहे असें त्यानें जीनीला कळविलें. खेडवळ वातावरणाचा जीनीला तर मनस्वी तिरस्कार होता. पण कार्लाइलची थट्टा करण्यासाठीं ती त्याला म्हणाली कीं, "क्रेगनपुटक येथें माझें शेत आहे. तेंच कां तूं घेत नाहींस?" क्रेगन-पुटक हें ठिकाण इतकें निर्जन आणि रुक्ष होतें कीं तेथें जाऊन राहण्याची

कल्पनाही कोणाला सहन झाली नसती. पण जीनी आपली मस्करी करते आहे हें त्याच्या मुळीं लक्षातच आलें नाहीं.

त्यानें क्रेगनपुटकला जाऊन स्थायिक होण्याचा अत्यंत गंभीरपणें विचार करावयास सुरुवात केली. तें ठिकाण त्याच्या डोक्यांत जाऊन जें एकदां बसलें तें कायमचें. क्रेगनपुटक म्हणजे त्याला जणुं काहीं स्वर्ग आहे असेंच वाटूं लागलें. जगापासून दूरदूर क्रेगनपुटकला जावयाचें अन् जीनीच्या सहवासांत त्या निर्जन स्थळाचें नंदनवन बनवावयाचें हेंच त्याच्या जीवनाचें त्यानंतरचें स्वप्न होऊन बसले.

प्रेमाच्या वेडामध्यें एक विचार मोठा प्रभावी असतो, आणि तो म्हणजे प्रेमिकाना आपल्याखेरीज बाहेरचें जग अनावश्यक आणि त्रासदायक वाटूं लागतें. म्हणून प्रेमाच्या पहिल्या भरांत तीं एकांतवासात जाऊन राहण्याच्या गोष्टी करूं लागतात. पण कार्लाइल जीनीवर जितका आषक होता तितकी जीनी त्याच्यावर थोडीच आषक होती! वर दिलेल्या पत्रात तिनें कार्लाइलला स्पष्टपणेंच सागितलें होतें कीं, "मी तुझ्यावर प्रेम करतें, पण मी तुझ्या प्रेमात पडलेलीं नाहीं."

कार्लाइलच्या डोक्यांत प्रेमानें भयंकर गोधळ माजविलेला होता. पण जीनी त्या मानानें पुष्कळच शुद्धीवर होती. त्यामुळें कार्लाइलच्या जिवाचा किती तडफडाट होत असे हें त्याच्या या लेखावरून दिसून येईल: "माझी मनोदेवता गेले कित्येक महिने मला ओरडून सांगते आहे कीं, गृहस्था, तुझी अधोगति होत आहे. दिवसरात्र तूं आतून जळतो आहेस. तुझ्या हृदयांतील अमृताचें जहर होतें आहे. दुर्दैवी जीवा, ऊठ. देवाचें नांव घे आणि आपलें भवितव्य घडव. यातनांच्या नरकांत जळून नष्ट होण्यासाठीं तूं जन्माला आलेला नाहींस."

जेनच्या होकारानें त्या नरकांतून कार्लाइलची मुक्तता होणार होती. पण जीनीनें त्याला काय उत्तर दिलें तें पाहा: "शिक्षणाच्या, विनयाच्या, कर्तव्याच्या सर्व मर्यादा झुगारून देण्याची आणि वाटेल तो त्याग करण्याची शक्ति माझ्या प्रेमांत आहे. पण असें अमर्याद प्रेम जो माझ्या हृदयांत जागृत करील असा पुरुषोत्तम कुठें आहे? केवळ कल्पनेच्या सृष्टींत तो असूं शकेल. बाकी असें प्रेम माझ्या हृदयामधून अद्याप उचंबळत नाहीं, हें माझ्या हिताचेंच आहे. नाहीं तर पूर आलेल्या ओढ्याप्रमाणें तें विध्वंस करीतच माझ्या जीवनांतून जाईल. माझ्या प्रेमाचें स्वरूप अत्यंत शांत आहे हेंच बरें आहे. तुझ्याबद्दल मला काय वाटतें हें मागेंच मीं तुला सांगितलेलें आहे. तें सपाट प्रदेशात वाहणाऱ्या

आणि आजूबाजूच्या प्रदेशाला जीवन देणाऱ्या सरितेप्रमाणें शांत आणि गाढ आहे. उतारावरून बेफाटपणें उड्या मारणाऱ्या ओढ्याप्रमाणें नाहीं."

दुसऱ्या एका पत्रात ती त्याला लिहिते: "तुझ्याबद्दलच्या माझ्या भावनेंत सुधारणा व्हावी असें मला वाटतें. कारण पतीबद्दल अशी भावना असूं शकत नाहीं. पिता, भाऊ किंवा मित्र याच्याबद्दल अशी भावना असूं शकते. पतीबद्दल यापेक्षांही जास्त प्रेम वाटावयाला पाहिजे, नको का?" असें पत्र लिहिल्या-नतरही पुन्हा ती त्याला लिहिते: "मला जाणणारें या जगात तुझ्याखेरीज कोण आहे? तुझ्यापासून मी कशी दूर जाऊं? चल, उद्या आपण लग्न लावून टाकूं. केवळ मृत्यूनेंच किंवा परमेश्वराच्या कोपामुळेंच तुझा आणि माझा वियोग होऊं शकेल!"

कार्लाइलशीं लग्न करण्याला अशा रीतीनें जीनी कधीं कधीं मान्यता देई खरी, पण एक अत्यंत अनपेक्षित आणि आगंतुक घटना घडून आली नसती तर उभयतांचा एकमेकाशीं पत्रव्यवहार होऊनही त्याचें लग्न कधींही घडून आलें नसतें. ही घटना अत्यंत चमत्कारिक घडली.

लंडनमध्यें कार्लाइलची मिसेस् मॉटेग्यू नांवाच्या एका बाईशीं ओळख झाली. ही बाई मोठी सज्जन, दयाळू आणि भावनाप्रधान होती. जीनीचा पूर्वीचा प्रियकर एडवर्ड आयर्व्हिंग याची आणि या बाईचीही ओळख होती. जीनीच्या बाबतींत आपला कसा प्रेमभंग झाला हें रहस्य आयर्व्हिंगनें एकदां मॉटेग्यू बाईला सागितलें. आपली प्रेमकहाणी सागतांना साहजिकच आयर्व्हिंगनें जीनीच्या गुणाची आणि सौंदर्याची मनसोक्त स्तुति केली. तेव्हां मॉटेग्यू बाईला वाटलें कीं, खरोखरच आयर्व्हिंगचें जीनीशीं लग्न झालें असतें तर तो किती सुखी झाला असता!

त्याबरोबर ती उठली अन् तिनें जीनीला एक पत्र लिहिलें कीं, "तुझ्यावर आयर्व्हिंगचें अद्यापही प्रेम आहे. आणि तो तुझ्यासाठीं मनामधून झुरतो आहे." एवढें करूनही ती मूर्ख बाई थांबली का? तिनें कार्लाइलला तशाच अर्थाचें एक पत्र लिहून टाकलें. जीनीचें आणि कार्लाइलचें काय नातें होतें हें तिला माहीत असणें शक्य नव्हतें. तिची समजूत एवढीच होती कीं कार्लाइल हा आपल्याप्रमाणेंच जीनीचा अन् आयर्व्हिंगचा एक हितचिंतक आहे.

मॉटेग्यू बाईच्या या पत्रांनीं फारच विलक्षण परिस्थिति निर्माण केली. आपलें प्रेमरहस्य आयर्व्हिंगनें मॉटेग्यू बाईला सांगावें याची जीनीला चीड

आली. तिनें तिच्या पत्राला उत्तर देतांना तिला डिवचण्यासाठीं मुद्दाम असें लिहिलें कीं: "आयर्व्हिंगवर तर माझें प्रेम नाहीं. असणें शक्यच नाहीं. माझें कार्लाइलवर प्रेम आहे आणि त्याच्याशींच माझें लग्न ठरलेलें आहे." ज्या हेतूनें मॉटेग्यू बाईनें जीनीला पत्र लिहिलें त्याच्या उलट जीनीच्या मनावर त्याचा परिणाम झाला.

हें उत्तर आल्यानंतर तरी त्या बाईनें गप्प बसावयाचें कीं नाहीं ? तिनें पुन्हा जीनीला पत्र लिहिलें कीं: "कार्लाइलशीं तूं लग्न करूं नकोस. आयर्व्हिंगच तुझा पति होण्यास अधिक योग्य आहे. आज जरी त्याचा विवाह झाला असला तरी त्या बंधनांतून तो मोकळा होण्याची शक्यता आहे."

एवढा पत्रव्यवहार झाल्यानंतर साहजिकच जीनीला वाटलें कीं या साऱ्या गोष्टी कार्लाइलच्या कानांवर घालणें आपलें कर्तव्य आहे. म्हणून तिनें मॉंटेग्यू बाईशीं झालेला सर्व पत्रव्यवहार कार्लाइलला दाखविला. 'कार्लाइलशीं आपलें लग्न ठरलें आहे,' असें स्वहस्तानें जीनीनें मॉटेग्यू बाईला लिहिलेलें पत्र वाचून वास्तविक कार्लाइलला अतिशय आनंद व्हावयास पाहिजे होता. कारण अशा रीतीनें कां होईना, पण त्याच्याशीं लग्न करण्याची जीनीनें लेखी संमति दिली होती. पण मॉटेग्यू बाईच्या दुसऱ्या एका पत्राचा त्याच्या मनावर उरफाटाच परिणाम झाला. तो जीनीला म्हणाला, "मॉटेग्यू बाई म्हणते त्याप्रमाणें मी खरोखरच तुझा पति व्हायला लायक नाहीं. माझ्यात शारीरिक आणि मानसिक दोष अनेक आहेत. मी तुला सुखी करूं शकणार नाहीं."

कार्लाइलच्या या बोलण्यानें जीनीचें हृदय जास्तच विरघळलें. तिला त्याची दया आली. आतां या माणसाशीं लग्न करून त्याला सुखी करणें हें आपलें कर्तव्यच आहे अशी तिची पक्की समजूत झाली. शिवाय कार्लाइलशीं आपलें लग्न ठरलें आहे असें, मॉंटेग्यू बाईला चिडविण्यासाठीं कां होईना, पण ती लिहून बसली होती. त्या घोषणेची परिपूर्ति आपण केली नाहीं तर ती गोष्ट आपल्याला मानहानिकारक आहे असें तिच्यासारख्या स्वाभिमानी स्त्रीला वाटणें साहजिकच होतें.

या सर्व गोष्टींचा परिणाम असा झाला कीं, दोघांनींही एके दिवशीं एकत्र बसून लग्न करण्याचें निश्चित केलें. अशा रीतीनें कार्लाइल आणि जीनी यांचा विवाह घडवून आणण्याचें श्रेय मॉंटेग्यू बाईच्या मूर्खपणालाच द्यावें लागेल.

तथापि लग्न करण्याचें ठरल्यानंतर सुद्धां उभयतांमध्यें कांहीं कमी खळखळ

झाली नाहीं. लग्नाचा विधि म्हणजे एक 'भयंकर समारंभ' आहे असें जीनीनें एका पत्रांत लिहिलेलें आहे. ती म्हणते: "त्या भयंकर समारंभांत मीं आनंदी राहण्याचा निश्चय केला आहे." लग्नाआधीं कार्लाइलला तिनें लिहिलेलें एक पत्र अत्यंत हृदयद्रावक आहे. ती लिहिते: "माझ्या लाडक्या मित्रा, तूं माझ्याशीं नेहमीं चांगल्या रीतीनें वागत जा. मी तुला फार सुखी करीन बरें! माझ्यावर तुझे प्रेम आहे हें तुझ्या डोळ्यांतून आणि ओठातून मला कळलें म्हणजे सारें जग मला त्या क्षणीं तुच्छ वाटूं लागतें. पण तूं धूम्रपान करण्यासाठीं जेव्हा माझ्यापासून दूर जातोस आणि तुझ्या जीवनातील मी एक परिस्थिति आहें असें जेव्हा तूं मला सांगतोस तेव्हा माझे हृदय नाना तऱ्हेच्या शंकांनीं अस्वस्थ होतें."

पुरुषाच्या प्रेमाची स्त्रीहृदयाला लागून राहिलेली चिरंतन तृषा या पत्रांत प्रतिबिंबित झालेली आहे. पुरुषाच्या प्रेमाखेरीज स्त्रियाना दुसरें काहीही नको असतें. पण कार्लाइलला हें कधीं कळलेच नाहीं. स्त्रीहृदयाची उत्कटता जर त्याला समजली असती तर तो आणि त्याची बायको आयुष्यांत सुखी झालीं असतीं. पण आपल्या बायकोच्या आपल्यापासून काय अपेक्षा आहेत याकडे त्यानें कधीं लक्षच दिलें नाहीं. शिवाय त्याच्या स्वभावांतही कोणत्याही तऱ्हेची शिस्त नव्हती. त्याच्या मनावर त्याचा मुळींच ताबा नव्हता. दुसऱ्यावर हुकमत चालविण्याची त्याची जन्मजात प्रवृत्ति होती. तासन् तास तो स्वतःमध्येंच गर्क होऊन राही.

बायकाची साहजिक इच्छा असते कीं, आपल्या पतींनीं आपल्याकडे लक्ष द्यावें, आपल्याशीं ममतेनें वागावें आणि आपल्यासाठीं घस सोसावी. या अपेक्षा कार्लाइलकडून पूर्ण होण्यासारख्या नव्हत्या. कार्लाइलचें वैवाहिक जीवन पुढें दुःखी झालें याचें कारण म्हणजे त्याच्यात भावनेचा अभाव होता हें नसून आपल्या पत्नीचें हृदय समजून घेण्याचा त्यानें कधीं प्रयत्नच केला नाहीं, हें होय! लग्नाचा दिवस जसा जसा जवळ येऊं लागला तशा कार्लाइललाही कांहीं चमत्कारिक भावना होऊ लागल्या.

लग्न झाल्यानंतर आपल्या पत्नीशीं एकांतांत राहण्याचें त्याला भयच वाटूं लागलें. आणि एकांत कसा टाळतां येईल याच्या तो युक्त्या शोधूं लागला. मधुचंद्राला जातांना आपल्या भावाला घेऊन जाण्याची एक कल्पना त्यानें जीनीपुढें माडली. अर्थात् तिला ती मान्य होणें शक्यच नव्हतें. शेवटीं एका क्षुद्र

गोष्टीवर त्यानें जीनीकडून गंभीरपणें वचन घेतलें कीं, "लग्न झाल्यानंतर तीन सिगार दिवसांत तू मला ओढूं दिल्या पाहिजेस. त्यावर तूं कसलीही टीका न केली पाहिजेस. माझ्या समाधानाला ही गोष्ट अत्यावश्यक आहे."

अशा रीतीनें अनेक स्वभावदोषामुळें एकमेकाना अनुरूप नसलेल्या, पण अद्‌भुत आकर्षणामुळें इतकीं वर्षे एकमेकाकडे ओढल्या गेलेल्या या दोन महान् व्यक्ति अत्यंत चमत्कारिक मानसिक अवस्थेंत दैवाच्या विलक्षण योगायोगामुळें १७ ऑक्टोबर १८२६ रोजीं विवाहबंधनानें शेवटीं एकमेकाशीं जखडल्या गेल्या. येथूनच जीनीच्या बंदिवासाला अन् बलिदानाला प्रारंभ झाला असें म्हणावयास हरकत नाहीं.

विवाहानंतर काहीं थोडे महिने त्याचे सुखात गेले असतील. त्यानंतर कार्लाइलच्या स्वभावात हळूहळू बदल घडूं लागल्याचें जीनीच्या लक्षात आलें. प्रणयाराधनाच्या काळात जीनीच्या पियानोवादनाची आणि गाण्याची कार्लाइल नेहमीं स्तुति करी. पण लग्न झाल्यानतर तिला पियानो वाजविता येतो कीं नाही किंवा गाता येतें कीं नाही याची देखील त्याला विस्मृति पडली. जीनीला हें जाणवल्याखेरीज राहिलें नाहीं.

लेखनवाचनामध्यें कार्लाइलचा दिवसामधला बराचसा भाग जात असल्यानें उभयतामध्यें एक प्रकारचा तुटकपणा निर्माण झाला. सकाळची न्याहरी संपली कीं कार्लाइल आपल्या खोलीत बसे तो दुपारीं चार वाजेपर्यंत. तोंपर्यंत त्याची आणि जीनीची गाठ पडत नसे. तो एकटा काम करी, एकटा फिरायला जाई आणि आपल्या खोलींत एकटाच झोपत असे.

एडिनब्रोमध्यें तीं राहात असेपर्यंत हा एकातवास जीनीला इतका जाणवला नाहीं. पण कार्लाइलनें जेव्हा आपलें बिऱ्हाड क्रेगेनपुटकला हलविलें तेव्हां जीनीला आपल्या भयानक एकटेपणाची जाणीव होऊ लागली. लग्न होण्यापूर्वी क्रेगेनपुटकला जाण्याची कल्पना प्राण गेला असता तरी जीनीनें कधीं मान्य केली नसती. पण आता ती कार्लाइलची बायको झाली होती. क्रेगेनपुटकला जायचें कीं न जायचें हें ठरविण्याचें स्वातंत्र्य आतां तिला राहिलें नव्हतें.

क्रेगेनपुटकला जाऊन राहणें ही एक काळ्या पाण्याची शिक्षा होती असें म्हटलें तरी चालेल. एका दलदलीच्या जागेमधलें तें एक निर्जन बेट होतें. आजूबाजूला झाडें नव्हतीं कीं टेकड्या नव्हत्या. दृष्टीला समाधान होईल असें एकही दृश्य तेथून दिसत नव्हतें. कार्लाइल ज्या घरांत राहात होता तें घर दिसायला

भकास-आणि भेसूर होतें. तेथून अगदीं जवळचें घर एक मैल अंतरावर होतें आणि पोस्ट ऑफिस अन् डॉक्टर तेथून पंधरा मैल लांब होते. हिवाळ्यामध्यें तेथें इतका बर्फ पडे कीं, कित्येक दिवस बाहेरच्या जगाशीं क्रेगेनपुटकचा संबंध तुटे. अशा या भयानक जागीं आपलें सारें आयुष्य घालविण्याचें जीनीच्या नशिबीं आलें, ही दुर्दैवाची केवढी क्रूर घटना म्हटली पाहिजे !

लग्न करण्यापूर्वी तिच्या काय महत्त्वाकांक्षा होत्या ! कार्लाइलसारख्या अद्वितीय लेखकाची बायको म्हणून आपण समाजात मिरवूं. आपल्या बुद्धिमत्तेनें आणि आकर्षक संभाषणानें आपण साऱ्या विद्वानाना थक्क करून सोडूं. पण लग्न झाल्यानंतर या तिच्या सर्व आकांक्षांचा चक्काचूर होऊन गेला. आणि क्रेगेनपुटक येथें संन्यासिनीचें जीवन जगण्याचें तिच्या नशिबीं आलें.

कार्लाइलसारख्या लेखकाच्या सहवासात आल्यानें आपल्याही लेखन-प्रतिभेचा विकास होऊन लेखिका म्हणून आपल्याला जगात खूप कीर्ति मिळेल, ही तिची इच्छासुद्धा पूर्ण होऊं शकली नाहीं. कारण ती एक प्रतिभाशाली लेखिका आहे हेंदेखील कार्लाइल विसरून गेला. प्रणयाराधनाच्या कालात कार्लाइल तिच्याशीं जसा वागत होता, तशा तऱ्हेनें लग्नानंतर तो तिच्याशीं वागला असता तर क्रेगेनपुटकचा वनवास तिला जाणवला नसता. पण कार्लाइलच्या अखंड कार्य-व्यग्रतेमुळें तेथला वनवास तिला विशेषच भयानक वाटूं लागला.

एका घरात राहात असूनही दोघांची क्वचितच भेट होई. जेव्हां होई तेव्हां कार्लाइल दमलेला, उदास आणि चिडलेला असा असे. त्यामुळें जीनीला त्याच्या-बद्दल वाटणारा आदर लौकरच पार नाहींसा झाला. आपला नवरा अत्यंत स्वार्थी आणि निर्दय आहे, अशी तिची प्रामाणिक समजूत होऊन बसली. कार्लाइलचा स्वभाव लहानपणापासूनच अत्यंत कुरकुऱ्या आणि तक्रारखोर होता. त्याच्या उलट जीनीचा स्वभाव असे. आपल्या हृदयातील दुःख आणि यातना ती धैर्यानें आणि मुकाट्यानें सहन करीत असे.

रात्रीं कार्लाइलची एकादे वेळीं झोपमोड झाली तर त्याबद्दल एक आठवडाभर तरी त्याची बडबड चाले. पण एका रात्रींत जीनीला तीस वेळा उठावें लागलें तरी एका अक्षरानें त्याबद्दल ती कधी बोलत नसे. आपल्या शारीरिक दोषाबद्दल आणि दुखण्याबद्दल कार्लाइलची नेहमीं रडकथा चालू असे. तरी देखील तो शहायशीं वर्षेपर्यंत जगला. पण लग्न झाल्यानंतर लवकरच जीनीची प्रकृति हळूहळू बिघडूं लागली, तिकडे मात्र त्याचें कधींही लक्ष गेलें नाहीं. जीनीला कांहीं व्याधि

जडलेली असेल याचा विचारसुद्धां त्याच्या डोक्यांत कधीं आला नाहीं.

जीनीचें बालपण श्रीमंतींत आणि आरामात गेलें होतें. कष्टाचीं कामें करण्याची तिला मुळींच संवय नव्हती आणि तिचे मज्जाततु अतिशय नाजुक आणि संस्कारक्षम होते. क्रेगेनपुटक येथें त्याच्याजवळ एकच नोकर होता. त्यामुळें घरांतील बहुतेक सर्व कामें तिला स्वतःलाच करावीं लागत.

कार्लाइलच्या जेवणाची मोठी कटकट असे. त्याची पचनशक्ति अत्यंत दुर्बळ होती आणि खाण्याच्या बाबतींत तो मोठा चोखंदळ होता. बाहेरचा पाव त्याला पचत नसे. तेव्हा तिला तो स्वतःला घरातच बनवावा लागे. कार्लाइलला तिच्याच हातचें जेवण आवडे. बशा किंवा ताटें घाण असलीं कीं कार्लाइल एकदम भडकून उठे. तेव्हा सर्व भाडीं तिलाच घासून पुसून स्वच्छ ठेवावीं लागत.

गायींची धार काढणें, जमिनीची झाडलोट करणें, हीं कामेंही तिलाच करावीं लागत. हीं कामें बायकाचीच आहेत आणि तीं त्यानीं केलीच पाहिजेत, अशी ज्या पुरुषांची कल्पना असेल त्यानीं ती स्वतः एकदा आपल्या हातानीं करून पाहावींत, म्हणजे स्त्रियाच्या कष्टाची त्याना कल्पना येईल. बिचारी जीनी जेव्हा ओणवी होऊन जमीन घासघासून काढीत असे तेव्हा कार्लाइलमहाराज आपल्या आरामखुर्चीवर बसून आरामशीरपणे आपली चिलीम गुडगुड ओढीत बसलेले असत. हें दृश्य डोळ्यापुढें आलें कीं कोणालाही कार्लाइलचा मनस्वी राग आल्याखेरीज राहणार नाहीं.

क्रेगेनपुटक येथील आपल्या भयानक जीवनाचें अत्यत हृदयद्रावक शब्दचित्र जीनीनेंच आपल्या मैत्रिणीला लिहिलेल्या एका पत्रांत रेखाटलें आहे, तें वाचण्यासारखे आहे. ती लिहिते : "कोणत्याही गोष्टीचा मोठेपणा किंवा लहानपणा हा ज्या वृत्तीनें आपण ती करतों तीवर अवलंबून असतो, ही गोष्ट पुष्कळ लोक ओळखत नाहींत. म्हणून जगातील अनेक बुद्धिमान् आणि उत्साही लोक वाया जातात. महत्त्वाकाक्षी आणि सत्ता गाजवूं पाहणाऱ्या लोकाना हें तत्त्व समजलें नाहीं तर त्याना खचित वेड लागेल. मलाही जवळजवळ असें वेड लागण्याची पाळी आली होती. पण या तत्त्वाचा मला शोध लागला म्हणून मी वाचलें.

"क्रेगेनपुटक येथें माझ्या नवऱ्याबरोबर मी कित्येक वर्षें राहात आहें. अशी भयाण आणि निर्जन जागा जगात कुठें नसेल! आमची सापत्तिक स्थिति गरिबीची असल्यानें साहजिकच येथें आल्यापासून घरातील सर्व कामें मलाच

करणें भाग पडलें. आणि मला तर प्रारंभीं एकही काम येत नसे. कारण बापाच्या घरीं मी लहानपणापासून लाडांत वाढलेली होतें. शाळेंत मी लॅटिन शिकलें, गणित शिकलें; पण मला शिवता येत नव्हतें. नवरेलोकही असे चमत्कारिक असतात की, त्याच्या कोटाचीं बटनें तुटतात आणि पायमोज्यांना भोकें पडतात आणि सर्व गोष्टी आम्हीं बायकानीं शिवून द्याव्यात अशी त्याची अपेक्षा असते.

"जेवणही शिजविण्याचें काम मला लग्न झाल्यावर शिकणें जरूर पडलें. तशातून माझ्या नवऱ्याची पचनशक्ति वाईट असल्यानें मजवर भलतीच जबाबदारी पडली. बाजारातून आणलेला पाव त्याना पचत नसे. त्यामुळें त्याचें पोट बिघडे. म्हणून 'पाकक्रिये'चें पुस्तक आणवून पाव कसा करायचा हें अगदी त्याच्या श्रीगणेशापासून मला शिकावें लागलें. रात्रीं ज्या वेळीं मी बिछान्यात झोपलेली असावयाला पाहिजे त्या वेळीं स्वयंपाकघरात पावाच्या भट्टीसमोर मी उभी असें.

"घरातली सर्व मंडळी झोपलेली असत. घड्याळांत एकाचा ठोका वाजे. दोनाचा वाजे. तीनाचा वाजे. तरी मी आपली रात्रीच्या भयाण शाततेमध्यें एकटीच बसलेली असें. माझी छाती दुखून येई अन् अंग ठणकूं लागे. मला माझ्या असहायतेची चीड येई. लहानपणीं मीं माझ्या बौद्धिक गुणाचा विकास केला. आणि मोठेपणीं रात्रीच्या रात्री जागून पाव भाजण्याचें हे काम माझ्या नशिबी आले. या विचारानें माझे डोके फिरून जाई आणि मी टेबलावर डोकें ठेवून मोठमोठ्यानें रडत बसे.

"त्या वेळीं माझ्या मनांत हा विचार प्रथम आला कीं, मी या सर्व घटनेनें त्या पावाला विनाकारण महत्त्व देऊन स्वतःची निर्भर्त्सना करतें आहें. मनुष्य काय करतो याला महत्त्व नाहीं. त्याची इच्छाशक्ति, उत्साह, सहनशीलता आणि चातुर्य याच गोष्टी खरोखर कौतुक करण्यासारख्या आहेत. या एका कल्पनेमुळें त्या भयाण स्थलातलें माझें अनेक वर्षांचें जीवन मला सुसह्य झालें. आम्ही राहात होतों त्या भकास घरातले पूर्वीचे दोन बिऱ्हाडकरू वेडे झाले होते. आणि एक अट्टल दारूबाज बनला होता हें लक्षांत घेतलें म्हणजे माझ्यासारख्या महत्त्वकाक्षी बाईनें त्या संकटांतून स्वतःचें कसें रक्षण केलें याचें महत्त्व लक्षांत येईल."

जीनीचें हें पत्र म्हणजे वाङ्मयाचा एक उत्कृष्ट नमुनाच होय. यातना,

भावना, निराशा, दुःख यांच्या किती तरी सूक्ष्म आणि करुण छटा या पत्रांत प्रतिबिंबित झालेल्या आहेत!

श्रम, एकांतवास, विषण्णता आणि कार्लाइल्चा अबोल स्वभाव यांचा जीनीच्या शरीरावर आणि मनावर जो परिणाम व्हावयाचा तोच झाला. क्रेगेन-पुटकला एक वर्ष झालें नाहीं तोंच आनंदी, खेळकर आणि सुंदर जेन नाहींशी झाली आणि तिच्या चेहऱ्यावर भेसूर आणि गंभीर अवकळा दिसू लागली. तिचें हास्य आणि रंगेलपणा मावळला तो कायमचाच. कार्लाइलला तिचें हसूं आवडत नव्हतें ना? मग अगदीं त्याच्या मनाप्रमाणेंच तें झालें.

त्यामध्यें त्या वर्षीच्या हिवाळ्यात तिला घशाचा एक सासर्गिक रोग अकस्मात् झाला. पंधरा मैलाच्या अंतरावर डॉक्टरचा पत्ता नव्हता. जीनीची आई बर्फात आणि वादळात एकटी चालत गेली आणि डॉक्टरला घेऊन आली. त्या रोगांतून जीनी मोठ्या नशिबानें वाचली. पण त्या आजाराचा तिच्या मनाला जबर धक्का बसला. क्रेगेनपुटक येथे राहणे सुरक्षित नाहीं, कोणत्या वेळीं काय होईल कोणास ठाऊक, अशी भीति तिच्या मनात शिरून बसली.

पण जीनीच्या प्राणावर एवढें संकट येऊनही कार्लाइल्चे डोळे उघडले नाहींत. वर्षानुवर्ष कार्लाइल्चें जीवन एकाद्या भुतासारखे होत चाललें होते. तो दिवसभर एकटा माडीवर लिहीत बसलेला असे. त्याला तेथें कोणीही आलेलें खपत नसे. संध्याकाळीं माळावर एकटाच लांबवर तो फिरायला जाई. फिरून परत आल्यावर काहीं तरी विचाराचें चक्र त्याच्या डोक्यात फिरत असे. जीनीनें प्रेमळपणानें त्याला काहीं विचारावयाचा प्रयत्न केला कीं, तो रागानें किंवा तिरसटपणानें काहीं तरी चमत्कारिक उत्तर देई. जीनीच्या चेहऱ्याकडे तो कधींही बघत नसे. आणि त्यानें लक्षपूर्वक बघितले असतें तरी त्याला आकर्षित करील असें सौंदर्य तिच्या चेहऱ्यावर त्याला आढळलेंही नसतें.

जीनीचा चेहरा किंवा यातना हीं जरी कार्लाइलला दिसत नसली किंवा उमगत नसलीं तरी तो अगदींच अरसिक किंवा भावनाशून्य नव्हता. छे, छे, मुळींच नाहीं! अनंत कालपर्यंत भावी पिढ्यांना आनंद देणारें सरस तेजस्वी आणि वैभव-शाली वाङ्मय तो या काळात झपाट्यानें निर्माण करीत होता. फ्रेंच इतिहासातील आणि क्रांतीमधील वैशिष्ट्यपूर्ण व्यक्तींचीं अत्यंत रोमहर्षण व्यंगचित्रें रंगविण्यात तो या वेळीं गुंतलेला होता. भूतकाळाच्या आणि इतिहासाच्या प्रचंड दालना-मधून त्याची प्रतिभा वावरत होती. वर्तमानकाळाकडे त्याचें लक्ष होतें कुठें?

त्याला जेवूं घालणारी, त्याच्या कपड्यांची आणि शरीराची काळजी घेणारी एक दाई किंवा बाई त्याला पाहिजे होती. पत्नीची त्याला मुळींच आवश्यकता नव्हती. जीनीसारखी सुंदर, तेजस्वी आणि बुद्धिमान् स्त्री अशा पुरुषाची पत्नी झाली हें केवळ तिचें दुर्दैवच म्हटलें पाहिजे. त्याच्या संसार-शकटाच्या जोखडाखाली त्या कोमल आणि नाजुक जिवाचा अगदीं चुराडा होऊन गेला.

कार्लाइलचें जीनीवर प्रेम नव्हतें असें म्हणतां येणार नाहीं. ज्या स्त्रीच्या मनाचा आणि शरीराचा नाश त्याच्या हातून नकळत घडत होता तिजवर त्याचें अतिशय प्रेम होतें. जीनीची शोककथा त्यामुळेंच अतिशय विदारक आणि कारुण्यपूर्ण झाली आहे. तिच्या सर्व दुःखाला कारणीभूत झालेल्या माणसाला त्याची जाणीवही नव्हती. किंबहुना, पुष्कळ अंशीं तो त्या बाबतीत निरपराधीही होता. म्हणूनच जीनीच्या मृत्यूनंतर त्याला आपल्या हातून नकळत तिच्याबाबत झालेल्या घोर अन्यायाबद्दल मरेपर्यंत पश्चात्ताप करीत बसावें लागलें.

क्रेगेनपुटक येथील भयाण आयुष्यातील प्रत्येक क्षणोक्षणीं आपल्या सुखाची आणि सर्वस्वाची कशी आहुति द्यावी लागत होती याची एका शब्दानें किंवा अक्षरानें तिनें कार्लाइलला कल्पना दिली नाहीं. मग त्यानें तरी बिचाऱ्यानें काय करावें? शेवटी शेवटीं जीनीची शारीरिक आणि मानसिक परिस्थिति इतकी ठिसूळ झाली कीं जगण्याची, प्रेम करण्याची किंवा कोणत्याही आनंदाचा आस्वाद घेण्याची शक्ति मुळीं तिच्यात उरली नाहीं.

पुढें क्रेगेनपुटक सोडून लंडनला राहावयास जाण्याचें कार्लाइलनें ठरविलें. पण त्याचा तिच्या मनावर काहीं परिणाम झालेला दिसला नाहीं. लंडनला त्यांच्या घरांत पुष्कळ माणसें येत. कार्लाइलची सांपत्तिक स्थिति तेथें आल्यावर पुष्कळच सुधारली. चोहोंकडून मानमान्यतेचा त्याच्यावर वर्षाव होऊं लागला. पण क्रेगेन-पुटक येथें जीनीला जडलेली मानसिक व्याधि दिवसेंदिवस वाढत चालली.

कार्लाइलचा त्या वेळचा मित्र फ्रॉइड यानें जीनीच्या त्या वेळच्या चेहऱ्याचें वर्णन एके ठिकाणीं केलें आहे. तो म्हणतो: "तिचा व्याकुळ आणि भकास चेहरा एखाद्या भुताप्रमाणें पाहणाराला पछाडल्याखेरीज राहात नसे." जीनीची ही शोककारक कहाणी जो वाचील त्यालाही तिची करुण मूर्ति पुष्कळ वेळ अस्वस्थ आणि व्याकुळ केल्याखेरीज राहणार नाहीं.

जीनीच्या अंगामध्येंही दोष नव्हते असें नाहीं. ती अतिशय रागीट होती आणि दुसऱ्याच्या अंतःकरणाला झोंबेल असें ती बोलत असे. दुसऱ्याच्या

दोषांकडे दुर्लक्ष करायला किंवा त्याच्या अपराधाची क्षमा करायला ती कधींही तयार नसे. कार्लाइलचा स्वभाव तसा प्रेमळ होता. त्याचे त्याच्या नातेवाइकाशीं अगत्याचे संबंध होते. उलट जीनीला आपल्या बापाखेरीज आपल्या कुटुंबातील कोणत्याही माणसाबद्दल आदर वाटत नसे. तिचा पिता हाच तिला आदर्श पुरुषाचा नमुना वाटे. यामुळें कार्लाइलबद्दल खरें पाहता तिला मनातून आकर्षण वाटत नसे.

जीनीच्या अंगीं एवढे दोष होते, हें सांगितल्यानंतरसुद्धा तिच्या आयुष्याचा नाश केल्याची जबाबदारी कार्लाइलवरच येते. कार्लाइलच्या सहवासात राहणें कोणालाही अशक्य झालें असते. त्याच्या भावनेची गहनता आणि कोमलता कितीही असली तरी त्याच्या स्वभावात अनेक खोडी भरल्या होत्या. तो स्वार्थी, रागीट आणि उर्मट होता. कोणत्याही स्त्रीला हे त्याचे स्वभावदोष सहन करणें शक्य नव्हतें.

मिस् गली नांवाच्या एका बाईनें कार्लाइलच्या वैवाहिक जीवनाचें यथार्थ चित्र रेखाटून ठेवलें आहे, तें वाचण्यासारखे आहे. ती म्हणते : "खरोखरच कार्लाइलनें लग्न करायला नको होतें. त्यानें एक उत्तमसा आचारी ठेवून राहायला पाहिजे होते. मिसेस कार्लाइलशीं लग्न करून तिचें आयुष्य त्यानें वायां घालविलें. इतक्या बुद्धिमान् आणि हुशार बायकोची त्याला मुळींच जरुरी नव्हती. तिच्या प्रकृतीकडे त्याचें मुळींच लक्ष नव्हतें. एकदोन वेळा ती अतिशय आजारी असतां स्वतःच्या सोयीसाटीं त्यानें तिला लांबच्या प्रवासाला पाठविल्याचें मला माहीत आहे."

निद्रानाशाचा विकार जीनीला जो जडला तो पुढें पुढें वाढतच गेला. रात्रीची ती वीस ते तीस वेळां उठे. कार्लाइलची खोली तिच्या खोलीच्या वर असे. तिला कुठें डोळा लागे तो कार्लाइल वर जागा होऊन मोटमोठ्यानें आवाज करी. त्यामुळें तिची झोप उडून जाई. झोप येण्यासाठीं ती मॉर्फिया खाऊ लागली. त्यामुळें त्या व्यसनाच्या कचाट्यात सांपडून तिची स्थिति अत्यंत केविलवाणी झाली. शेवटीं शेवटीं झोप येण्यासाठीं मॉर्फिया खाणें हाच तिच्या आयुष्यातला उद्योग होऊन बसला.

या काळात तिनें आपल्या डायरींत लिहून ठेवलेले आत्मचरित्रात्मक उतारे अत्यंत हृदयद्रावक आहेत. आयुष्याला ती अगदीं विटून गेली होती. स्त्रीच्या वैवाहिक जीवनाविषयीं तिला किती उबग आला होता याचा एक विलक्षण

नमुना विवाह करू इच्छिणाऱ्या एका मुलीला तिनें लिहिलेल्या पत्रांत आढळून येतो.

"आणि तूं आतां लग्न करावयाचें ठरवलें आहेस होय? तू! आणि मीं त्याबद्दल तुझें अभिनदन करावें अशी तुझी अपेक्षा आहे, नाहीं का? ठीक आहे. तुझ्या नवीन जीवनात तूं सुखी व्हावेस असे मी इच्छिते. तुझ्या वडिलाना तुझें लग्न पसंत आहे ही फार उत्तम गोष्ट आहे. विवाह होत असताना वधूवराचें अभिनदन करणें म्हणजे भवितव्याला आव्हान देण्यासारखें मला वाटतें.

"लग्नांत मिरवणुका काढणें किंवा आनदाचें प्रदर्शन करणें म्हणजे युद्ध होण्यापूर्वीच विजयोत्सव साजरा करण्यासारखें आहे. एका पवित्र बंधनानें दोन जीव आमरण एकत्र जखडले जात असताना सर्वांनीं गंभीर आणि अंतर्मुख होऊन परमेश्वराची प्रार्थना करावयाला हवी. अशा वेळीं चैनीचें आणि पोषाखाचें प्रदर्शन करून नाचगाणें किंवा मेजवान्या करणे हें पाप नव्हे काय?

"तुझें लग्न होणार असल्याची बातमी पत्रामध्यें वाचून मी एकदम किंचाळलें असें मीं तुला सागितलें तर तूं मला वेडी म्हणणार नाहीस ना? अनंतात आणि अज्ञानात तू एकदम उडी मारीत आहेस असें मला वाटलें. तूं अत्यंत सुखी आणि आनदी मुलगी आहेस हें मला ठाऊक आहे. त्यांतून वडिलांची एकुलती एक आणि अत्यंत आवडती. मी देखील तुझ्यासारखीच माझ्या वडिलाची एकुलती एक आणि आवडती मुलगी होते. माझ्याबद्दल त्याना केवढा अभिमान वाटत होता! तुझें सुख तुला कळतें कीं नाहीं कुणास ठाऊक? कळो वा न कळो, सुख नेहमीं अपुरेंच वाटतें. तारुण्याला सुखाची केवढी तृषा लागलेली असते? आणि सुख निर्माण करण्याच्या आपल्या सामर्थ्यावर त्याचा विलक्षण विश्वास पण असतो.

"पण तुझ्या वडिलाचें कसें होणार? त्याना आयुष्यात कोण आनद देणार? त्यांच्या आयुष्याची वाटेकरीण तर पूर्वीच निघून गेली. आता तूही पण त्याच्या जीवनांतून जाणार. चिमुकल्या पोरी, तुझ्या जाण्यानें त्याच्या जीवनात केवढी पोकळी निर्माण होईल याची तुला कल्पना आहे काय? काय चमत्कारिक पत्र लिहितें आहें मी तुला? कावळ्याला लिहिता आलें असतें तर त्यानें असेंच लिहिलें असतें. झोप येण्यासाठीं रोज जे 'विष' मला घ्यावें लागतें त्याचा हा परिणाम आहे. प्रकाश देण्याची आतां माझ्यात शक्ति नाहीं. माझ्यामधून

आता अंधारच बाहेर पडणार. म्हणून स्वतःवर झाकण घालून बाजूला बसलेलेंच बरें. परमेश्वर तुला सुखी राखो!"

जीनीच्या जीवनाच्या शोकान्त नाटकाच्या शेवटच्या अंकाला एका अपघातापासून प्रारंभ झाला. १८६३ मध्ये एके दिवशीं संध्याकाळीं जीनी आपल्या एका नातेवाइकाकडे गेली होती. परत येताना घाईघाईनें बस पकडण्यासाठीं म्हणून ती जात होती. तोच एका घोड्याच्या गाडीचा धक्का लागून ती फूटपाथवर फेकली गेली. तिचा उजवा हात आधींच दुबळा आणि निरुपयोगी झालेला होता. म्हणून तिला पडता पडता त्या हातानें स्वतःला सावरता आलें नाहीं. त्याचा परिणाम असा झाला कीं, तिच्या माडीला जबर दुखापत झाली आणि तिला त्या दुःखाच्या वेदना सहन करणें अशक्य झाले.

या अपघाताची बातमी कार्लाइलला कळली तर तो अतिशय रागावेल आणि 'कशाला मूर्खासारखी रस्त्यावर धावायला गेलीस असें म्हणेल' म्हणून जीनीनें आणि तिच्या डॉक्टरनें त्या अपघाताचें गंभीर स्वरूप त्याच्यापासून लपवून ठेवायचें ठरविले. शरीराच्या ज्या बाजूला जखम झाली त्या भागाच्या सर्वच स्नायूंना आणि ज्ञानतनूंना इजा पोचली. आणि पक्षघात व्हावा तशी तिची स्थिति झाली. तिच्या तोंडाचा खालचा जबडा असहायपणें लोंबू लागला आणि तोंड उघडें पडलें.

एके दिवशीं सकाळी ती दुःखानें बिछान्यावर तळमळत पडली असताना कार्लाइल तिथें आला. जीनीचें अर्धे तोंड उघडें पाहून तो तिच्यावर अतिशय रागावला. आणि तिच्यावर ओरडून म्हणाला, "जेन, असें मूर्खासारखे तोंड काय उघडें ठेवतेस? मीट ना तोंड ते!" पण जीनीला उत्तर देता येणें शक्य नव्हतें. तो पुन्हा ओरडला, "मी काय सागतो ते तुला ऐकू येत नाहीं का?" आपल्या हृदयामध्यें कार्लाइल सुरी खुपसतो आहे असें जीनीला त्या वेळीं दुःख झालें. शेवटीं जातां जातां कार्लाइल म्हणाला, "देवाचे आभार मान कीं या तुझ्या अपघाताचें स्वरूप फारसें गंभीर नाहीं!" तेव्हा मात्र ती संतापून म्हणाली, "तुम्हाला माझ्या यातनाची कल्पना तरी आहे काय? माझा इकडे प्राण चालला आहे अन् देवाचे आभार कसले मानूं?" इतका बडखोरपणा आपल्या बायकोमध्यें आपण पूर्वी कधीं पाहिला नाहीं, असें पुटपुटत कार्लाइल तिथून चालता झाला.

एक महिनाभर ती अंथरुणाला खिळून होती. अन् मग ती हातांत काठी

घेऊन घरातल्या घरांत कशीबशी खुरडूं लागली. पण कार्लाइलला या काळात तिच्या आजाराची कल्पनाच नव्हती. तो म्हणे, "तिला काय झालें आहे ? ती चांगली खाते आहे, पिते आहे, काठी घेऊन फिरते आहे. वास्तविक तिला काटीदेखील घेऊन फिरण्याची जरुरी नाहीं."

या काळात 'फ्रेडरिक द ग्रेट' हा आपला अमर ग्रंथ सतत तेरा वर्षांच्या अघोर तपश्चर्येनंतर कार्लाइलनें पुरा करीत आणला होता. हा ग्रंथ लिहिण्याच्या परिश्रमानें आणि व्यग्रतेनें त्याला जवळजवळ वेडच लागण्याची पाळी आली होती. त्याच्या मानसिक यातना त्याला स्वतःलाही असह्य झाल्या होत्या. मग तो जीनीच्या दुःखाकडे कोठून लक्ष देणार? आपल्या आजारामुळें घरातल्या नेहमींच्या कार्यक्रमात व्यत्यय निर्माण होऊ नये, नाहीं तर आपला ग्रंथ समाप्त करण्यास लागणारें मनःस्वास्थ आपल्या नवऱ्याला मिळणार नाहीं म्हणून तशा परिस्थितींतही जीनी अतिशय काळजी घेत असे. लोक आपल्या प्रकृतीची चौकशी करायला घरी येऊ नयेत म्हणून तिनें जणु आपल्याला काहीं झालेलेंच नाहीं, इतकें सौम्य स्वरूप आपल्या गभीर आजाराला देऊन टाकले.

'फ्रेडरिक द ग्रेट' या ग्रंथाचें शेवटचें पान लिहून कार्लाइलनें आपल्या प्रकाशकाकडे पाठविलें तेव्हा कुठे तो शुद्धीवर आला. उभयताच्या छातीवर लोबत असलेला एक धोंडाच जणुं काहीं दूर झाला म्हणा ना ! जीनीला फिरावयाला जाण्यासाठीं त्यानें आपण होऊन एक घोडागाडी विकत घेऊन दिली. इतक्या वर्षांनतर कार्लाइलने आपल्या सुखसोयीकडे लक्ष दिलें हें बघून जीनीच्या डोळयातून आनदाश्रू वाहूं लागले.

दिवसेंदिवस तिची प्रकृति खगतच चालली होती. निद्रानाशाचे आणि मानसिक अस्वस्थतेचे झटके तिला वारंवार येऊं लागले. आपला अंतकाळ आता जवळ येऊन ठेपला हें तिला कळून चुकले. तथापि बाहेरून हें तिनें कोणालाही भासूं दिलें नाहीं. याच सुमारास एडिन्बरो विश्वविद्यालयाच्या 'लॉर्ड रेक्टर'च्या उच्च पदावर कार्लाइलची निवडणूक झाली. त्याच्या आयुष्यांतला हा सर्वांत मोठा सन्मान होता. जीनीच्या आनंदाला तर पारावारच राहिला नाहीं. विश्वविद्यालयाच्या पदवीदानसमारंभाचें मुख्य भाषण करण्यासाठीं आणि पदवी-धराना पदव्या देण्यासाठीं कार्लाइलला एडिन्बरोला जावें लागलें. त्याच्याबरोबर आपल्याला जाता आलें नाहीं याबद्दल जीनीला अतिशय वाईट वाटलें.

एडिन्बरोला कार्लाइलचें भाषण कसें काय वठतें आहे इकडे तिचें सारें

लक्ष लागून राहिलें. कार्लाइलनें आपलें भाषण लिहून नेलें होतें. पण ऐन वेळीं तें छापील भाषण बाजूला सारून दीड तास प्रसगस्फूर्त भाषण त्यानें इतकें प्रभावी केलें कीं, सारा श्रोतृवर्ग मत्रमुग्ध होऊन आनदानें डोल् लागला. त्याचें व्याख्यान चालू असता टाळ्याचा एकसारखा प्रचंड कडकडाट होत होता. कार्लाइलचें हे अमर वक्तृत्व इग्रजी वाङ्मयात प्रसिद्धच आहे. समारंभ संपताच कार्लाइलच्या चिटणिसानें जीनीला ताबडतोब तार पाठविली, 'कार्लाइलनें आज जिकले !' त्या तारेची जीनी तिकडे वाट पाहातच बसली होती. तिच्याकडे काहीं नातेवाईक बाया आल्या होत्या. पण त्याच्या बोलण्याकडे तिचें लक्ष नव्हते. इतक्यात ती तार तिच्या हातात पडली.

'कार्लाइलनें आज जिकलें !' ती तार किती तरी वेळा तिनें मोठ्यानें वाचून दाखविली. साऱ्या जणी आनदानें तिच्याभोवतीं नाचू लागल्या. एक जण तिला म्हणाली, "जेन, आता यापुढें तुझी प्रकृति नक्की सुधारणार, बरें का !" जीनीलाही तसेंच वाटलें. पण दिवा विझण्यापूर्वी जसा मोठा होतो तशी तिच्या प्रकृतीमधली ती सुधारणा होती. त्या रात्री तिनें घाईघाईनें कार्लाइलला अभिनदनाचें पत्र पाठविलें. कार्लाइलला तिनें लिहिलेलें तिच्या आयुष्यातील तें शेवटचें पत्र होय.

स्कॉटलंडहून परत लडनला यावयाला कार्लाइलला साहजिकच वेळ लागला. त्याच्या उत्कृष्ट भाषणाचा चोहोकडे लौकिक पसरला होता. आणि त्या वेळीं त्याच्या भाषणाखेरीज लोकाना बोलावयाला दुसरा विषयच नव्हता. जीनीचें अभिनंदन करावयाला येणाऱ्या माणसाची घरात अगदीं रीघ लागून राहिली होती. त्या आनंदाच्या प्रक्षोभात तिला आपल्या दुखण्याचा आणि दुर्बलतेचा जणुं कांहीं विसरच पडला होता.

कार्लाइल लंडनला येण्याच्या एकदोन दिवस आधींची गोष्ट. जीनी नेहमींप्रमाणें आपल्या बंद गाडींत बसून संध्याकाळची फिरावयाला गेली होती. तिच्याबरोबर तिचें एक लहानसें कुत्रे होतें. एके ठिकाणीं गाडी थाबवून तिनें त्या कुत्र्याला रस्त्यावर फिरायला सोडलें. तिकडून एक दुसरी गाडी येत होती. त्या गाडीचें चाक वाटतें त्या कुत्र्याच्या पायावरून गेलें. त्याला विशेष लागलें नाहीं. पण तें खूपच घाबरून मोठमोठ्यानें केकाटू लागलें. त्याबरोबर जीनी ताडकन् उडी मारून आपल्या गाडीबाहेर आली. आणि त्या कुत्र्याला चटकन् उचलून पुन्हा गाडींत जाऊन बसली.

ड्रायव्हरनें मुकाट्यानें गाडी हाकावयास सुरुवात केली. नेहमींप्रमाणें गाडी-वाल्यानें बागेच्याभोवतीं दोन चकरा मारल्या. तरी घरीं परत जाण्याचा जीनीच्या तोंडचा हुकूम गाडीमधून त्याच्या कानी पडला नाहीं, तेव्हां त्याला आश्चर्य वाटलें. तो खाली उतरला आणि डोकावून पाहूं लागला. ती कुत्र्याला मांडीवर घेऊन शांतपणें झोपीं गेल्यासारखी मागे टेकून बसली होती. ड्रायव्हरनें तिला हाक मारली; पण तिचे प्राण तिच्या शरीरातून कधींच निघून गेले होते. जीनीच्या जीवनाची दुर्दैवी शोककथा कधींच समाप्त झाली होती.

जीनीच्या मृत्यूची तार कार्लाइलच्या हाती आधीं पडली आणि मागून तिचें शेवटचें पत्र त्याला मिळालें. तिच्या मृत्यूनें कार्लाइलला जे अपरंपार दुःख आणि पश्चात्ताप झाला, त्याचें अत्यंत भेदक वर्णन त्यानें इंग्रजी वाङ्मयांत करून ठेवलेलें सर्वांना माहीत आहेच. तेव्हा त्याचें अधिक काय वर्णन करावें? लंडनला परत आल्यावर कार्लाइल आपल्या भावाला म्हणाला, "पाहा, पाहा, मी दिग्विजय करून परत आलो. मृत्यूच्या पेटींत बसून किती दिव्य मुद्रेने ती माझें स्वागत करीत आहे ते!"

एखाद्या ज्वालामुखींतून लाव्हारसाचे पाट वहावेत त्याप्रमाणें कार्लाइलच्या भग्न हृदयांतून जीनीच्या अद्‌भुत जीवनाच्या आणि गुणाच्या प्रशंसेचीं तेजस्वी वर्णनें कित्येक दिवसपर्यंत तरी उचंबळत होतीं. हॅडिंग्टन येथील दफनभूमींत तिच्या वडिलांशेजारीं जीनीला पुरण्यात आलें. जीनीच्या मृत्यूनंतर कार्लाइलची स्थिति अत्यंत अनुकंपनीय झाली. पावलोपावली त्याला तिची आठवण होई. एका महान् स्त्रीच्या आयुष्याचा आपण नाश केला, या विचारानें त्याचीं आंतडीं तटातटा तुटत. अन् मग त्याला तें दुःख अनावर होई. जीनीच्या समाधीचें दर्शन घेण्यास तो पुष्कळदा लंडनहून हॅडिंग्टनला जाई. हा त्याचा क्रम त्याच्या आयुष्याच्या अखेरच्या क्षणापर्यंत चालू होता.

त्या दफनभूमीच्या रखवालदारानें त्याच्या शेवटच्या भेटीचें एक हृदयस्पर्शी चित्र रेखाटून ठेवलें आहे. "शहायशी वर्षांचा कार्लाइल आपल्या पुतणीला घेऊन त्या दिवशीं आला. दफनभूमीवर फाटकापाशीं त्यानें आपल्या पुतणीला उभे केलें. आणि मंद पावलानीं तो हळूहळू बायकोच्या थडग्याशीं गेला. तो अतिशय थकलेला होता. त्याला चालवतही नव्हतें. थडग्याशेजारीं गवतावर गुडघे टेकून तो बसला आणि त्यानें तेथील जमिनीचें अनेकदां चुंबन घेतले. बऱ्याच वेळानंतर तो मोठ्या कष्टानें उठला आणि दफनभूमींतील इतर

थडग्यांमधून वाट काढीत काढीत कसाबसा तो फाटकापर्यंत पोहोंचला. तेथें त्याची पुतणी वाट पाहात उभी होतीच. पुन्हा त्यानंतर कार्लाइल त्या दफनभूमींत आला नाही !"

वैवाहिक जीवनाच्या या हृदयद्रावक शोककथेला येथेंच पूर्णविराम देणें योग्य होईल. संसाराच्या देहलीवर उत्साहानें पदार्पण करणाऱ्या अनेक तरुण तरुणींना आणि स्वभाव-वैधर्म्यामुळें वैवाहिक सुखाला वर्षानुवर्षे अंतरलेल्या अनेक दुःखी पतिपत्नींना कार्लाइलच्या कौटुंबिक जीवनाची ही करुण कहाणी उद्बोधक झाल्यावाचून राहणार नाहीं अशी माझी खात्री आहे.

* * *

# ३ बहिरससाणा

फार वर्षांपूर्वी फ्लॉरेन्स शहरात एक तरुण राहात होता. त्याचें नाव फ्रेडरिगो डेगली आलबेरिघी असें होतें. शस्त्रविद्येत तो फार निष्णात होता. साऱ्या टस्कनी प्रातात त्याच्याएवढा उमदा आणि शूर तरुण त्या वेळीं दुसरा कोणी नव्हता. त्याच वेळीं फ्लॉरेन्समध्यें मोना गिओव्हेना नावाची एक तरुणी राहात होती. ती अतिशयच सुंदर आणि सुस्वरूप होती. तिच्याएवढी लावण्यवती स्त्री फ्लॉरेन्स शहरात दुसरी कोणीही नव्हती म्हटले तरी चालेल. त्या तरुणीचें सौंदर्य बघून फ्रेडरिगो मोहित झाला आणि तिच्या प्रेमपाशात पडला. तिचें मन आपल्याकडे आकर्षित करण्यासाठी फ्रेडरिगोनें अतोनात प्रयत्न केले. तेवढ्यासाठीं त्यानें हजारो रुपये खर्च केले. मोठमोठ्या मेजवान्या दिल्या. जलसे केले. शस्त्रविद्येत आणि द्वंद्वयुद्धात आपण बिनतोड आहोत हे दाखविण्यासाठीं आपल्या खर्चानें मोठमोठे फड आणि सामने भरविले. पण मोना ही जशी सुंदर होती तशीच ती सद्गुणी होती. तिचे लग्न झालेले होते आणि तिचा नवराही अतिशय श्रीमत आणि उमदा होता. तिनें फ्रेडरिगोकडे चुकून कधीं पाहिलें नाहीं किंवा आपल्या नवऱ्याला सोडून त्याजवर प्रेम करण्याचा विचार चुकून देखील तिच्या मनाला कधीं शिवला नाहीं.

बिचारा फ्रेडरिगो! मोनाचें प्रेम आपल्यावर बसावें म्हणून त्यानें आपली सारी दौलत उधळून टाकली आणि शेवटीं तो भिकारी झाला. त्याच्या कोट्यवधि रुपयाच्या सपत्तीपैकीं एक कपर्दिका देखील त्याच्याजवळ उरली नाहीं. त्याचें घरदार पार नाहींसें झालें. एका खेडेगावात त्याचा एक लहानसा जमिनीचा तुकडा राहिला होता. त्यावर त्यानें एक झोपडी बाधली व तो तिथें जाऊन राहिला.

त्याच्याजवळ एक फारच सुंदर बहिरससाणा होता. त्याजवर त्याचें प्राणापलीकडे प्रेम होतें. तेवढाच काय तो सोबती आता त्याला जगांत उरला होता.

हा बहिरससाणा जेवढी शिकार करून आणी, तेवढ्यावर फ्रेडरिगो कशीबशी आपली उपजीविका करी. अशा रीतीनें दारिद्र्यात आणि अज्ञातवासात फ्रेडरिगो आपले आयुष्य कसें तरी घालवीत होता.

काहीं दिवसानीं मोनाचा नवरा मरण पावला. मोनाला अतिशय दुःख झालें. तिला चौदा-पंधरा वर्षांचा एकुलता एक मुलगा होता. तोच आता तिच्या आयुष्यात तिच्या प्रेमाचा आणि सुखाचा आधार उरला. पण या तिच्या मुलाची प्रकृति लहानपणापासून फारशी चागली नव्हती. खेडेगावच्या उघड्या आणि मोकळ्या वातावरणात त्याची प्रकृति सुधारेल म्हणून मोना वरचेवर त्याला शहर सोडून बाहेरगावी घेऊन जाई.

एका उन्हाळ्यात फ्रेडरिगो ज्या गावीं राहात होता तेथें योगायोगानें ती आपल्या मुलाला घेऊन आली. फ्रेडरिगोच्या झोपडीपासून थोड्याच अंतरावर एक प्रशस्त बंगला होता. तो तिनें घेतला. मोना आपल्या इतक्या जवळ राहायला आली याची फ्रेडरिगोला कल्पनाच नव्हती. मोनाचा मुलगा बंगल्याच्या आजूबाजूला असलेल्या शेतात आणि रानात पुष्कळदां भटकत फिरे. त्यालाही पक्ष्याची शिकार करण्याचा फार नाद होता.

एके दिवशी त्यानें फ्रेडरिगोचा बहिरससाणा पाहिला. तो त्याला फार आवडला. त्या बहिरससाण्याचा मालक कोण आहे याचा शोध करीत करीत तो एक दिवस फ्रेडरिगोच्या झोपडींत आला. आणि अशा रीतीनें बहिरससाण्यामुळें दोघाची ओळख झाली. फ्रेडरिगो त्या बहिरससाण्याला आपल्या मनगटावर खेळवीत आपल्या झोपडीबाहेर नेहमीं बसलेला असे. तो त्याच्या हातावरून उडून उंच आभाळात भराऱ्या मारी व एकाद्या पक्ष्याची शिकार करून ती फ्रेडरिगोच्या पुढें आणून टाकी. त्या बहिरससाण्याच्या या लीला पाहात मोनाचा मुलगा तासन्तास फ्रेडरिगोशेजारीं बसून राही.

यामुळें तो बहिरससाणा त्याला फारच आवडूं लागला. आणि आपल्याजवळ तो असावा असें त्याला मनातून वाटूं लागलें. पण फ्रेडरिगोचें त्या बहिरससाण्यावर प्राणापलीकडे प्रेम होतें हें त्याला ठाऊक होते. म्हणून तो बहिरससाणा त्याच्याकडे मागण्याचें त्याला कधींही धैर्य झालें नाहीं. त्यामुळें तो मनातल्या मनात झुरून जास्तच खगू लागला. खेडेगावच्या हवेंत राहूनही आपल्या मुलाची प्रकृति का सुधारत नाहीं हें मोनाला कळेना. तिला त्याची फारच काळजी वाटू लागली. पण आपल्या मनांतलें दुखणें मुलानें आपल्या आईला सागितलें नाहीं.

कांहीं दिवसांनीं मोनाच्या मुलाची प्रकृति फारच बिघडली. आणि त्यानें अंथरूणच धरलें. मोनानें मोठमोठे वैद्य बोलावले. हकीम बोलावले. पण मुलाच्या रोगाची कोणालाही परीक्षा होईना. आपल्याला काय होतें आहे हें तोही सागेना आणि वैद्यानाही तें कळेना. नाना तऱ्हेचीं औषधें त्यानीं त्याला देऊन पाहिलीं. पण मुलगा दिवसेंदिवस खंगतच चालला. रात्रंदिवस मोना आपली त्याच्या उशापाशीं बसून राही.

एक दिवस त्याचें डोकें आपल्या माडीवर घेऊन आणि प्रेमानें त्याचें तोड कुरवाळून मोना त्याला म्हणाली, "बाळ, तुला काय होतंय तें तू मला कां सागत नाहींस? काय तुला दिलं म्हणजे तूं बरा होशीस बरं? साग मला. तूं सागशील तें मी तुला आणून देईन!" शेवटीं कसाबसा धीर करून मुलानें आपल्या मनातली इच्छा उघड करून आईला सागितली. तो म्हणाला, "आई, तूं मला फ्रेडरिगोचा बहिरससाणा आणून देशील किनई तर मी बरा होईन."

आपल्या मुलाच्या तोंडचे ते उद्गार ऐकून मोना एकदम स्तब्ध झाली. त्यानें दुसरी कोणतीही गोष्ट मागितली असती तर तिनें ती त्याला चटकन् आणून दिली असती. पैशाची तिला कमतरता नव्हती. पण फ्रेडरिगोचा ससाणा तिला कसा मिळूं शकणार? प्राणापलीकडे फ्रेडरिगोचें आपल्या ससाण्यावर प्रेम होतें. आणि त्या ससाण्यावांचून एक क्षणभर देखील त्याला चैन पडत नव्हतें हें तिला ठाऊक होतें.

'आणि फ्रेडरिगोचा ससाणा मागायचा मला काय हक्क आहे?' मोना मनात म्हणाली, 'फ्रेडरिगोनें माझ्यावर एवढें प्रेम केलें. माझ्या प्रेमासाठीं आपली सारी दौलत उधळून तो दरिद्री झाला. आजपर्यंत त्याच्याकडे मीं ढुकून कधीं पाहिलें नाहीं. त्याच्याशीं अत्यत निर्दयतेनें वागलें. असें असतां त्याचा आवडता ससाणा कोणत्या नात्यानें मला त्याच्यापाशीं मागतां येईल?' अर्थात् आपण फ्रेडरिगोचा ससाणा मागितला तर तो मोठ्या आनंदानें आपल्याला तो देऊन टाकील हें मोनाला माहीत होतें. पण त्याच्या आयुष्यांतला त्याचा एकुलता आनंद त्याच्यापासून हिरावून घेणें हें क्रूरपणाचें नाहीं का, असाही तिच्या मनात विचार आला.

पण त्याच्याकडे ससाणा न मागावा तर आपल्या एकुलत्या एक मुलाची इच्छा कशी पूर्ण होणार? आणि त्याचे प्राण कसे वाचणार? मोनाच्या

पुढें फार मोठें कोडें पडलें. सबंध रात्रभर तिचा डोळ्याला डोळा लागला नाहीं. शेवटीं मुलाच्या प्रेमाखातर तिनें फ्रेडरिगोकडून त्याचा ससाणा मागून आणायचें ठरविलें. दुसऱ्या कोणाला त्यासाठीं पाठविण्यापेक्षां स्वतःच आपण फ्रेडरिगो-कडे गेलेलें चागलें, असा विचार करून सकाळ होताच ती उठली. अंगावर ओढणी घेऊन ती सरळ फ्रेडरिगोच्या शेताकडे पायीं चालत गेली.

फ्रेडरिगो आपल्या बागेत काही तरी काम करीत बसला होता. कोमल स्वरांत मोनानें त्याला हाक मारली, "फ्रेडरिगो!" फ्रेडरिगो ताडकन् उठून उभा राहिला. आपण जागे आहोत कीं झोपेत आहोत हें त्याला कळेना. मोना—आपली प्रेमदेवता मोना—आपल्या पायानी आपल्या घरात चालत आली. आजपर्यंत जिनें आपल्याकडे नुसते डोळे वर करून एकदा पाहावें म्हणून आपण लक्षावधि रुपये उधळले पण जिनें ढुंकून देखील आपल्याकडे कधीं पाहिलें नाहीं, ती मोना आपल्यासमोर उभी असलेली बघून फ्रेडरिगोच्या आनंदाला पारावार उरला नाहीं.

कोणत्या शब्दानीं तिचें स्वागत करावें हें त्याला कळेना. त्याच्या तोंडून एक अक्षर देखील फुटेना. त्याच्या सर्वांगावर हर्षाचे रोमान्च उभे राहिले. मोना खाली पाहात म्हणाली, "फ्रेडरिगो, माझ्यामुळें तुला आज ही दशा प्राप्त झाली आहे हें मला माहीत आहे. त्याची सर्वच भरपाई मला करून देता येणें अशक्य आहे. पण तुझ्या मनाला थोडा तरी आनंद व्हावा म्हणून तुझ्या सगतींत काहीं वेळ तरी घालविण्याचें मी आज ठरविलें आहे."

फ्रेडरिगोचें अंतःकरण भरून आलें. तो म्हणाला, "मोना, असें म्हणूं नकोस. तुझ्यामुळें माझें कांहींही नुकसान झालेलें नाहीं. संपत्तीची काय किमत? माझें तुझ्यावरील प्रेम हीच खरी माझी संपत्ति. ती तर माझ्याजवळ आहे तशीच आहे ना? आणि मी श्रीमत असताना तूं माझ्या घरी कधीं आली नाहींस, मी गरीब झाल्यावर तू माझ्या झोपडींत आज येत आहेस. तेव्हां माझी संपत्ति गेल्याबद्दल मला वाईट वाटण्याचें कारण काय? मोना, आतां माझी तुला एकच विनति आहे,—आज तूं माझ्या घरीं जेवून गेलें पाहिजेस."

फ्रेडरिगोची ती विनंति मोनानें मोठ्या आनंदानें मान्य केली. फ्रेडरिगोच्या घरांत नोकरमाणूस कोणीच नव्हतें. तेव्हां मोनाला बागेत बसवून फ्रेडरिगो घरांत गेला व मोनासाठीं उत्तम जेवण काय बनविता येईल, याचा तो विचार

करूं लागला. पण घरांत कांहींच नव्हतें. सगळें घर त्यानें शोधून पाहिलें, पण त्याला काहीं आढळलें नाहीं. बाजारातून काही विकत घेऊन यावें म्हणावें तर त्याच्या खिशात एक पैसा नव्हता. कोणाकडून उसनें मागून आणावें तर त्याला उसनें कोण देणार ?

फ्रेडरिगोच्या जिवाची अगदीं चडफड चडफड झाली. आतां मात्र त्याला आपल्या दारिद्र्याचा अतिशय राग आला. जिला आकर्षित करण्यासाटीं पूर्वी आपण हजारो रुपये खर्चून मोटमोठ्या मेजवान्या दिल्या पण जिनें आपल्या घरात कधी पाऊल टाकले नाही, ती आपण होऊन आज आपल्या घरीं आली असताना तिला खायला देण्यास आपल्याजवळ काहीं असू नये याचें त्याला अतिशय दुःख झालें.

इतक्यात त्याच्या नजरेला त्याचा आवडता बहिरससाणा पडला. तो खिडकीच्या दाडीवर बसून मोठया ऐटीनें मान वळवून फ्रेडरिगोकडे पाहात होंता. फ्रेडरिगोनें त्याच्याकडे पाहिले. आणि त्याला बघून फ्रेडरिगोच्या मनात काहीं तरी विचार आला. आणि त्याच्या अंगावर एकदम काटाच उभा राहिला. पण बाहेर मोना बसली आहे ह्याची त्याला आटवण झाली. त्याबरोबर मनात आलेला तो विचार एकदम त्यानें कृतींत आणला.

काही वेळाने जेवण तयार झाले. ते एका लहानशा ताटात वाढून आणि हसरा चेहरा करून फ्रेडरिगो मोनाकडे आला, आणि म्हणाला, "मोना, तुझ्यासाटीं हे उत्तम पक्वान्न मी माझ्या हातानी शिजवून आणलें आहे. तें तूं पोटभर खाल्ले पाहिजेस." मोना म्हणाली, "तूं नाही का जेवणार?" फ्रेडरिगो म्हणाला, "नाही, मी नाहीं जेवणार. मी तुला वाढणार. तुला जेवतांना पाहूनच माझे पोट भरेल."

मोना जेवायला बसली. फ्रेडरिगोनें तिला आग्रह करकरून वाढलें. तिला तें जेवण फारच आवडले. जेवण झाल्यावर दोघे आनदानें निरनिराळ्या विषयावर गप्पा मारीत बागेत बसली. मग आता घरीं गेलें पाहिजे असा विचार करून मोना उठली व म्हणाली, "फ्रेडरिगो, मी आता जातें. किती चांगला आहेस तू मी मात्र आजपर्यंत फार निर्दयतेनें तुझ्याशीं वागलें. पण मी तरी काय करणार मी विवाहित होतें आणि फिरून एका मुलाची आई होतें. आईच्या कर्तव्यान मी बांधली गेलें होतें. तुझ्या प्रेमाचा स्वीकार करणें मला शक्य नव्हतें. असो जें झालं तें झालें.

"मला एकच गोष्ट तुझ्यासाठीं मागायची आहे. माझ्या स्वतःसाठीं नव्हे, माझ्या मुलासाठीं. तो फार आजारी आहे आणि त्यानें त्या गोष्टीचा फार हट्ट धरला आहे. त्याला जर ती गोष्ट मिळाली नाहीं तर त्याच्या प्रकृतीवर त्याचा वाईट परिणाम झाल्यावाचून राहणार नाहीं. म्हणून नाइलाजानें ती गोष्ट मला तुझ्यापाशीं मागावी लागत आहे.

"मला ठाऊक आहे, ती गोष्ट तुझ्या प्राणापेक्षांही तुला प्रिय आहे. ती दुसऱ्याला देण्याची कल्पनाही तुला सहन होणार नाहीं. पण मरणाच्या दारीं पडलेल्या मुलाला वांचवण्यासाठीं त्याच्या आईच्या पदरात एवढी भीक तू घालशील अशी माझी खात्री आहे."

मोना काय मागते आहे ते फ्रेडरिगोला कळेना. तो अधीर होऊन एकदम ओरडला, "मोना, मोना, हें तूं काय बोलते आहेस? अशी या जगात माझ्याजवळ काय गोष्ट आहे कीं जी तूं मागितली असता मी तुला देणार नाहीं? माग माग, मोना, माग."

मोना एक क्षणभर थाबली आणि फ्रेडरिगोच्या डोळ्याला डोळा न देता हलक्या स्वरांत एकदम म्हणाली, "मला तुझा बहिरससाणा पाहिजे आहे."

फ्रेडरिगो ताडकन् उभा राहिला. जणुं काहीं तिनें त्याच्या छातींत कट्यारच खुपसली होती. तो ओरडून म्हणाला, "काय, माझा बहिरससाणा पाहिजे तुला?" असें म्हणून दोन्ही हातांनीं आपलें तोंड झाकून घेऊन तो एखाद्या लहान मुलासारखा ढसढसा रडूं लागला. मोनाला वाटलें, बहिरससाणा आपल्या-पासून जाणार या वियोगाच्या विचारानें त्याला दुःख होत आहे.

फ्रेडरिगो आक्रोश करीत म्हणाला, "माझ्या दुर्दैवानें माझा पुरता सूड उगवला. आजपर्यंत त्यानें माझा जेवढा छळ केला नव्हता तेवढा त्यानें आज केला. माझा पुरता गळाच कापला त्यानें. ज्या वेळेला पृथ्वीमोलाची गोष्ट मी तुला देऊं शकलो असतो, त्या वेळीं तूं कधीं माझ्याजवळ काहीं मागितलें नाहींस; आणि आयुष्यात आज पहिल्यानेंच तूं एक लहानशी गोष्ट मागितलीस ती मला देतां येऊ नये! या माझ्या नशिबाला काय म्हणावें?"

फ्रेडरिगोचें आपल्या बहिरससाण्यावरील निरतिशय प्रेम बघून मोनाचें हृदय भरून आलें. उगीच आपण त्याला तो मागितला असें तिला वाटलें.

"मोना," फ्रेडरिगो हुंदके देत म्हणाला, "तूं इथें आलीस त्या वेळीं मला माझा बहिरससाणा का मागितला नाहींस ग! त्या वेळीं मी तो तुला देऊं

शकलों असतों. आतां कुठून मी तो देऊं?"

"म्हणजे?" मोना एकदम चमकून म्हणाली, "कुठें आहे तुझा बहिरससाणा? तो उडून गेला कीं तूं तो कोणाला देऊन टाकलास?"

"नाहीं ग, मीं तो कुणाला दिला नाहीं किंवा तो उडूनही पण गेला नाहीं!" फ्रेडरिगो व्याकुळ स्वरांत म्हणाला, "तुला दाखवतो तो कुठं गेला तें." असें म्हणून फ्रेडरिगो घरात गेला आणि बहिरससाण्याची पिसें, मुंडकें आणि पाय हातामध्यें घेऊन तो बाहेर आला आणि मोनापुढें तीं टाकून तो रुद्ध स्वरानें म्हणाला, "याला मारून मीं मघाशी तुझें जेवण बनविलें बरें, मोना! तो फार नशीबवान् होता. पण मी मात्र कमनशिबी ठरलो."

मोनाच्या दुःखाला सीमा राहिली नाहीं. पण आपल्यासाठीं फ्रेडरिगोनें आयुष्यातील एकुलत्या एक प्रियतम वस्तूचा बळी दिला, त्याअर्थी त्याचें आपल्यावर केवढें प्रेम आहे याची मात्र तिला कल्पना आली. एवढें प्रेम आणि एवढें औदार्य आयुष्यात तिनें अनुभवलें नव्हते. त्याच क्षणीं फ्रेडरिगोविषयीं तिला पराकाष्ठेचा आदर वाटू लागला. बहिरससाणा न मिळाल्यामुळें आतां मुलाची प्रकृति सुधारण्याचा शेवटचा उपाय सपला या विचारानें ती दुःखी झाली व फ्रेडरिगोचा निरोप घेऊन ती जड पावलानीं आपल्या घरी आली.

त्या दिवसापासून मोनाच्या मुलाची प्रकृति बिघडत गेली. 'फ्रेडरिगोचा बहिरससाणा मला पाहिजे' असा तो हट्टच धरून बसला. थोड्या दिवसानीं त्याचें दुखणे विकोपास जाऊन तो मरण पावला. मोनाच्या दुःखाला पारावारच राहिला नाहीं. एकुलता एक मुलगा मरण पावल्यानंतर आईला काय दुःख होतें याचें कसें वर्णन करावें? मुलाची आठवण करीत मोना आपलें आयुष्य कसेंबसें कंठूं लागली.

त्याही गोष्टीला बराच काळ लोटला. मोनाला थोरला भाऊ होता. तो एक दिवशीं मोनाला म्हणाला, "मोना, झाल्यागेल्या गोष्टीला उपाय नाहीं. आता दुःख करीत बसून काय उपयोग? अजून तू तरुण आहेस. सुंदर आहेस. सबंध आयुष्य तुझें जायचें आहे. तेव्हा तू पुन्हा लग्न करावेंस, हें बरें." मोना कांहीं बोलली नाहीं. ती म्हणाली, "मला पुन्हा लग्न करायचें नाहीं."

पण मोनाचा भाऊ जसा वरचेवर तिला लग्न करण्याचा आग्रह करूं लागला तशी एक दिवस ती म्हणाली, "आतां तूं म्हणतो आहेस म्हणून मी तुला सागतें. मीं पुन्हा लग्न केलेंच तर तें फ्रेडरिगोशीं करीन." भाऊ म्हणाला, "किती

मूर्ख आहेस तू! त्या दरिद्री माणसाशीं लग्न करणार?" मोना म्हणाली, "फ्रेडरिगोच्या श्रीमंतीची तुला काय कल्पना आहे? त्याच्या हृदयात जी श्रीमंती भरली आहे, तिच्या पासगाला जगातल्या साऱ्या कुबेराची दौलत पुरणार नाहीं!"

मोनाचा विचार बदलणें अशक्य आहे हें बघून शेवटीं फ्रेडरिगोशीं लग्न करावयास तिला भावानें परवानगी दिली. आयुष्यात इतक्या हालअपेष्टा भोगल्यानंतर फ्रेडरिगोचें भाग्य शेवटीं उदयाला आलें. पुढें दोघाचें लग्न लागलें आणि पुष्कळ वर्षेपर्यंत दोघानीं मोठ्या सुखानें आणि आनदानें संसार केला.

* * *

# ४ तुळशीची कुंडी

मेसिना शहरात तीन तरुण भाऊ राहात होते. वडिलांनीं त्यांना पुष्कळ धनदौलत ठेवून दिली होती. ते व्यापार करीत असत. त्याना एकच धाकटी बहीण होती. तिचें नाव लिसबेता. तिचें लग्न झालेलें नव्हतें. ती फार सद्‌गुणी आणि सुंदर मुलगी होती. त्या भावाच्या पेढीवर लॉरेंझो नावाचा एक तरुण नोकर होता. तो अतिशय हुशार होता. पेढीचा सर्व व्यवहार जवळजवळ तोच बघत असे. दिसायलाही तो सुदर आणि स्वभावानें अतिशय मनमिळाऊ होता.

कामानिमित्त तो वारवार घरात येई किंवा लिसबेताही कधींमधीं पेढीवर जाई. त्यामुळें दोघांची पुष्कळ वेळा गाठ पडत असे. आणि त्यांचें थोडें-फार बोलणेंही पण होई. लॉरेंझोचा हसतमुख चेहरा आणि त्याच्या चालण्या-बोलण्यातली ऐट बघून लिसबेताला तो मनातून आवडू लागला. आणि हळूहळू त्या आवडीचें रूपातर प्रेमात झालें. लिसबेता आपल्यावर मोहित झाली आहे, हें पुष्कळ दिवसपर्यंत लॉरेंझोच्या ध्यानात आलें नाहीं. त्या दृष्टीनें तो कधीं तिच्याकडे पाहातही नसे. कारण बोलून चालून ती त्याच्या मालकाची बहीण पडली. आणि तो तर एक सामान्य नोकर.

त्याच्यावर ती प्रेम करील ही कल्पना तरी त्याच्या डोक्यात कुठून येणार? तिच्या सौंदर्यानें त्याच्याही मनावर मोहिनी घातली होती. पण भक्त जसा देवतेची पूजा करतो, तशी मनातल्या मनात तो तिची दुरून पूजा करीत होता. आपल्याला तिचा लाभ होईल असें स्वप्नात देखील त्याला वाटलें नाहीं. पण ही काय लपवून ठेवता येण्यासारखी भावना आहे? एकमेकाबद्दल वाटणारें आकर्षण किती दिवस त्यांना दडपून ठेवतां येईल?

एक दिवस दोघानीं आपल्या हृदयातली रहस्यें एकमेकाला उघड करून दाखविलीं. त्या दिवसापासून दोघांनाही एकमेकावांचून चैन पडेनासें झालें. दोघेंही वेळ मिळेल तेव्हां एकमेकाला चोरून भेटूं लागलीं आणि एकमेकाच्या संगतींत

स्वर्गीय प्रेमाचा मनसोक्त आस्वाद लुटूं लागलीं. हा प्रेमसंबंध गुप्त ठेवणें पुढें पुढें त्याना कठीण होऊं लागलें. तरीसुद्धा लिसबेताच्या भावाना पुष्कळ दिवसपर्यंत या गोष्टीचा संशय देखील आला नाहीं.

एके रात्रीं लिसबेता आपल्या बागेत लॉरेंझोच्या गळ्याभोवतीं मिठी मारून बेहोषपणें बसली असता तिच्या सर्वांत थोरल्या भावानें तें पाहिलें. तें दृश्य पाहून काळजांत कोणीं तरी कट्यार खुपसावी तसें त्याला दुःख झालें. लॉरेंझो-सारख्या नोकरावर आपल्या बहिणीनें आपक व्हावें ही गोष्ट त्याला कधींही सहन होण्यासारखी नव्हती. त्याला आपल्या कुळाचा आणि संपत्तीचा फार मोटा अभिमान होता. आपल्या बहिणीसाठीं कोणा तरी धनाढ्य कुळवताचें स्थळ तो शोधीत होता. लॉरेंझोसारख्या हलक्या माणसाशीं आपल्या बहिणीचा संबंध आहे ही गोष्ट जगजाहीर झाली तर आपल्या घराण्याच्या अब्रूला बट्टा लागल्या-वाचून राहणार नाहीं, याविषयीं त्याला शका नव्हती. म्हणून उगाच आरडा-ओरडा आणि बभ्रा करण्यात अर्थ नाहीं, असा विचार करून त्याना आपली चाहूल लागूं न देता तो तसाच चोरपावलांनी मागे परतला.

सबंध रात्र त्यानें या प्रकरणाचा विचार करण्यात घालविली. सकाळ होताच त्यानें दोन्ही धाकट्या भावाना बोलावलें व आदल्या रात्रीं जो प्रकार त्यानें आपल्या डोळ्यानीं पाहिला होता तो त्याना इत्थंभूत वर्णन करून सांगितला. त्यानंतर पुष्कळ वेळ आपापसात खलबत करून त्यांनीं ठरविलें कीं, आपल्याला या गोष्टीचा सुगावा लागलेला आहे याचा काय वाटेल तें झालें तरी आपल्या बहिणीला किंवा लॉरेंझोला पत्ता लागूं द्यायचा नाहीं. आणि हें प्रकरण जास्त वाढून त्याला भलतेच स्वरूप प्राप्त होण्यापूर्वी आपल्या बेअब्रूचें कारण मुळातच अशा तऱ्हेनें नष्ट करून टाकावयाचें कीं या कानाचें त्या कानाला कळतां कामा नये. म्हणून लॉरेंझोशीं वागतांना आपल्या नेहमींच्या मनमोकळ्या वागणुकीत आणि हसण्याबोलण्यात यत्किंचितही फरक न होईल अशी त्यानीं सावधगिरी बाळगली.

पुढें एके दिवशीं वनविहाराला जाण्याचें मिष करून तिघे लॉरेंझोला घेऊन दूर रानात गेले आणि तेथें गैरसावधपणें तो बसला असता त्याच्या पाठींत कट्यार खुपसून त्यांनीं त्याला ठार केलें. आणि एका झाडाखालीं खोल खड्डा खांडून त्याचें प्रेत कोणालाही संशय न येईल अशा तऱ्हेनें व्यवस्थितपणें त्यांनीं पुरून टाकलें. जसें काहींच झालें नाहीं असे निर्विकार चेहरे करून दुसऱ्या

दिवशीं ते परत आले. कोणाला काहीं संशय यावयाला नको म्हणून काहीं महत्त्वाच्या कामासाठीं लॉरेंझोला आपण तातडीनें लांब कोठल्या तरी गावीं पाठवून दिलें आहे, असें त्यांनीं पेढीवरच्या नोकराना सांगून टाकलें.

लॉरेंझोची गैरहजेरी पेढीवर कोणालाही जाणवण्यासारखी नव्हती. पण लिसबेताला मात्र त्याचा विरह एक क्षणभर देखील सहन होण्यासारखा नव्हता. एक दिवस आणि एक रात्र तिनें कशी तरी कळ काढली. पण त्यानंतर मात्र लॉरेंझो कुठें गेला आणि केव्हां परत येणार हें ती चिंतातुर चेहरा करून आपल्या भावांना एकसारखी विचारूं लागली. तिला पुन्हा पुन्हा उत्तरें देतांना तिच्या भावाची पुरेवाट होऊं लागली.

शेवटीं थोरला भाऊ चिडून म्हणाला, "लॉरेंझोची तूं पुन्हा पुन्हा काय म्हणून चौकशी करते आहेस? तुझा न् त्याचा काय संबध? तो कुठें गेला न् केव्हा येणार हे समजून तुला काय करावयाचें आहे?" भावाच्या या प्रश्नाना लिसबेता काय उत्तर देणार? ती गप्प बसली आणि आपल्या खोलीत येऊन ढसढसां रडूं लागली. 'माझा आवडता लॉरेंझो कुठे गेला असेल? तो मला न विचारतां अशा रीतीनें जाणें शक्य तरी आहे काय? मग इतका वेळ मला दूर सोडून तो कसा राहिला बरें? तो आजारीबिजारी तर पडला नसेल? किंवा त्याच्या प्राणावर एकादें संकट तर ओढवलें नसेल? तसेंच असेल. नाहीं तर त्यानें पत्र नसतें का मला लिहिलें? नाहीं तर कोणाच्या तरी हातीं निरोप नसता का पाठविला? कोण माझ्या प्रियकराची ताबडतोब खबर घेऊन येईल बरें?'

असे नाना तऱ्हेचे विचार आणि शंका तिच्या मनामध्यें आल्या. त्यानंतर अष्टौप्रहर ती लॉरेंझोचा विचार करूं लागली. रात्रीच्या रात्री बिछान्यावर त्याची आठवण काढीत ती रडत बसे. मधून मधून दुःखाचीं आणि विरहाचीं गाणीं म्हणे. 'माझी आणि लॉरेंझोची लवकरच भेट होऊं दे,' अशी परमेश्वराची ती करुण स्वरानें प्रार्थना करी. क्षणोक्षणीं तिला मनांतून वाटे कीं आतां लॉरेंझो येईल, मग येईल. पण प्रत्येक वेळीं तिची निराशा होई. लॉरेंझोची वाट पाहतां पाहता तिचे डोळे थकून गेले आणि शरीर सुकून गेलें.

एके दिवशीं ती मध्यरात्रीं आपल्या बिछान्यावर अशीच रडत बसली असतां रडता रडता थकून तिचे डोळे मिटले, आणि तिला झोप लागली. थोड्या वेळानें तिला स्वप्न पडलें आणि स्वप्नात तिचा प्रियकर तिच्या समोर उभा राहिला. त्याचे कपडे फाटून रक्तानें भरले होते. त्याच्या छातींत खंजीर खुपसलेला

होता. त्याचे गाल बसले होते. केस धुळीनें भरले होते. आणि तोंड पांढरें फटफटीत पडले होते.

तो कण्हत कण्हत तिला म्हणाला, "तूं माझी वाट पाहात रडत बसली आहेस, हे मला ठाऊक आहे. मी का इतके दिवस आलो नाहीं म्हणून तूं मला दोष देते आहेस. माझ्या प्रेमाविषयी नाना तऱ्हेच्या शका तुझ्या मनात येत आहेत. पण मी तरी काय करूं ? मी आता तुझ्याकडे परत कसा येऊ ? तुझ्या भावानीं माझ्या छातींत खजीर खुपसून मला ठार मारलें आहे. आणि येथें रानात मला पुरून टाकलें आहे ग. आता तुझी आणि माझी या जन्मात पुन्हा भेट होणें शक्य नाही."

असें म्हणून आपल्याला कोणत्या रानात कोणत्या ठिकाणीं पुरलें आहे याच्या नेमक्या खाणाखुणा लॉरेंझोनें तिला वर्णन करून सागितल्या आणि तो अदृश्य झाला. लिसबेता रडत रडत स्वप्नातून जागी झाली. तिला तें स्वप्न अगदी खरें वाटले.

सकाळ होतांच ती उठली आणि कोणा तरी मैत्रिणीकडे जाऊन येते आहे, असें सागून ती घरातून बाहेर पडली. बरोबर तिनें आपल्या विश्वासातली एक मोलकरीण घेतली. स्वप्नात लॉरेंझोनें वर्णन केलेल्या रानामध्यें त्याला ज्या झाडाखालीं तिच्या भावानीं मारून पुरून ठेवलें होतें, त्या ठिकाणीं ती नेमकी गेली. सगळ्या खाणाखुणा अगदीं बरोबर जुळल्या. झाडाखाली पानाचा खूपच गळाठा पडला होता. तिनें तो हातानीं बाजूला केला. खालची माती भुसभुशीतच होती. ती दोघींनीं हातानीं भराभर उकरली. थोड्या वेळानें आतमध्यें पुरलेलें लॉरेंझोचें प्रेत तिला आढळून आलें. त्याला मारून इतके दिवस झाले होते तरी त्याचें प्रेत कुठेही कुजलेले नव्हते. ते अगदीं होते तसेंच राहिलें होते.

आपल्या दुर्दैवी प्रियकराची आपल्या भावानीं केलेली ती भयकर अवस्था पाहून लिसबेताच्या दुःखाला पारावार उरला नाहीं. ती लॉरेंझोच्या प्रेतावर डोकें ठेवून रडरड रडली. पण तशा तऱ्हेनें ती त्या ठिकाणीं रडणार तरी किती वेळ ? लॉरेंझोचें शरीर तेथून हलवून त्याचें योग्य तऱ्हेनें दफन करावें असें तिला वाटलें. पण त्या दोघींना ते शरीर तेथून उचलून नेणें कसें शक्य होतें ? शेवटीं लिसबेतानें लॉरेंझोचें मस्तक आपल्या सुरीनें त्याच्या शरीरापासून वेगळें केलें. आणि एका रेशमी रुमालात बाधून ते बरोबर घेतलें. बाकीचें शरीर तिनें पूर्वीप्रमाणेंच तेथें नीट पुरून टाकलें आणि कोणाच्या दृष्टीस न पडेल अशा रीतीनें ती घरीं आली.

स्वतःच्या खोलींत तिनें आपल्याला बंद करून घेतलें. लॉरेंझोचें मस्तक आपल्या हृदयाशीं धरून तीन दिवस आणि तीन रात्री एकसारखी ती रडत होती. आपल्या अश्रूंची तिनें त्यावर सतत धार धरून जणुं काहीं अभिषेकच केला. चुंबनाच्या हजारो गुलाबपाकळ्या त्यावर उधळून त्याची पूजा केली. मग कुंभाराकडून तिनें एक चांगली शोभिवंत मातीची कुडी मागविली आणि तिच्यात मधोमध लॉरेंझोचें मस्तक ठेवून वर माती घातली. तीवर सुवासिक तुळशीचीं लहानलहान रोपे लावून टाकली. ती तुळशीची कुंडी आपल्या बिछान्याच्या एका उशाशी घडवचीवर तिनें ठेवून दिली.

त्या तुळशींना पाणी घालावयाची तिला कधीं गरजच पडली नाहीं. रोज त्याच्यावर ती आपल्या अश्रूंची वृष्टि करी आणि कधीकधी ती त्याच्यावर गुलाबपाण्याचें शिपण करी. तासचे तास ती त्या कुंडीशेजारीं बसे. आणि लॉरेंझोच्या चेहऱ्याकडे ज्या प्रेमपूर्ण दृष्टीनें ती पाहात असे, तशाच नजरेनें ती त्या तुळशीच्या वाढत्या रोपाकडे टक लावून बघे. कधीं कधीं ती त्या तुळशीच्या शेंड्यावर आपले गाल टेकवून रडत बसे. आणि मग कुंडी तिच्या अश्रूंनीं भरून जाई.

असे किती तरी दिवस गेले. तिच्या अश्रुजलाच्या सतत शिपण्यानें आणि निश्वासाच्या उष्णतेनें त्या कुंडींतील तीं तुळशीची रोपे भराभर वाढली. त्यांच्या-वर मंजिऱ्याचे तुरे डोलूं लागले. आणि त्यांच्या पानांना नि तुऱ्यांना विलक्षण सुगंध येऊं लागला. त्या सुगंधानें तिची खोलीच काय पण सारें घर आणि घराच्या आजूबाजूचा सारा भाग दरवळून गेला.

लिसबेतासारखी तरुण आणि सुंदर मुलगी आपल्या खोलीचें दार बंद करून तुळशीच्या कुंडीशेजारीं एकसारखी रडत बसलेली असते ही बातमी बाहेर फुटावयाला काहीं फार वेळ लागला नाहीं. शेजारी राहणाऱ्या लोकांना सबंध रात्रभर तिच्या खोलीत दिवा दिसे. कधीं कधी ती आपल्या खोलीच्या सज्ज्यात आपल्या प्रियकराच्या विरहाचीं करुण गीते गात उभी राही. त्या गाण्याचे सूर ऐकून ऐकणाराच्या हृदयाचें पाणी होई.

एवढ्या तरुण वयात हिला एवढें कसलें दुःख आलें आहे? कोणाची आठवण करून ही गाते आहे? आणि रडून रडून आपल्या सौंदर्याचा असा का नाश करते आहे? असे प्रश्न शेजारीपाजारी आपापसात कुजबुजून विचारीत. पण त्यांचीं उत्तरें कोणालाही देतां येत नसत. काहीं लोकांनीं धीर करून तिच्या

भावानासुद्धां विचारलें कीं, "ही अशी का करते?"—भाऊ काय उत्तर देणार? ते म्हणाले, "पुष्कळ दिवस झाले, ही अशीच चमत्कारिकपणें वागते."

पुढें पुढें लिसबेता रडून रडून जवळ जवळ आंधळी झाली. तिला अंधुक अंधुक दिसूं लागलें. तिच्या भावाना तर तिचें दुःख बघवेना. त्यानीं तिला पुष्कळ समजावून सांगितलें. नाना तऱ्हेची तिला आमिषे दाखविली. शेवटीं रागावून धाकदपटशासुद्धा दाखविला. पण त्याचा तिच्या मनावर कांहीं परिणाम झाला नाहीं. तोंडातून अक्षर न काढता मान गुडघ्यात घालून ती तुळशीच्या कुंडीशेजारी बसून मुळुमुळु रडे.

ती तुळशीची कुंडी तिच्यापासून दूर नेली म्हणजे तिचें रडणें थांबेल, अशा विचारानें एक दिवस तिच्या एका भावानें तिला न कळत ती कुंडी तेथून उचलून नेली आणि बागेत एका कोपऱ्यात ठेवून दिली. हे जेव्हा लिसबेताच्या लक्षात आलें तेव्हा तिनें रडून रडून आकाशपाताळ एक केलें. "माझी तुळशीची कुंडी कुठे आहे?—माझी तुळशीची कुंडी कुठें आहे?" असा तिनें रडून एकसारखा आक्रोश चालविला. तिच्या भावानी तिच्याकडे लक्ष द्यावयाचें नाहीं असें ठरविलें.

शेवटीं दुःखातिरेकानें ती आजारी पडली आणि तिनें अंथरूण धरलें. पण आजारीपणातही ती आपल्या तुळशीच्या कुंडीला विसरली नाहीं. झोपेत आणि बेशुद्धावस्थेंत असतानाही 'माझी तुळशीची कुंडी घेऊन या हो!' असें ती क्षीण आवाजात पुटपुटत असे. त्यामुळें तिच्या भावाची जिज्ञासा एक दिवस जागृत झाली. एवढं हिला वेड लागण्याइतकें त्या तुळशीच्या कुंडीमध्यें आहे तरी काय याचा शोध लावायचें त्यानीं ठरविलें.

बागेत येऊन त्यानी त्या कुंडीतली सारी माती उकरून बाहेर काढली. तो तिच्या तळाशीं त्याना लॉरेंझोचें डोकें आढळून आलें. त्या डोक्यावरचे इतर सारे अवयव कुजून झडून गेले होते. पण त्याच्या कुरळ्या केसावरून तें डोकें लॉरेंझोचेंच असावें हें त्यांनीं ताबडतोब ओळखलें. आपलें पाप शेवटीं उघडकीस आलें. कदाचित् त्याचा सुगावा जर आधींच दुसऱ्या कोणाला लागला असेल, तर त्याबद्दल आपल्याला देहदंडाची शिक्षा सोसावी लागेल. म्हणून या शहरात आता अधिक राहणें धोक्याचें आहे असा विचार करून त्यांनीं तें डोके एका अज्ञात स्थळीं पुरून टाकलें. आणि एक दिवस मेसिना शहर सोडून ते दूर कोणत्या तरी देशात परागंदा झाले.

कांहीं दिवसांनीं लिसबेता मरण पावली. तिचें दुःख आणि शोक शेवटपर्यंत थांबली नाहींत. तिच्या दुर्दैवी प्रेमाची हृदयद्रावक कथा ती मरण पावल्यानतर काहीं दिवसानीं जेव्हा लोकाना समजली, तेव्हा त्याना अतिशय दुःख झालें. मोठमोठ्या शाहिरानीं या अमर प्रेमकहाणीवर कवनें रचली. तीं सर्वांच्या तोंडीं झाली. लिसबेता आणि लॉरेंझो याचीं नावें उच्चारताच मेसिनाच्या लोकाच्या डोळ्यातून अद्याप पाणी वाहूं लागते.

* * *

# ५ महात्मा कपोत

एक गहन अरण्य होते. त्या अरण्यात एक दुष्ट फासेपारधी राहात असे. पक्ष्याचा आणि लहान लहान प्राण्याचा तो काळ होता, कारण त्याना मारून तो आपले पोट जाळीत असे. अशा माणसाला कोण मित्र असणार? त्याच्या या क्रूर उद्योगामुळें त्याच्याशीं कोणीहि संबध ठेवीत नसे. त्याच्या भाऊबदानी आणि नातेवाइकानीं त्याला जवळजवळ टाकूनच दिलें होते. त्याचें कारण असे कीं, जे निर्दय आणि दुष्ट लोक गरीब आणि निरपराध जीवाची कांहीं कारण नसता हत्या करतात त्याच्या जवळ देखील जाण्याचें माणसाना भय वाटते. सापाला पाहिल्याबरोबर माणसे नाहीं का दूर पळत?

तो फासेपारधी रोज सकाळी उठे. हातात जाळे, पिंजरा आणि दांडके घेऊन फिरे. जे प्राणी सापडतील त्याना मारून तो घरीं परत आणी. एकदा काय झालें कीं तो असाच रानात फिरत असताता चारी दिशानीं आभाळ काळयाकुट्ट ढगानीं भरून गेलें. भयकर वादळ सुटलें आणि मुसळधार पाऊस पडू लागला. जगाचा नाश होण्याची वेळ जणु काहीं जवळ आली असें वाटू लागलें.

फासेपारधी अगदी घाबरून गेला. पावसाच्या माऱ्यानें तो ओलाचिंब होऊन त्याचे हातपाय अगदीं गारटून गेले. निवाऱ्याला कोठे जागा मिळते आहे का ते शोधण्यासाटीं थरथर कापत अंधारात तो हळूहळू फिरूं लागला. इतक्यात त्याला एक मोठं झाड दिसलें. त्या झाडाखाली जाऊन पाऊस थाबण्याची तो वाट पाहात बसला.

काहीं वेळानें पाऊस एकदम थाबला. आभाळ निवळूं लागलें. एकेक ढग जसजसा बाजूला होऊं लागला, तसतशीं आकाशात तेजस्वी नक्षत्रे चमकतांना त्याला दिसू लागली. तेव्हा त्याला आनंद झाला व देवाची आठवण होऊन मनातल्या मनांत तो प्रार्थना करूं लागला कीं, "देवा, तुझ्या कृपेनें मी आज बांचलों."

त्याच झाडावर एक कपोत पक्षी राहात होता. त्या झाडाच्या ढोलींत त्याचें

घरटें होतें. तो फासेपारधी जेव्हा देवाची प्रार्थना करीत खालीं बसला होता, त्याच वेळीं त्याच्या डोक्यावरील फादीवर तो कपोत पक्षी आपल्या बायकोसाटीं दुःखानें आक्रोश करीत बसला होता. कारण दुपारपासून त्याची बायको कुठे तरी गेली होती. आणि रात्र होऊन गेली तरी अजून परत आली नव्हती.

स्फुदत स्फुदत तो पक्षी स्वतःशींच बोलत होता, "एवढें वादळ झालें. मुसळधार पाऊस पडला. आणि अजून माझी लाडकी बायको घरीं परत आली नाहीं. कुठे बरें असेल ती? ती घरी नसली म्हणजे हे घर कसें शून्य वाटतें मला! ज्या घरात पत्नी ते नाहीं मुळीं घरच नव्हे. ज्या घरात गृहिणी असते त्यालाच घर म्हणतात. गृहिणीवाचून घर हे मला अगदीं अरण्यासारखे वाटते. काहीं गृहिणींचें आपल्या पतीवर एवढें प्रेम असतें कीं पतीच्या हितासाटीं त्या आपला सारा जन्म खर्च करतात. अशा स्वभावाची बायको ज्या पुरुषाला लाभत असेल त्याच्यासारखा जगात धन्य कोण आहे बरें?"

झाडाखाली बसलेल्या फासेपारध्याच्या पिंजऱ्यात कपोत पक्ष्याची बायको बिचारी बसली होती. वादळ होण्यापूर्वीच फासेपारध्यानें तिला पकडलें होतें. आपल्या पतीचें शोकपूर्ण भाषण ऐकून ती कपोतिका मनामध्यें अतिशय संतुष्ट झाली. वर झाडाच्या फादीवर बसलेल्या कपोताला उद्देशून पिंजऱ्यातून ती म्हणाली, "ज्या स्त्रीचा पति तिच्यावर संतुष्ट नाही, तिला स्त्री कसें म्हणता येईल? ज्या स्त्रीवर तिचा पति प्रसन्न आहे तिजवर सर्व देवता प्रसन्न आहेत, असें म्हणायला हरकत नाहीं. ज्या स्त्रिया आपल्या नवऱ्याना संतोष देत नाहींत त्या, वनाला लागलेल्या वणव्यात ज्याप्रमाणें फुललेल्या वेली जळून जातात त्याप्रमाणें जळून जावोत."

त्यानतर ती आपल्या नवऱ्याला पुन्हा म्हणाली कीं, "अहो, मी काय बोलतें आहें ते नीट लक्ष देऊन ऐका. तुमच्या कल्याणाची मी एक गोष्ट सागतें. आपल्या आश्रयाला आलेल्या माणसाच्या रक्षणासाटीं प्राणसुद्धा द्यायला तुम्ही तयार असलें पाहिजे. हा फासेपारधी या झाडाखालीं असहाय होऊन पडलेला आहे. तो तुमच्या दाराशीं आलेला एक पाहुणाच नव्हे काय? थंडीनें आणि भुकेनें तो अगदीं अर्धमेला झालेला आहे. त्याचा समाचार घेणें हें तुमचें कर्तव्य आहे. असें म्हणतात कीं, सध्याकाळच्या वेळीं अतिथि आपल्या दारात आला असतां, त्याचा आपण यथाशक्ति सत्कार जर केला नाहीं, तर आपल्या पुण्याचा ऱ्हास होतो आणि आपल्याला पाप लागते.

"तुमच्या आवडत्या बायकोला पकडून त्यानें पिंजऱ्यामध्यें बंद करून ठेवलें आहे, म्हणून तेवढ्यामुळें तुम्ही त्याचा द्वेष करू नका! प्राक्तनात जें आहे ते कांहीं टळत नाहीं. पूर्वजन्मीं केलेल्या पापामुळें मी याच्या पिंजऱ्यात अडकून पडलें आहें. कारण तुम्हाला माहीत आहे कीं, दारिद्र्य, दुःखे, रोग, बंदिवास आणि संकटें ही प्राण्याच्या पापवृक्षाला येणारीं निरनिराळीं फळेंच होत. म्हणून माझ्या बंदिवासामुळें तुम्हाला या पारध्याचा जो द्वेष वाटत असेल तो आपल्या मनातून अजिबात काढून टाका. आणि आपला धर्म काय आहे तो लक्षात आणून तुम्ही त्याचें योग्य तऱ्हेनें आतिथ्य करा."

आपल्या चतुर आणि सद्गुणी पत्नीचें ते भाषण ऐकून त्या कपोत पक्ष्याच्या अंगात एक नवीनच धैर्य संचारलें. आणि तो त्या फासेपारध्याला उद्देशून म्हणाला, "मित्रा, तुझे स्वागत असो. तुझी मी काय सेवा करू तें सांग! या ठिकाणीं तूं आपल्या स्वतःच्या घरीं आला आहेस असें समज, आणि जिवाला विनाकारण त्रास करून घेऊं नकोस!"

त्याचें भाषण ऐकून पक्ष्याचे प्राण घेणारा तो पारधी म्हणाला, "कपोता, माझ्या अंगात थंडी भरली आहे रे! ती थंडी नाहींशी होईल असें तूं काहीं कर!" त्या रानात कुठें तरी एक शेकोटी पेटलेली होती. तिच्यांत उरलेला एकच निखारा तो कपोत चोचींत घेऊन आला. आणि त्याजवर वाळलेली पानें घालून त्यानें तीं ताबडतोब पेटविली.

मग तो त्या पारध्याला म्हणाला, "या अग्नीच्या उष्णतेवर आतां तूं आपले गारठलेले हातपाय खुशाल गरम कर! मात्र तुझी क्षुधा दूर करण्याचें मजजवळ काहीं साधन नाहीं, याचें मला वाईट वाटते. या जगात काहीं हजाराचे पोशिंदे आहेत. काहीं शंभराचे पोशिंदे आहेत. काहीं दहाचे पोशिंदे आहेत. पण मी स्वतः एवढा अभागी आहें कीं, माझे हें लहानसें क्षुद्र पोटही मला भरतां येत नाहीं. आपल्या घरीं आलेल्या तुमच्यासारख्या अतिथीला अन्न देण्याचेंसुद्धा ज्याच्या अंगीं सामर्थ्य नाहीं त्यानें आपलें दुःखी जीवन कां म्हणून जगावें? म्हणून या क्लेशपूर्ण जीविताचा मी आतां नाशच करून टाकतों. म्हणजे घरीं आलेल्या गरजू अतिथीला नाहीं म्हणण्याची यापुढें माझ्यावर कधीं पाळीच यावयाची नाहीं."

अशा रीतीनें त्या पारध्याला कसलाही दोष न देतां स्वतःचीच निर्भर्त्सना करून तो कपोत पक्षी त्याला म्हणाला, "आतां एक क्षणभरच थांब. मी तुला

संतुष्ट करतों." असें म्हणून तो धर्मात्मा कपोत जणुं कांहीं आपल्या घरांत प्रवेश करतो आहे अशा प्रसन्न अंतःकरणानें अग्नींत शिरला.

विस्तवात तो कपोत जळत असलेला पाहून त्या पारध्याचें कठोर अंतःकरण दयेनें कळवळलें. तो स्वतःशीं म्हणाला, "जो माणूस पाप करतो, तो आपल्या स्वतःचा शत्रु असतो. आपण केलेल्या पापाचीं फळें आपल्यालाच भोगावीं लागतात. माझी बुद्धि पापी आहे. माझे कर्म पापी आहे. तेव्हा शेवटीं महाघोर अशा नरकांत मी जाऊन पडणार यांत शंका नाहीं. या महात्म्या कपोतानें आपल्या प्राणाचें बलिदान करून माझे दुष्टाचे आज डोळे उघडले. आजपासून सर्व भोगांचा मी त्याग करीन. आणि उन्हाळ्यात पाणी ज्याप्रमाणें आटतें त्याप्रमाणें माझे शरीर मी कृश करून घेईन. थडी, वारा, ऊन यांजपासून माझ्या देहाचें रक्षण मी करणार नाहीं. नाना तऱ्हेचे उपवास करीन. आणि यापुढें उत्तम धर्मानें वागत जाईन." असें म्हणून त्या पारध्यानें आपलें जाळें, पिंजरा, खुंट्या आणि दांडकें मोडून फेकून दिली.

पिजऱ्यातून मुक्त झालेली कपोतिका विस्तवात भाजलें जाणारें आपल्या पतीचें कोमल शरीर पाहून दुःखानें आणि शोकानें रडू लागली, "नाथ, तुमच्यावाचून आतां मी कशी बरें जगूं ? जिचा पति मरण पावलेला आहे आणि जी दीन झालेली आहे, अशा स्त्रीनें जगण्यांत काय अर्थ आहे ? जी स्त्री विधवा झालेली आहे, तिचा मान आणि स्वाभिमान नष्ट होतो. कुटुंबात तिला कुणी विचारीनासें होतें. भाऊ तिची पर्वा करीत नाहींत. आणि सेवकजन तिची आज्ञा पाळीत नाहींत."

अशा रीतीनें आपल्या पतीबद्दल पुष्कळ वेळ शोक केल्यानतर त्या पतिव्रतेनें त्या जळत्या अग्नीमध्यें प्रवेश केला. आणि त्यानंतर काय चमत्कार झाला म्हणून सांगावें ? तेजस्वी वस्त्रांनीं आणि अलंकारानीं भूषित केलेला असा दिव्य देह त्या कपोतिकेला प्राप्त झाला. तिच्याप्रमाणेंच तिच्या पतीलाही दिव्य आकृतीचा लाभ झालेला तिनें पाहिला. तो एका विमानांत बसलेला होता.

तो म्हणाला, "हे साध्वी, माझ्या पावलावर पाऊल ठेवून तूं माझ्यामागून आलीस हें फार चागलें केलेंस ! ज्या स्त्रिया आपल्या पतीच्या मागोमाग जातात, त्या माणसाच्या शरीरावर उगवलेल्या कोट्यवधि केसाच्या संख्येइतकीं वर्षे स्वर्गांत जाऊन राहतात."

असें म्हणून हर्षभरित अंतःकरणानें त्यानें तिला ओढून वर विमानांत घेतलें आणि मोठ्या प्रेमानें आलिंगन दिलें.

तें दृश्य पाहून फासेपारध्याला अतिशय पश्चात्ताप झाला. आपल्या आयुष्याचा त्याला अगदीं वीट आला आणि आत्महत्या करण्याचा निश्चय करून तो घोर अरण्यांत निघून गेला. तेथें एका ठिकाणीं त्याला वणवा लागलेला दिसला. त्यांत प्रवेश करून त्यानें आपल्या शरीराबरोबर आपल्या सर्व दुष्ट इच्छा आणि पापेही जाळून घेतलीं. तोही मग पुढें आनंदानें स्वर्गात गेला.

* * *

# ६ लोकमान्य टिळक आणि मी !

सदतीस वर्षांपूर्वीची गोष्ट. त्या वेळीं सासवड येथील इंग्रजी शाळेमध्यें दुसऱ्या इयत्तेत मी शिकत होतों. दहा वर्षांचा होतों मी. आमच्या गांवांत इंग्रजी शाळा सुरू होऊन तीनचारच वर्षें झालीं होतीं. त्यामुळें मराठी चौथी इयत्ता पास झाल्यावर मी सरळ इग्रजी शाळेंतच गेलों. ही इग्रजी शाळा जर त्या मोक्यास आमच्या गावात निघाली नसती, तर मराठी सात इयत्ता पुऱ्या करून गावचा कुळकर्णी किंवा तलाठी होण्याची माझी महत्त्वाकाक्षा होती !

खेडेगावच्या मराठी आणि इंग्रजी शाळेमध्यें त्या वेळीं मुख्य एकच फरक आम्हाला दिसून आला. आणि तो म्हणजे मराठी शाळेमध्यें आम्हाला एकाच मास्तराचा तोच तो वाढलेल्या दाढीचा कंटाळवाणा चेहरा वर्षभर पाहणें भाग पडे आणि इंग्रजी शाळेमध्यें आम्हाला एकाच वर्गाला शिकवायला निदान तीन-चार तरुण तरुण मास्तर तरी येत. एक इंग्रजी शिकवायला, एक ड्रॉइग आणि खर्डे दाखवायला, एक मराठी आणि इतिहास सागायला आणि एक बाकीचे राहिलेसाहिले विषय भरडून टाकायला.

दिवसभर तीनचार मास्तरांची ये-जा वर्गामध्यें होत असल्यामुळें एकाच मास्तराच्या सासुरवासाला कंटाळून मराठी शाळेमधून आलेल्या आम्हां मुलांना इंग्रजी शाळा म्हणजे त्या वेळीं केवढा विरंगुळा वाटत होता ! मागल्या तासाचे मास्तर जाण्यांत आणि पुढल्या तासाचे मास्तर येण्यांत निदान दहा-बारा मिनिटें तरी वायां जात. त्यामुळें प्रत्येक तासाचे शेवटीं आम्हांला वर्गांत हिंडावयाला, ओरडावयाला आणि हुंदडावयाला चांगलाच अवकाश मिळे.

त्यातून आमचा वर्ग होता तिसऱ्या मजल्यावर एका बाजूला. दोन उंच, अरुंद आणि अंधारे जिने चढून आमच्या वर्गामध्यें मास्तर सहजासहजीं पोंचत नसत. आणि आलेच एखादे मास्तर लवकर तर ते धापा टाकीत खुर्चीवर बसत आणि मग पाण्याचा तांब्या भरून आणण्यासाठीं आमच्यापैकीं एकाद्या

मुलाला खालीं तळमजल्यावर धावत जावें लागत असे. मग मास्तर पाणी पिऊन गार झाल्यावर पुढें आस्ते आस्ते शिकवायला सुरुवात होई.

तेवढ्यांत दहा-पंधरा मिनिटें सहजच निघून जात. आणि आम्हांला पाहिजे तेवढा विसांवा सहज मिळत असे. शिकण्याकडे त्या वेळीं आमचें लक्ष होतें कुठें ! मास्तर वर्गात जास्तींत जास्त उशिरां येतील कसे आणि शक्य तेवढ्या लवकर वर्गांतून रवाना होतील कसे याच विवंचनेंत आम्ही त्या वेळीं गुंतलेले असूं.

पण या आमच्या कार्यक्रमांत एके दिवशीं अचानक क्रांति घडून आली. सुभेदार नावाच्या एका नवीन मास्तराची आमच्या वर्गावर नेमणूक झाली. भोर संस्थानचे राहणारे होते ते. आणि आमच्या वर्गातल्या एका मुलाचे जवळचे नातेवाईक होते. सव्वीस-सत्तावीस वर्षांचें वय असेल त्याचें त्या वेळीं. उजळ रंग, तेजस्वी डोळे आणि त्याच्या वयाला न शोभतील इतक्या ओठ झाकून टाकणाऱ्या मोठ्या मोठ्या मिशा. त्याच्या मिशा बघून प्रथमदर्शनीं आमच्या मनांत एकदम दडसच बसली. पण त्यांनीं बोलावयाला सुरुवात केली मात्र— एकदम वर्गांमधलें वातावरणच बदलून गेलें.

त्याची बोलण्याची पद्धति जलद आणि अस्थिर होती. पण त्याच्या शब्दा-शब्दामध्यें एक नवीन तऱ्हेचें आकर्षण आणि खेळकरपणा होता. "मित्रांनो—" आम्हांला उद्देशून ते म्हणाले. पायापासून डोक्यापर्यंत काहीं तरी गोड भावना विजेच्या फटकाऱ्यासारखी चमकून गेली. आमच्या छातींत कांहीं तरी 'थर्र' झाल्यासारखे वाटलें. एवढींशीं आम्ही पोरटीं ! अन् मास्तरांनीं आम्हांला 'मित्रांनो' अशी हाक मारावी ! फारच चमत्कारिक वाटलें तें आम्हांला ! शिवीगाळीखेरीज आणि धमकीखेरीज मास्तरांच्या तोंडून दुसरीं संबोधनें ऐकण्याची तोंपर्यंत मुळीं संवयच नव्हती आम्हाला ! 'मित्रांनो !' बस्स, त्या एका शब्दानें सुभेदार मास्तरानीं आमचीं मनें जिंकून टाकलीं ! आम्हांला एकदम त्यांच्याबद्दल विलक्षण आपलेपणा वाटूं लागला. वर्गांत एकदम सामसूम शांतता पसरली. आमच्यांतलीं वडीलधारीं दंगेखोर पोरें जागच्याजागीं गारद झालीं !

"आज मी नवीनच आलों आहें," मास्तर हसत हसत पुढें म्हणाले. "उद्यांपासून आपण अभ्यासाला सुरुवात करूं. आज मी तुम्हांला हरिभाऊ आपट्यांच्या 'उषःकाल' कादंबरीची गोष्ट सांगतों." वर्गांत गोष्टी सांगणारे असे पहिलेच मास्तर होते ते ! एकदम वर्गाचें रुक्ष स्वरूप बदलून त्याला घरांतल्या

एकाद्या बैठकीचें जिव्हाळ्याचें स्वरूप आलें. तो तास कधीं संपला आणि दुसरा नि तिसरा तास कधीं सुरू झाला हें आम्हांला जसें कळलें नाहीं, तसें सुभेदार मास्तरांच्याही तें ध्यानात आलें नाहीं. इतके आम्ही सारे त्या गोष्टीच्या आनंदांत रंगून गेलों होतों. पुढच्या तासाचे मास्तर वर्गाच्या दारापाशीं येऊन गेले आणि शिक्षकांच्या खोलींत जाऊन तणावून झोपले. त्याना तरी आम्हांला शिकविण्याची कुठें हौस होती एवढी? आपला तास दुसऱ्या कोणीं मास्तरानें घेतला तर तें त्यांना नको होतें थोडेंच!

त्या दिवसापासून आमच्या वर्गाची चर्याच मुळीं बदलून गेली. सुभेदार मास्तर वर्गात कधीं येतात आणि कधीं आम्हांला गोष्टी सांगतात असें सर्वांना होऊन जात असे. मराठी आणि इतिहास हे दोन विषय शिकविण्याचें काम त्यांच्याकडे आलें होतें; आणि हे दोन्ही विषय आम्हांला ते गोष्टीरूपानें शिकवीत. पण अशा कांहीं हातोटीनें कीं मराठी केव्हां संपे आणि इतिहास केव्हां सुरू होई किंवा इतिहास केव्हां संपे आणि मराठीला केव्हां प्रारंभ होई हें आम्हाला मुळीं कळतच नसे. त्याखेरीज उरल्या सुरल्या वेळांत हरिभाऊ आपट्यांच्या कादंबऱ्या ते हप्त्याहप्त्यानें आम्हांला सांगत.

त्यामुळें सुभेदार मास्तरांचा आम्हांला नादच लागला म्हणानात. शाळेंत येतांना आम्ही त्यांच्याबरोबर यावयाचे. शाळेंतून जाताना आम्ही त्यांच्याबरोबर जावयाचे. दुपारीं आंघोळीला घाटावर त्यांच्याबरोबर. संध्याकाळीं खंडोबाच्या माळावर हिंडायलाही त्यांच्याबरोबर. आणि सुटीच्या दिवशीं तर सकाळपासून संध्याकाळपर्यंत मुक्कामच त्यांच्या घरीं. आमची आणि त्यांची ही वाढती गट्टी बघून जर कोणाच्या पोटांत खरोखरच दुखूं लागलें असेल तर तें आमच्या हेडमास्तरांच्या. त्यांचें नांव होतें झांबरे!

'झांबरे' हें आडनांव उच्चारल्याबरोबर ज्या रंगाची, ज्या रूपाची आणि ज्या चेहऱ्याची मूर्ति तुमच्या डोळ्यांसमोर उभी राहूं शकेल, अगदीं तसेच होते हे आमचे झांबरे सर! पूर्वी हे रेव्हेन्यू खात्यामध्यें इंदापूर येथें मामलेदार कचेरींत हेडकारकून होते असें म्हणतात. तेथें हिशेबाची कांहीं तरी भानगड केल्याचा त्यांच्यावर ठपका आल्यानें त्यांना नोकरींतून निघावें लागलें. तेव्हां असा 'कर्तबगार' पुरुष पुण्याच्या भावे स्कूलखेरीज दुसऱ्या कोणत्या संस्थेंत पचूं शकणार बरें?

या संस्थेनें या महापुरुषाची रवानगी सासवड गांवीं नवीन इंग्रजी शाळा

स्थापन करण्यासाठीं केली. आणि तेवढें काम त्यांनीं खरोखरच उत्तम रीतीनें पार पाडलें यात शका नाहीं. तेव्हापासून त्या शाळेच्या हेडमास्तरपदावर त्यांचीच नेमणूक करण्यांत आली. झाबरे सर कोणता विषय शिकविण्यात तरबेज होते हें काहीं सागता येत नाहीं. तथापि, गणित विषय हा त्यांचा हातखडा होता अशी त्या वेळीं बोलवा होती. विशेषतः ‘मेट्रिक सिस्टिम’मधले ‘मिलीसेंटि–डेसी–मीटर–डेक्या–हेक्टो–किलो–मिरिया’ हे कोष्टक ते मोठमोठयानें मुलांकडून परवचाप्रमाणें म्हणून घेत, हें माझ्या अद्यापही स्मरणांत राहिलेलें आहे. या कोष्टकापलीकडे त्यानीं कोणाला काहीं शिकविलें नाहीं.

शाळेमधील त्याचा बहुतेक वेळ मुलावर रागावण्यात आणि मुलाना बदडण्यांत जात असे. त्यामुळें झाबरे सर म्हटले कीं आमच्या अंगावर त्या वेळीं टरारून काटाच उभा राहात असे. शाळेबाहेरचा त्याचा वेळ गावातले एक श्रीमंत जहागिरदार होते, त्याच्या तैनातीमधे आणि पंगतीला जात असे. जवळजवळ श्रीमंतांच्या आश्रयालाच ते होते म्हणानात! त्यामुळें शाळेंतल्या पोरांप्रमाणें पोराचे पालकही त्याना चागलेच वचकून असत. सुभेदार मास्तर शाळेंत मुलाना जसजसे अधिकाधिक आवडूं लागले, तसतसे झाबरे सर त्याच्याकडे जातां-येता आपले लाल बटबटीत डोळे वटारून बघू लागले. पण सुभेदारानीं कधीं ढुंकूनही त्यांच्याकडे पाहिलें नाहीं. मुलाना रोज रोज नवीन गोष्टी काय काय सागावयाच्या ह्या नादांत ते गुग असत.

एके दिवशीं पहिल्याच तासाला सुभेदार मास्तर वर्गात आले. त्या दिवशीं त्यांचा चेहरा विशेष गभीर दिसत होता. ते टेबलाजवळ येऊन उभे राहिले. नेहमींप्रमाणें त्यांनीं आमच्याकडे पाहिलें नाहीं. त्याची दृष्टि खालीं जमिनीकडे वळलेली होती. क्षणभर ते कांहीं बोलले नाहींत. त्याचे ओठ थरथर कापत होते असें आम्हांला वाटलें.

थोड्या वेळानें ते हलक्या आवाजांत बोलूं लागले, “मुलांनो, एक अतिशय वाईट गोष्ट मला तुम्हांला सागावी लागत आहे. आपल्या देशाचे आवडते पुढारी लोकमान्य टिळक याना सरकारनें काल रोजीं सहा वर्षे काळेपाण्याची शिक्षा ठोठावली आहे—” बोलता बोलतां सुभेदार मास्तराचा कठ भरून आला आणि ते थांबले. आमच्या काळजांत आम्हाला काहीं तरी गलबलल्यासारखें वाटलें.

गळ्याभोवतालच्या उपरण्याच्या टोकानें मास्तरांनीं आपले डोळे पुसले आणि

ते म्हणाले, "आज तुम्हांला शिकवतां येणें मला अगदीं अशक्य आहे. विशेषतः तुम्हांला आतां जें कांहीं सांगावयाचें होतें, तें इथें वर्गात मला सांगतां येणें शक्यच नाहीं. तेव्हा संध्याकाळीं शाळा सुटल्यावर गांवाबाहेर आंबुरशीच्या देवळाजवळ आपण जमूं!" असें म्हणून जड पावलांनीं मास्तर वर्गामधून निघून गेले आणि खालीं शिक्षकाच्या खोलींत दिवसभर पडूनच राहिले.

झाबरे सर त्या दिवशीं शाळेंत आले नव्हते तें बरेंच झालें. जहागिरदारांच्या वाड्यात त्या दिवशीं 'प्रान्ता'ला मेजवानी होती. तेव्हां त्या मेजवानीच्या व्यवस्थेंत त्या वेळीं ते गढून गेले असल्यामुळें त्यांना शाळेला यावयाला कोठून सवड मिळणार? त्या दिवशीं अभ्यासाकडे आमचें लक्ष लागणें शक्यच नव्हतें मुळीं! विषण्ण मनानें आम्ही शाळा सुटेपर्यंत कसेबसे वर्गांत बसून राहिलों. पाच कधीं वाजताहेत आणि शाळा केव्हां सुटते आहे असें आम्हांला होऊन गेलें होतें.

शेवटची घंटा होतांच आम्ही वर्गातील पंधरावीस पोरें काखोटीला दप्तरें मारून शाळेंमधून जे तडक निघालों ते निरनिराळ्या वाटांनीं गांवाबाहेर पडलों. सर्वांनीं एकत्र मिळून जावयाचें नाहीं असें आमचें आधीं ठरलें होतें. आंबुरशीचें देऊळ गांवाच्या ईशान्येला दोन मैलांवर एका ओढयाच्या कांठीं होतें. नवरात्रांत तेथें दर वर्षी जत्रा भरत असे. पण एरव्हीं त्या बाजूला गांवांतलें चिटपांखरूं-सुद्धां फिरकत नसे. म्हणूनच मुद्दाम मास्तरांनीं ती जागा निवडून काढली होती.

कांहीं वेळानें आम्ही सारीं मुलें त्या देवळाशेजारच्या ओढयावर जमलों. सुभेदार मास्तर अजून आले नव्हते. त्यांच्या वाटेकडे डोळे लावून बराच वेळ आम्ही त्या ठिकाणीं बसलों. सूर्य मावळत होता. आजूबाजूच्या शेतावर पिवळसर उन्हें अजूनहि थोडींशीं रेंगाळतच होतीं. कांहीं वेळानें मास्तर तेथें येऊन पोहोंचले. त्यांच्याबरोबर वरच्या वर्गातील दोनतीन प्रौढ मुलें होतीं. मास्तर येतांच आम्ही सारे उठून उभे राहूं लागलों; पण 'उठूं नका' असें त्यांनीं आपल्या हातानीं आम्हांला सांगितलें.

मास्तराच्या भोवतीं वर्तुळ करून आम्ही बसलों. आणि ते मधोमध उठून उभे राहिले. मावळत्या सूर्याच्या आरक्त प्रकाशाकडे रोखलेल्या दृष्टीनें पाहात गंभीर आवाजांत त्यांनीं बोलावयाला सुरुवात केली. वर्गात शिकवितांना किंवा गोष्टी सांगतांना ते नेहमीं आम्हांला जसे दिसत त्यापेक्षां कांहीं तरी निराळेच ते आम्हांला त्या वेळीं दिसले. त्यांच्या मुद्रेवर कांहीं तरी नवीनच तेज चमकत

होतें. आणि त्यांच्या आवाजांत नवीनच कांहीं तरी सामर्थ्य प्रकट झालेलें होतें.

अर्धा-पाऊण तास ते बोलले असतील. पण तेवढ्या वेळांत लोकमान्य टिळकांच्या चरित्रामधल्या किती तरी स्फूर्तिदायक गोष्टी त्यांनीं आम्हांला सांगितल्या. त्यांचा एकेक शब्द आणि एकेक वाक्य घणाच्या घावांप्रमाणें आमच्या हृदयावर आदळत होतें. आणि सर्वांगांतलें रक्त पायापासून डोक्यापर्यंत उसळ्या मारीत होतें. बोलणें संपविण्याच्या आधीं सूर एकदम चढवून ते म्हणाले, "लोकमान्य टिळकांनीं तुमच्यासाठीं एवढें सारें केलें! तुम्ही त्याच्यासाठीं काय करणार? बोला! आजपासून परदेशी मालावर तुम्ही बहिष्कार घालणार कीं नाहीं? यापुढें परदेशी टोप्या डोक्यावर ठेवता कामा नये! परदेशी साखर तुम्ही खाता कामा नये! घ्या, शपथ घ्या—शपथ घ्या—"

आंबुरशीच्या ओढ्याच्या त्या ओसाडींत सुभेदार मास्तरांच्या त्या शब्दांचे गंभीर पडसाद मोठमोठ्यानें निनादले. 'शपथ घ्या! शपथ घ्या!' अशीच चोहोंकडून गर्जना उठली. देऊळ तेंच म्हणालें, झाडें तेंच म्हणाली, शेतानीं तेंच सांगितलें आणि ओढा तेंच गरजला. आणि आभाळांत क्षितिजावर नुकताच उगवलेला एक ठळक तारा त्याच अपेक्षेनें टवकारून आमच्याकडे पाहू लागला. आमचीं डोकीं भडकून गेली. डोक्यावरच्या टोप्या भराभर काढून आम्हीं ओढ्यांत भिरकावून दिल्या आणि मास्तरांच्या पायावर हात मारून परदेशी मालावर बहिष्कार घालावयाच्या एकजात साऱ्यानीं शपथा घेतल्या.

हरिभाऊ आपट्यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांतील पात्रांचें सामर्थ्य आणि आवेश त्या वेळीं आमच्या अंगांत संचारलेला होता. आयुष्यांतील एका अद्‌भुत अनुभवातून आम्ही जात होतों. लोकमान्य टिळकांच्या नावाची एका आवाजानें गर्जना करून आम्ही गांवाकडे चालूं लागलों. त्या आमच्या गर्जनेचे पडसाद किती वेळ तरी मागे घुमत राहिले होते. या वेळेपर्यंत अंधार चांगलाच पडला होता. आभाळांत किती तरी चांदण्या लुकलुक करूं लागल्या होत्या.

परत येतांना वाटेमध्यें आम्ही एकमेकांशीं फारसें बोललों नाहीं. जो तो आपल्या मनामध्यें हाच विचार करीत होता कीं, लोकमान्य टिळकांनीं देशासाठीं आज एवढा त्याग केला;—मी माझ्या देशासाठीं काय करणार?' एक नवीनच प्रकाश आमच्या आयुष्यामध्यें निर्माण झालेला होता. या विचारांच्या तंद्रींत दिवें नाकें ओलांडून गावठाणांत आम्ही कधीं शिरलों आणि घरापाशीं येऊन कसे पोंचलों तें आम्हांला कळलेंच नाहीं!

अंगणांत मी पाऊल टाकतों न टाकतों तोंच "कुठें गेला होतास इतका वेळ ?" अशी वडिलांची गर्जना जेव्हा माझ्या कानावर पडली तेव्हां कुठें मी शुद्धीवर आलों. समोर बघतों आहें तोंच आमच्या वर्गातल्या दोन-तीन मुलांचे वडील चितातुर आणि गंभीर चेहरे करून आमच्या वडिलांशेजारींच ओसरीवर उभे असलेले मला दिसले. एका क्षणांत लख्खकन् सारा प्रकाश माझ्या डोक्यांत पडला. मी कांहीं बोलायच्या आधींच वडील माझ्या अंगावर धावले आणि अशी कांहीं झणझणीत कानशिलात लगावली त्यांनीं माझ्या !

पण मी काहीं बोललों नाहीं. प्राण गेला तरी कांहीं बोलायचें नाहीं अशी आम्हीं साऱ्यानीं मुळीं त्या दिवशीं शपथच घेतली होती. माझ्या डोक्यावर टोपी नाहीं हें बघून तर वडील आणखीनच भडकले. त्यांनीं आणखीन् दोन धपाटे माझ्या पाठींत घातले. मी कळवळून मटकन् खालींच बसलों, पण तोंडांतून हूं का चूं काढलें नाहीं. लोकमान्य टिळक देशासाठीं सहा वर्षांचें काळें पाणी सहन करणार, तेथें आपणाला पांचदहा धपाटे देशासाठीं सहन करावे लागले तर त्याचें काय मोठेंसें होणार आहे, असा मनांत त्या वेळीं विचार आला.

हें असें चाललें आहे तोंच झांबरे सर आमच्यापैकीं एका मुलाला फरपटून ओढीत ओढीत आमच्या घरांत शिरले. तो मुलगा मोठमोठ्यानें किंचाळत होता आणि झांबरे सर त्याच्या कानशिलात फडाफड लगावून ओरडत होते, "थांब लेका, तुलाच सहा वर्षांच्या काळ्या पाण्यावर पाठवतों, नाहीं तर इथेंच मामलेदार कचेरीसमोर फांशी देतों—" वडिलांनीं मला सोडून दिलें आणि ते नि इतर पालक झांबरे सरच्या भोवतीं जमले. झांबरे सरच्या अंगांत त्या वेळीं दहा फौजदाराचें बळ जमा झालें होतें.

आपल्या भसाड्या आवाजांत ते ओरडून म्हणाले, "फार भयंकर आहेत हीं दुसऱ्या इयत्तेतलीं पोर ! आणि त्या सुभेदार मास्तरांची यांना फूस ! या— या पोरांनीं त्या टिळकांच्याप्रमाणें सरकारच्या विरुद्ध बंड करून काळेपाण्यावर जायचें ठरवलें आहे आज ! बघतां काय आणि पाहतां काय ?" माझे वडील अतिशय भयंकर नजरेनें माझ्याकडे पाहू लागले. "सरकारविरुद्ध तूं बंड करणार काय रे लेका ?" असें म्हणून दांतओठ खाऊन त्यानीं असा काय रपाटा माझ्या बरगडींत लगावलाय म्हणतां ! मी एकाद्या कुत्र्याच्या पिल्लाप्रमाणें केकाटत केकाटत स्वयंपाकघराकडे पळत सुटलों.

त्या दिवशीं सबंध रात्रभर माझ्या डोळ्याला डोळा लागला नाहीं. अंथरुणा-

वर मी एकसारखा तळमळत पडलों होतों. सुभेदार मास्तर, वर्गांतलीं निरनिराळीं पोरें, लोकमान्य टिळक, हरिभाऊ आपट्याच्या कादंबऱ्यातील पात्रें, झांबरे सर, एडवर्ड बादशहा याची अशी कांहीं गल्लत डोक्यात होऊन गेली होती कीं विचारूं नका!

पहाटे पहाटे तर या स्वप्नांना अतिशय भयंकर स्वरूप प्राप्त झालें. मामलेदार कचेरीसमोरच्या उघड्या मैदानात एक मोटी लाकडी चौकट उभारलेली असून तीवर आमच्या वर्गांतल्या साऱ्या मुलांना एकामागून एक फाशी देण्याचें काम चाललें आहे. शेजारीं झाबरे सर अंगात फौजदाराचा डगला आणि पगडी घालून अन् हातात क्याटलाग घेऊन 'अमक्याला फाशी द्या!' 'तमक्याला फाशी द्या!' असे हुकुम ओरडून फर्मावीत आहेत. माझी जेव्हा पाळी आली तेव्हां एकदम मोठ्यानें मी किंकाळलों आणि झोपेतून जागा झालो.

अगदीं सकाळीं मी उठतो आहें न उठतो आहें तोच आमच्या वर्गांतला एक मुलगा घाबऱ्या घाबऱ्या धावत माझ्याकडे आला. सुभेदार मास्तराच्या घरासमोर राहणारा मुलगा होता तो. त्यानें रडक्या आवाजात माझ्या कानात सांगितलें कीं, काल रात्रीं झाबरे सरनीं सुभेदार मास्तरांना शाळेंतून काढून टाकलें असून गावच्या जहागिरदारांनीं त्याना गाव सोडून ताबडतोब बाहेर निघून जाण्याचा हुकूम दिलेला आहे.

काळजांत कुऱ्हाडीचा घाव बसावा तसें त्या वेळीं मला वाटलें. लोकमान्य टिळकाच्या काळेपाण्याइतकीच सुभेदार मास्तरांची ती हद्दपारी मला भयंकर वाटली. पायापासून डोक्यापर्यंत मी दुःखानें आणि रागानें थरथर कापूं लागलों. जास्त विचार करावयाला वेळच नव्हता. आम्ही दोघे तसेंच घाईघाईनें सुभेदार मास्तरांच्या घराकडे पळत सुटलों. वाटेंत दोनतीनदा मी ठेचाळलों देखील असेन.

आमच्या वर्गांतलीं पांच-सहा मुलें मास्तरांच्या दारासमोर माना खालीं घालून उभीं होतीं. 'मास्तर कुठें आहेत?' असें धापा टाकीत आम्हीं त्याना विचारलें. तेव्हां अर्ध्या तासापूर्वींच बैलगाडींत बसून मास्तर गांव सोडून निघून गेले असल्याचें त्यांनीं आम्हांला स्फुंदत स्फुंदत सांगितलें.

सारें जग आमच्या भोवतीं फिरतें आहे कीं काय असें त्या वेळीं आम्हाला वाटलें. मास्तरांच्या शून्य घराकडे पाहात किती तरी वेळ आम्ही तसेंच रडत रस्त्यावर उभे होतों. त्या दिवशीं आमच्या वर्गापैकीं कुणीच शाळेंत गेलें नाहीं.

सुभेदार मास्तरांच्या निरनिराळ्या आठवणी फिरून फिरून एकमेकांना सांगत आम्ही तो सारा दिवस संगमेश्वराच्या देवळांत एकत्र बसून घालविला.

दुसरे दिवशीं शाळेच्या दाराशीं झांबरे सर एक लांबलचक छडी हातांत घेऊन मोठ्या विजयानंदानें उभे होते. आमचीच वाट पाहात होते ते. आम्ही कांहीं न बोलतां एकामागून एक हात त्यांच्यापुढें केले. आणि छडीचे फटकारे शांतपणें सहन करून संथ पावलानीं आपल्या वर्गामध्यें जाऊन बसलो.

* * *

## ७ तिचा की

प्रा. चक्रपाणी यांची माझी कांहीं विशेष ओळख नव्हती. रस्त्यामध्यें ते भेटले म्हणजे आम्ही हसून एकमेकाना नमस्कार करीत असूं. क्वचित् एखादे वेळीं दोन-तीन औपचारिक वाक्येंहि पण बोलत असूं. त्यांच्या विद्वत्तेचा गांवामध्यें पुष्कळच गवगवा होता. परदेशांत चारपाच वर्षे राहून कसल्याशा गहन विषयावर संशोधन करून ते परत आलेले होते. तथापि त्याच्या विद्वत्तेशीं माझा संबंध कधींही आलेला नव्हता; आणि तिजबद्दल संशय घेण्याचें कारणही कधीं उद्‌भवलें नव्हतें. सुशिक्षित माणसाना सामान्यपणें त्यांच्याबद्दल जो आदर वाटत होता तोच मलाही वाटत होता.

एकदां त्यांच्या कॉलेजांत विद्यार्थ्यांचें संमेलन होतें. त्या संमेलनांत विद्यार्थ्यांनीं माझें नाटक बसविलें होतें. प्रा. चक्रपाणी हे संमेलन-समितीचे अध्यक्ष होते. नाटकाचा प्रयोग बघण्यासाठीं मला रीतीप्रमाणें आमंत्रण होतेंच. पण कांहीं कारणामुळें मला त्या प्रयोगाला हजर राहतां आलें नाहीं. त्याबद्दल प्रा. चक्रपाणी यांना फार वाईट वाटलेंसें दिसलें.

वाटेंत त्यांची आणि माझी जेव्हां गांठ पडली तेव्हां ते म्हणाले, "तुमच्या नाटकाच्या प्रयोगात ज्या ज्या विद्यार्थ्यांनीं कामें केलीं ते विद्यार्थी उद्या संध्याकाळीं पाच वाजतां माझ्याकडे चहाला येणार आहेत. त्या वेळीं तुम्हीं आलें पाहिजे. विद्यार्थ्यांना तुमची ओळख करून घेण्याची फार इच्छा आहे. नाटकाचा प्रयोग तुम्हीं चुकविला, तसें उद्याचें आमंत्रण मात्र चुकवूं नका."

बोलाविल्याप्रमाणें प्रा. चक्रपाणी याच्याकडे दुसऱ्या दिवशीं मी गेलों. चक्रपाणींची जागा भाड्याचीच होती, पण चागली होती. एका नवीन बांधलेल्या बंगल्याच्या तळमजल्यावरच्या तीनचार खोल्या त्यांच्याकडे होत्या. समोर ऐसपैस आवार होतें आणि आजूबाजूला थोडींशीं फुलझाडेंही लावलेलीं होतीं. प्रा. चक्रपाणी आणि विद्यार्थी माझी वाटच पाहात होते. आमचा चहा पिण्याचा

कार्यक्रम अर्धा-पाऊण तास चालला. विद्यार्थी मोकळेपणानें हसत होते आणि गप्पा मारीत होते.

पण प्रा. चक्रपाणी गंभीरपणें आरामखुर्चीवर पडून पाइप ओढतां ओढतां कसला तरी विचार करीत होते. मधूनमधून विद्यार्थ्यांकडे पाहून ते विमनस्कपणें हसत होते. जणुं कांहीं त्यांच्या ज्या गप्पा चालल्या आहेत त्यांच्याकडे आपलें लक्ष आहे, असेंच ते सुचवीत होते. माझें लक्ष चहा पिण्याकडेही नव्हतें आणि विद्यार्थ्यांकडेही नव्हतें. प्रा. चक्रपाणींशींही बोलण्यासारखें मजजवळ कांहीं नव्हतें. माझें लक्ष दुसऱ्याच एका गोष्टीकडे लागून राहिलें होतें.

बंगल्याच्या आवारात प्रा. चक्रपाणींचा दोन वर्षांचा मुलगा एका नव्या तिचाकी पायगाडीवर बसून आमच्याभोवतीं एकसारखा फेऱ्या घालीत होता. फार सुंदर आणि गोंडस मुलगा होता तो. आणि ती तिचाकी त्याच दिवशीं त्याला मिळालेली दिसत होती. त्यामुळें त्याच्या आनंदाला पारावार नव्हता. जोरजोरानें पाय हलवून बागेमधून आपली छोटी गाडी चालवितांना आणि तिची मधूनमधून घंटी वाजविताना तो मोठमोठ्यानें हसत होता आणि किंचाळत होता. पण त्याच्याकडे कुणाचेंच लक्ष नव्हतें. विद्यार्थी खाण्यांत आणि गप्पा मारण्यांत गुंग झाले होते. आणि प्रा. चक्रपाणी स्वतःशींच तन्द्री लावून बसले होते. मी एकटाच काय तो त्या मुलाकडे टक लावून बघत होतों आणि हसून त्याच्या आनंदाचें मनसोक्त कौतुक करीत होतों.

चहाचा कार्यक्रम संपल्यावर विद्यार्थी निघून गेले. आणि प्रा. चक्रपाणींनीं आपलें ग्रंथालय दाखविण्यासाठीं मला आत नेलें. चक्रपाणींचें ग्रथालय खरोखर त्यांच्या विद्वत्तेला शोभण्यासारखें होतें. निरनिराळ्या कठीण विषयांवरचे चार-पांचशें जाडजाड ग्रंथ कपाटामध्यें दाटीवाटीनें लावून ठेवलेले मला दिसले. ते बघून चक्रपाणींच्या विद्वत्तेबद्दलचा माझा पूर्वीचा आदर अधिकच वाढला. त्यांचा निरोप घेऊन मी बाहेर पडलो.

बाहेरच्या आवारात त्यांचा मुलगा अजूनही आपली तिचाकी चालवून राहिला होता. चक्रपाणी मला पोहोंचविण्यासाठीं आले. त्यांना पाहून तिचाकीवरून बसल्या-बसल्या मुलगा ओरडला, "बाबा, माझी गाडी पाहा कशी आहे ती!" मीं त्याच्याकडे हसून पाहिलें. प्रा. चक्रपाणींनीं आपल्या ओठांतला पाइप किंचित् बाहेर काढल्यासारखें करून मी चहाला आल्याबद्दल माझे आभार मानले. मी त्या मुलाकडे पाहात पाहात बाहेर पडलों. खरेंच मला तो मुलगा भारी आवडला.

एक महिन्यानंतर प्रा. चक्रपाणी एका केमिस्टाच्या दुकानांतून घाईघाईनें बाहेर पडताना मला दिसले. मीं भीत भीत विचारलें, "कां, कुणी आजारी आहे वाटतं?" आपला लहान मुलगा विषमज्वरानें गेले दहा दिवस आजारी आहे असें सागून ते तडक निघून गेले. माझ्या काळजात धस्स झालें. त्या दिवशीं संध्याकाळीं त्यांच्या बंगल्याच्या आवारांत तिचाकीवर बसून आनंदानें किंचाळणाऱ्या त्याच्या लहानग्या मुलाचा गोड चेहरा एकदम माझ्या डोळ्यां-समोर उभा राहिला. उभ्या आयुष्यांत त्याच दिवशीं एकदां मीं त्याला पाहिलें होतें. पण तेवढ्या वेळांतच त्यानें माझ्या मनाला ओढ लावून ठेवली होती.

त्यानंतर आणखी सातआठ दिवस गेले. एके दिवशीं संध्याकाळीं मी नव्या पुलावर हिंडायला गेलों असतांना त्या दिवशीं चहाच्या वेळीं चक्रपाणींच्या घरीं भेटलेल्या त्याच्या एका विद्यार्थ्यानें 'चक्रपाणींचा लहानगा मुलगा आजच दुपारीं गेल्या'ची दुःखद बातमी मला सागितली. क्षणभर माझें मस्तक सुन्न झालें. ती बातमी ऐकण्याची माझ्या मनाची तयारी नव्हती. त्यानंतर पुष्कळ वेळ माझें मन बेचैन होतें. समोर नदीच्या काठावर एक चिता जळत होती. ती त्याची तर नसेल ना?—असा सहज एक विचार मनाला चाटून गेला. पण लहान मुलें पुरतात, जाळीत नाहींत, हें त्याच क्षणीं माझ्या ध्यानीं आलें आणि मी भेसूर-पणें स्वतःशींच हसलों.

दुसरे दिवशीं सकाळीं मी बाजारपेठेंतून चाललों होतों. कोपऱ्यावर एक जुन्या सामानाचें दुकान होतें. त्या दुकानासमोर उभे असलेले प्रा. चक्रपाणी माझ्या दृष्टीस पडले. त्यांची पाठ माझ्याकडे होती. त्यांच्या हातांत एक तिचाकी गाडी होती. आणि ते दुकानदाराशीं हातवारे करून मोठमोठ्यानें बोलत होते.

त्यांचे शब्द माझ्या कानांवर पडले, "एक महिन्यापूर्वी घेतलेली आहे ही. चाळीस रुपयांत एक पै कमी घेणार नाहीं!"

काळजांत कोणीं कट्यार खुपसावी तसें मला वाटलें. एकदम माझ्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले. तोंड वळवून त्याच पावलीं मी दुसऱ्या दिशेनें निघून गेलों.

त्या दिवसापासून प्रा. चक्रपाणी कुठें वाटेंत भेटले तर मी त्यांना चुकवतों किंवा ते अगदीं समोरूनच आले तर मी त्यांना नमस्कार न करतां गंभीर चेहरा करून तसाच पुढें चालूं लागतों.

* * *

# ८ बाजारांत तुरी !

• १ •

गंगी आणि गोदी या बहिणी बहिणी—म्हणजे सख्ख्या बहिणी नव्हेत; आतेमामेबहिणी. गंगी ही गोदीची मामेबहीण अन् गोदी ही गंगीची आतेबहीण. पण बहिणींपेक्षा त्याचें एकमेकींवर जास्त प्रेम होतें. गंगीचा बाप आणि गोदीची आई हीं थोड्या अंतरानें त्यांच्या (म्हणजे गंगीच्या अन् गोदीच्या) लहानपणीं वारली. त्यामुळें त्याच्या आजोबाला फार दुःख झालें. त्यांनीं गंगीच्या सोबतीला गोदीला बोलावून घेतलें. मग पुन्हा गोदी आपल्या वडिलाच्या घरीं कधीं गेलीच नाहीं.

त्यामुळें दोघींचें बालपण एकाच घरांत गेलें अन् मराठी सहाव्या इयत्तेपर्यंतचें शिक्षण दोघींचें एकाच शाळेंत झालें. दोघींनींही हातावर आणि कपाळावर सारखेच गोंदून घेतलें होतें. दिसायलाही त्या जवळजवळ सारख्याच दिसायच्या. त्यात त्याची आजी त्याना एकाच खणाचीं पोलकीं अन् एकाच चिटाचे परकर शिवी. त्यामुळें पुष्कळाना तर त्या आवळ्याजावळ्या बहिणीच आहेत असें वाटे.

आणि योगायोग असा कीं लग्न झाल्यावरही पुन्हा त्या एकाच ठिकाणीं राहायला आल्या. दोघींचे नवरे मुंबईलाच नोकरीला होते. गंगीचे यजमान चितोपत टाकसाळे हे चिचपोकळी म्युनिसिपालिटीच्या दवाखान्यांत कंपाउंडर होते आणि गोदीचे यजमान शंभूराव अष्टपुत्रे हे वाडीबंदरला पार्सल क्लार्क होते. दोघींचीं बिऱ्हाडें शेजारीं शेजारींच होतीं. तीनचार मिनिटांच्या अंतरावर.

परळला अहमद सेलरच्या एक नंबरच्या चाळींत गंगी राहात होती. तर गोदी सात नंबरच्या चाळींत राहात होती. नवरे कामाला गेल्यावर गंगीचा मसाला कुटून द्यायला गोदी तरी तिच्या खोलीवर यायची, नाहीं तर गोदीचें लोणचें

घालून द्यायला गंगी तिच्या खोलींत यायची. दिवसांतून किती तरी वेळ दोघींचा एके ठिकाणीं जायचा. गंगीला एक मुलगा नि एक मुलगी होती, तर गोदीला दोन्ही मुलीच होत्या.

चिंतोपंत टाकसाळे आणि शंभूराव अष्टपुत्रे यांची सबंध दिवसभर कधीं गाठ पडत नसे. चिंतोपंत जायचे चिचपोकळीला अन् शंभूराव जायचे वाडी-बंदरला; पण रात्रीच्या वेळीं अन् सुटीच्या दिवशीं मात्र ते याचा वचपा भरून काढीत. दोघांचे व्यवसाय जरी निरनिराळे होते तरी केवळ साडूपणाच्या नात्याखेरीज उभयताच्या आवडींमध्यें पुष्कळच साम्य होतें. दोघांनाही गाण्याचा अन् नाटकांचा विलक्षण नाद होता. चिंतोपंत पेटी उत्तम वाजवीत, तर शंभूराव तबला चागला वाजवीत. परळच्या 'दामोदर हॉल'मध्यें निरनिराळ्या क्लबांचीं जीं नाटकें होत त्याच्यामध्यें पेटी अन् तबला वाजवायला चिंतोपंत अन् शंभूराव याची जोडी हमखास आढळून येई.

त्याखेरीज गिरणगावांत कामगाराच्या चाळींचाळींमधून ज्या 'सत्यनारायणाच्या महापूजा' होत, त्या वाजविण्याचीं बोलावणींही हटकून याच दुकलीला येत. आपल्या अंगांतल्या गुणावर जर 'दुसऱ्या लोकांच्या क्लबाचीं नाटकें यशस्वी होतात तर आपणच एकादा नाटकाचा क्लब काढलेला काय वाईट?' या विचारानें गेल्याच दसऱ्याला दोघानीं मिळून 'श्री म्हाळसाकात नाट्यसमाजा'ची स्थापना केली होती. आणि 'एक घाव दोन तुकडे' हें चं. कृ. वाघमारेकृत दणदणीत ऐतिहासिक नाटक बसवायला सुरुवात केली होती.

• २ •

एका सुट्टीच्या दिवशीं सकाळीं चिंतोपंत टांकसाळ्यांच्या नांवानें एक पोस्ट-कार्ड आलें. तें मूळ ठिकाणाहून निघून चांगला दीड महिना झाला असावा असें त्याच्या धुरकट रंगावरून, चुरमुडलेल्या कडांवरून आणि त्याच्या पाठीवर बसलेल्या पोस्टाच्या शिक्क्यांच्या काळ्याकुट्ट माऱ्यावरून दिसत होतें. पत्रातलें अक्षर अत्यंत कांपरें आणि किरटें होतें. मजकुरांत मधून मधून खाडाखोड केली होती. आणि कित्येक ठिकाणीं मोठमोठे काळे डाग पडले होते.

एकेक शब्द चारचार वेळा वाचला तेव्हां तो चिंतोपंतांना कसाबसा लागला. पण तें कोणाचें असावें याचा उलगडा मात्र त्यांना शेवटपर्यंत झाला नाहीं. आपल्या बायकोचा हा कोणी तरी लांबचा नातेवाईक असावा एवढा बोध मात्र

त्यांना झाला. पण लग्न होऊन इतकीं वर्षें झालीं तरी तिच्या तोंडून त्याचें नांव आपण ऐकलें कसें नाहीं याचा त्याना मोठा अचंबा वाटला.

"काय ग, लखूनाना ठिपसे कोण?" शेवटीं चिंतोपंतांनीं आपल्या बायकोला विचारायचें ठरविलें. "ठिपसे का ठिपरे—काय आडनांव आहे कुणास ठाऊक!"

लखूनाना ठिपसे हें नांव ऐकून गगीलाही चिंतोपंताइतकाच बोध झाला. ती शून्य चेहरा करून मान जोरानें हलवीत म्हणाली, "आमचा कोणी नाहीं!"

"तुमचा कोणी नाहीं?" चितोपन्त किंचित् चिडल्यासारख्या आवाजानें उद्गारले. "तुमचा कोणी नाहीं तर मग तुम्हाला त्यानें या पत्रात आशीर्वाद कशाला पाठविला आहे? हे काय—हेच पत्रीं चि. सौ. गगूबाई आणि चि. सौ. गोदूबाई याना आशीर्वाद."

"कुठून पत्र आल आहे?" कांहीं तरी आठवल्यासारखे करून गंगीनें विचारलें.

"झाशीहून!" चितोपत पत्राच्या उजव्या कोपऱ्यांत लिहिलेलें गावाचें नांव वाचीत म्हणाले.

"झांशीहून?" कपाळाला आठ्या चढवून गंगी आठवण करूं लागली. "हं, हं. झाशीहून म्हणजे ते बहुतेक आमचे लखूमामा ठोमरे असतील! हो हो, लखूमामा ठोमरेच ते—"

"कोणास ठाऊक ठिपसे का ठोमरे अन् नाना कीं मामा!" चिंतोपंत त्रासिकपणें म्हणाले. "मी वाटेल त्या डॉक्टरचं प्रिस्क्रिप्शन वाचूं शकतों, पण या माणसाच्या अक्षरानं मात्र माझी अब्रूच घेतली. कोण हा लेकाचा लखूमामा ठोमरे?"

"आमच्या आजीचा चुलत का मामेभाऊ!" उंच नारळाच्या झाडावर बसलेला एकादा कावळा पहावा तसे किलकिले डोळे करीत गंगी म्हणाली. 'ते झाशीला पोस्टात का रेल्वेंत होते असं वाटतं. अजून जिवंत आहेत ते?"

"जिवंत नाहींत तर मग काय त्यांच्या भुतानं पत्र पाठवलंय हें?" चितोपंत गगीच्या तोंडासमोर हातांतलें पत्र नाचवीत म्हणाले. "बाकी हें अक्षर मात्र कांहीं माणसाचं दिसत नाहीं!"

"मग आतां त्यांचं वय चांगलं सत्तर वर्षांच्या वर असेल कीं!" गंगी त्याचा चेहरा आठवण्याचा प्रयत्न करीत म्हणाली. "लहानपणीं आम्ही शाळेंत

होतों तेव्हां एकदां का दोनदां ते आजीला भेटायला आमच्या गांवीं आले होते. त्याच वेळीं त्यांनीं पेन्शन घेतलं होतं. त्याला आतां किती वर्षे झालीं! अन् त्याना तुमचं नाव न् इथला पत्ता कसा कळला?"

"तोच तर मी अचंबा करून राहिलों आहें!" पोस्टाच्या शिक्क्यातून सुटलेलीं आपल्या नावाचीं अन् पत्त्याचीं अक्षरें लावीत चितोपत म्हणाले.

"सगळंच मुसळ केरात!" गंगी स्वतःशींच खुदकन् हसून म्हणाली. "अहो, त्यानीं पत्र काय लिहिल आहे तें तर वाचून दाखवाल?"

चितोपंत वाचूं लागले: "अनेक आशीर्वाद. बहोत दिवसांनीं आम्ही तुम्हास हें खत लिहितो आहोत. आता आमची उमर झाली. तब्बियतीचा काहीं भरोसा उरला नाहीं. शिकपणात आम्हाला दवापाणी देणारें कोणी जवळ नाहीं. कुटुबांतलें कोणीच माणूस उरलें नाहीं. प्रभूची मर्जी. पुढील महिना अखेर इकडील ओळखीचीं माणसें तिकडे मुंबईला येणार आहेत. त्याच्याबरोबर तिकडेच येणेचें ठरविलें आहे—"

"म्हणजे? इथे मुबईला येणार आहेत लखूमामा?" गंगी आश्चर्यानें उद्गारली. "आणि इथें कोणाकडे उतरणार ते?"

"कुठे म्हणजे? इथे त्यांचा नातपुतण्या का भाचेजांवई राहातो आहे ना अह्मद सेलर बिल्डिग नंबर एकमध्यें!—चितामण टाकसाळे या नांवाचा! त्याच्याकडे येऊन तळ देणार असतील ते." चितोपत उखडून म्हणाले.

"छे, छे, आपल्याकडे कशाला येतील तें?" गंगी केविलवाण्या आवाजात म्हणाली.

"त्याशिवाय का त्यानीं माझा पत्ता शोधून काढून हें पत्र मला धाडलं?" चिंतोपंत उत्तरले. "पत्राची तारीख कोणती? अरे बाप रे! हें पत्र लिहून त्यांना दीड महिना झाला. आज पत्र मिळतें आहे मला हें. या महिनाअखेर तो इथें येणार, म्हणजे आज किंवा उद्यांच हा म्हातारा दत्त म्हणून आपल्या समोर उभा राहाणार असें दिसतें आहे."

"येऊं द्या हो ते आले तर," गंगी प्रेमळ स्वरांत म्हणाली. "किती झालं तरी ते तुमचे चुलत का मामे-आजे-सासरे लागतात. ,आले इथं ते आणि राहिले चार दिवस तर बिघडलं कुठें? जातील चार दिवसांनीं."

"जातील! कुठें जातील? आहे कोण त्यांना? हें काय या पत्रांत त्यांनीं स्पष्टच लिहिलं आहे—" चिंतोपंत पत्रांतील ओळीवर बोट फिरवीत ओरडून

म्हणाले, " 'शिकपणांत आम्हांला दवापाणी देणारें कोणी जवळ नाहीं. कुटुंबांतलें कोणीच माणूस उरलें नाहीं. प्रभूची मर्जी—' हें बघ ए, मी तुला किनई स्पष्ट सांगतो कीं तो म्हातारा उद्या इथें आला तर मी त्याला तोंडावर सांगेन—तो मलाही ओळखत नाहीं अन् तुलाही ओळखत नाहीं—कीं चितोपंत टाकसाळे या ठिकाणीं कोणी नाहीं. मागे राहात होते. पण आतां जागा सोडून ते कुठें गेले तें आम्हाला माहीत नाहीं."

"तुम्ही नाहीं म्हणालात तर ते गोदीकडे जातील," गंगी म्हणाली. "तुमचा जसा त्यानीं पत्ता मिळविला तसा शंभूरावांचाही पत्ता त्यानीं मिळविला असेलच कीं."

"जाऊ दे. खुशाल जाऊन राहू दे त्यांना गोदीकडे अन् शंभूरावांकडे," चितोपंत आपला उजवा हात हवेंत उडवीत म्हणाले. "आपल्या घरांत ही कटकट नको."

"पण ते गोदीकडे राहायला गेले कीं त्याना आपला पत्ता कळणारच. शंभूराव काही तुमच्याइतके पक्के नाहींत. ते सरळ त्याना आपल्या घरीं घेऊन येतील." गंगी हसत हसत म्हणाली. चितोपंत जिरल्यासारखे तोंड चुरमुडून डाव्या हातानें आपल्या शेंडीचा गुतवळा उकलूं लागले.

"एवढ काहीं त्याचं तुम्हांला संकट वाटायला नको," गंगी नाक उडवीत म्हणाली. "तसे काहीं ते अगदींच वाटेवर पडणार नाहींत. तुम्हीं नाहीं म्हटलें तर जातील ते एखाद्या खानावळींत नाहीं तर हॉटेलांत."

"अन् पैसे कोण भरणार त्याचे?—तूं कीं गोदी?" गंगीच्या तोंडासमोर हात ओवाळीत चिंतोपंत वेडावून म्हणाले.

"आम्हीं कशाला भरायला पाहिजेत त्यांचे पैसे?" गंगी फणकाऱ्यानें म्हणाली. "त्यांना काय भीक लागली आहे का? त्यानीं पेन्शन घेतली तेव्हां तर त्यांच्याकडे चांगली पांच-पन्नास हजारांची माया होती. आजीनेंच त्या वेळीं आम्हांला सागितलें."

एखादें भूत दिसावें तसे चिंतोपन्त दचकले नि रोखल्या डोळ्यांनीं ते आपल्या बायकोच्या चेहऱ्याकडे पाहात राहिले. आपल्या कानांवर त्यांचा विश्वास बसेना.

"कि-किती म्ह-म्हणालीस?" शेवटीं त्यांच्या तोंडून शब्द बाहेर फुटले, "प-पन्नास हजार रु-रुपये?"

"हो, हो, पन्नास हजार रुपये!" गंगी ऐटीनें म्हणाली. किती केलें तरी लांबचे का होईना, पण लखूमामा तिचे नातेवाईक होते. तेव्हा त्यांच्या पैशाचा तिला अभिमान वाटावा हें साहजिकच होतें.

"या–या ल–लखुमामा ठ-ठोमऱ्याजवळ पन्नास हजार रुपये ?" डोळे आणि तोंड मोठमोठ्यानें ताणून चिंतोपतांनीं पुन्हा विचारलें.

"हो, हो, पन्नास हजार रुपये होते या आमच्या लखुमामा ठोमऱ्यांजवळ त्या वेळीं!" गंगी प्रत्येक शब्दावर जोर देत म्हणाली. "तुमच्या लोकासारखी आमचीं माणसं कांहीं भिकारी नव्हतीं!"

पाच मिनिटें चिंतोपंत काहीं न बोलतां मिशांचे केस खालच्या दांतांनीं चावीत चावीत स्वतःशींच विचार करीत उभे राहिले. त्याच्या डोक्यांत कसला एवढा विचार चालला होता कोणास ठाऊक ?

"किती वर्षे झालीं या गोष्टीला?" मध्येंच एकदम जागे होऊन चितो-पतांनीं विचारलें.

"झालीं असतील पंधरा वर्षे." गंगी आठवण करीत म्हणाली.

"मग अजून असतील लखूमामाजवळ ते पन्नास हजार रुपये?" एकाद्या लहान मुलानें मास्तराला प्रश्न विचारावा तशा अजागळ अडाणीपणानें चितो-पंतानीं गंगीला फिरून विचारलें.

"तें आतां मला तरी काय बाई माहीत?" गंगी अडखळत अडखळत म्हणाली. "किती वर्षे झाली त्याला! जरी कांहीं नाहीं म्हटलं तरी पाचपंचवीस हजार रुपये तरी म्हाताऱ्याजवळ असतीलच अगदीं नक्की!"

"तरी पुष्कळ झाले कीं!" प्रफुल्लित चेहरा करून चिंतोपंत उद्गारले. आणि एकदम काहीं तरी त्यांच्या मनात विचार आला अन् ते स्वतःशींच हसू लागले.

इतके कीं त्याचें हसू त्यांना आवरेना. चितोपंतांना हास्याच्या इतक्या का उकळ्या फुटताहेत हें गंगीच्या लक्षात येईना! ती बुचकळ्यात पडली.

"एवढं काय झालं मेलं हसायला!" गंगी चिडून म्हणाली.

चिंतोपंत गगीच्या कानात हळूच म्हणाले, "तुझ्या लक्षात नाहीं आलं? म्हणजे, ह्या म्हाताऱ्याच्या नंतर त्याचे ते पांचपंचवीस हजार रुपये तुला म्हणजे आपल्यालाच मिळतील!"

गंगीचा चेहरा एकदम उमलला. पण आपला आनंद आंतल्या आंत दाबीत ती म्हणाली, "कशावरून?"

"कशावरून म्हणजे?" चिंतोपंत खालच्या आवाजांत रेकून म्हणाले, "त्याच्या कुटुंबातलीं तर सारीं माणसं मेली आहेत. त्याला कोण आहे या जगांत तुझ्यावाचून—म्हणजे आपल्यावांचून? मी नक्की सांगतो, तो आपले सारे पैसे आपल्याला ठेवून जाणार. नाही तर त्यानें मला कशाला पत्र लिहिलें असतें इतक्या लाबून? कदाचित् त्यानीं तिथं आपलं वुइलदेखील लिहून ठेवलं असेल तुझ्या न् माझ्या नावानं. भायखळ्याच्या पुलावर बसलेल्या एका ज्योतिष्यान मला परवाच सांगितलं कीं, एका लाबच्या नातेवाइकाकडून तुम्हाला धन मिळ-णार. त्याच तें ज्योतिष खरं ठरणार असा रग दिसतोय!"

लखूमामा ठोमऱ्याचे पाचपंचवीस हजार रुपये आपल्या जणुं काही हातातच येऊन पडले या कल्पनेच्या आनदात दोघेहि नवराबायको यथेच्छ डुबू लागलीं.

## • ३ •

तिकडे अहंमद सेलर चाळ नं. ७ मधल्या आपल्या खोलींत शंभूराव अष्ट-पुत्रेही आनदातिशयानें आपल्या खाटेवर गडबडा लोळत होते. त्यांच्या हातांतही तसलेंच चुरमडलेलें, कापऱ्या आणि किरट्या अक्षराचें, डाग पडलेलें एक पोस्टकार्ड होते. गोदी त्याना आवरण्याचा प्रयत्न करीत होती. पण तिलाही आपलें हसू अगदीं अनावर झालें होतें.

"काय हें?" गोदी आपल्या लुगड्याचा पदर आपल्या हसऱ्या ओठांनीं चावीत म्हणाली, "अशानं माणसाला वेड लागायचं!"

"वेड लागण्यासारखीच ही गोष्ट आहे," शंभूराव धापा टाकीत म्हणाले. "वीसपंचवीस हजाराची रक्कम म्हणजे काय सामान्य गोष्ट आहे? आम्हीं दहा जन्म पार्सल क्लार्कची नोकरी केली म्हणून आम्हांला एवढे मिळतील होय कधीं? परवा बोरीबदरसमोरच्या त्या मैदानांत ते सामुद्रिक बसतात ना, त्यांतल्या एकाला मीं हात दाखविला. त्यानें आपल्या छातीवर हात मारून सागितलं कीं, कोणा तरी लांबच्या नातेवाइकाकडून तुम्हाला हजारों रुपये मिळणार आहेत!"

"काय म्हणतां?" गोदी तोंडाचा चंबू करून उद्गारली. "अन् मला नाहीं तुम्हीं सांगितलं तें?"

"त्या वेळीं मला तें खरं वाटलं नाहीं अन् मी तें मग पुढें विसरूनच गेलों." शंभूराव म्हणाले, "पण आज हें लखूमामांचं पत्र हातीं पडलं अन् तूं त्यांची सारी

हकीकत मला सांगितलीस त्या वेळीं मला त्या गोष्टीची आतां आठवण झाली."

नं. १ च्या चाळींत चिंतोपंत टाकसाळे आपल्या बायकोच्या दंडाला धरून, "आतां आपण ही कंपाउंडरची नोकरी सोडून देऊन केमिस्ट आणि ड्रगिस्टचं दुकान काढणार," असें जेव्हां प्रेमानें तिच्या कानात कुजबुजत होते, त्याच वेळीं नं. ७ च्या चाळींत शंभूराव अष्टपुत्रे आपल्या सौभाग्यवतीच्या हाताच्या बोटांत आपलीं बोटें गुंतवून "आपण किराणा मालाचें दुकान नाहीं तर एकादा स्टोअर्स उघडणार" असल्याचा बेत अगदीं लाडिक लाडिक आवाजात वर्णन करून सांगत होते.

इतक्यांत गंगीला कांहीं तरी आठवण झाली आणि ती दचकून चितोपंतांना म्हणाली, "पण काय हो, त्या कार्डात लखूमामांनीं गोदीलाही पण आशीर्वाद लिहिला आहे ना?"

"हो, लिहिला आहे. कां?" एकदम गंभीर चेहरा करून चितोपंत उद्गारले. गंगीच्या मनात काय शंका उत्पन्न झाली आहे त्याची अस्पष्ट कल्पना त्यांच्या डोक्यात आल्यावाचून राहिली नाहीं.

"म्हणजे मग लखूमामा सगळे पैसे काहीं मला एकटीला देणार नाहींत. यांतले निम्मे पैसे ते गोदीला देणार!" गगी चिताक्रांत चेहरा करून म्हणाली.

"तुझी शंका बरोबर आहे," उदराएवढें तोड करून चिंतोपंत म्हणाले. "म्हणजे आपल्याला फक्त बारा-साडेबारा हजार रुपये मिळणार. एवढ्या पैशांत आजकाल केमिस्टचें अन् ड्रगिस्टचें दुकान कसें शक्य आहे?"

"साडेबारा हजारांत किराणा मालाचें दुकान निघणें अगदीं अशक्य आहे!" लांबोडा चेहरा करून शंभूराव आपल्या बायकोला जोरजोरानें सागत होते.

"काय वाटेल तें झालें तरी गोदीच्या अन् शभूरावाच्या वाट्याला पंचवीस हजारांतली एक पैदेखील जातां कामा नये!" चितोपंत दातओठ खाऊन गंगीला बजावीत होते.

"त्या लखूमामांना आपल्याकडे येऊन राहू दे तर खरं. पाहतों ते गंगीला अन् चिंत्याला अर्धा हिस्सा कसा देतात तें! असे त्यांचे कान फुंकून ठेवतों त्या दोघांविरुद्ध!" शंभूराव मिशीवर ताव देऊन गोदीपुढें फुशारक्या मारीत होते.

लखूमामांचें आपल्याला पत्र आलें आहे याबद्दल आपण गोदीला एक अक्षर देखील बोलणार नाहीं, असें चिंतोपंतांनीं गंगीकडून वचन घेतलें. आणि 'लखूमामा आपल्याकडे राहायला येणार आहेत' याबद्दल ब्रदेखील आपण

गंगीपाशीं तोंडांतून काढणार नाहीं अशी शंभूरावांनीं गोदीला शपथ घ्यायला लावली.

"नाहीं तर बोलशील लोणचं घालतांना कांहीं तरी गोदीपाशीं," चिंतोपंत गगीला टोमणा देत म्हणाले. "तुला आपल्या बहिणीच्या प्रेमाचा उमाळा येतो ना मोठ्या !"

"बर बाई, मी उद्यापासून गोदीच्या घरांत पाऊलच ठेवीत नाहीं, मग तर झालं ?" गंगी म्हणाली. "पण तुम्ही मात्र स्वतःच्या तोंडाला जपा. नाहीं तर रात्रीं पेटी वाजविताना काहीं तरी शंभ्याच्या कानांत भकाल अन् सगळाच बाजा वाजवाल !"

"आजपासून त्या कारकुंड्याबरोबर साथ करायला जाईन तर किनई ?" चितोपंत वरच्या दातानीं खालचा ओठ चावीत म्हणाले.

"उद्यापासून मसाला कुटायला मी जाणार नाहीं गंगीकडे. मग तर झालं ?" गोदी आर्जवानें शंभूरावाना सागूं लागली.

"आणि मी त्या मलमखल्याबरोबर तबला वाजवायला आजपासून गेलो तर मीही माझी मिशी उतरून ठेवीन." डाव्या मिशीचें टोक खसकन् ओढून शभूराव ओरडले.

• ४ •

चितोपंतांनीं आणि शंभूरावांनीं आपापल्या बायकांसमोर केलेल्या त्या 'भयंकर प्रतिज्ञा' त्याच रात्रीं त्यांनीं अंमलांत आणल्या.

'दामोदर हॉल'मध्यें त्याच रात्रीं 'संगीत प्रेमाचे तीन तेरा' या नाटकाच्या प्रयोगाला त्याना 'वाजवायला' जावयाचें होतें. पण आपल्या प्रकृत्या एकाएकीं बिघडल्याचें त्यांनीं त्या क्लबाच्या चालकांना ऐन वेळीं कळविलें. त्यामुळें नाटकाचे चागलेच तीन तेरा वाजले हें सागायला नकोच. नाटक बंद पडल्याचें शुभाशुभ उभयतांनाही वाटण्याचें कारण नव्हतें.

पण दुसऱ्या दिवशीं घोडपदेवला सत्यनारायणाची पूजा होती. ती आपल्या गैरहजेरीमुळें बिघडली तर आपल्याला पाप लागेल, सत्यनारायण आपल्यावर रागावेल अन् साधुवाण्याच्या नौकेंतील संपत्तीचीं जशीं 'लतापत्रें' झालीं त्याप्रमाणें लखूमामांकडून आपल्याला मिळणाऱ्या नोटांच्याही पत्रावळी होतील या भयानें सत्यनारायणाची पूजा चुकविण्याची दोघाचीही छाती झाली नाहीं. ते

पूजा 'वाजवायला' अगदीं वेळेवर गेले. पण सबंध तीन तासात एकमेकाशीं अक्षरसुद्धां बोलले नाहींत किंवा एकमेकाच्या डोळयाला डोळाही त्यांनीं दिला नाहीं.

'म्हाळसाकान्त नाट्यसमाजा'च्या तालमी मात्र बंद पडल्या आणि 'एक घाव दोन तुकडे' रंगभूमीवर येण्याआधींच त्याचे दोन तुकडे झाले. नाटककार च. कृ. वाघमारे याचें तें पहिलें नाटक होतें. क्लबच्या मालकांच्या आपापसातील वितुष्टांमुळें त्या नाटकाला जन्माआधींच नख लागून चं. कृ. वाघमारे याचा चेहरा एकाद्या कोकराप्रमाणें केविलवाणा दिसूं लागला. आणि त्यामुळें त्याच्या चाळींतले लोक त्याच्या आडनावाची अगदीं उघड उघड थट्टा करूं लागले.

गंगीनें आपल्या पोराच्या पाठींत दोन दोन धपाटे मारून त्याना सागितलें कीं, "खबरदार, गोदूमावशीच्या चाळींत गेला आणि तिच्या पोरट्याशीं बोलला तर!"

अन् गोदीनें आपल्या मुलीच्या गालफडात लगावून त्याना बजावलें कीं, "गगीमावशीच्या खोलींत पुन्हा पाऊल टाकलेंत तर तुमच्या तगड्याच मोडीन मेल्यांनो!"

एका आठवड्याच्या आत चितोपत टाकसाळे आणि शंभूराव अष्टपुत्रे याच्या कुटुंबाचें एकमेकाशीं नातेंच काय पण ओळख तरी आहे काय याची एक आणि सात नंबरांच्या चाळींतील त्यांच्या ओळखीच्या माणसांना शंका पडूं लागली. पण तो महिना संपत आला तरी लखूमामाचा काहीं पत्ता नव्हता. त्यामुळें चिंतोपंतांचा आणि शंभूरावाचा जीव सकाळपासून संध्याकाळपर्यंत अगदीं कासावीस होऊन गेला.

चाळींत जरा कांहीं खुट्ट झालें किवा जिन्यावर कुणाचींही पावलें मोठ्यानें वाजलीं कीं गंगी आणि गोदी आपापल्या हातातील कामें तशींच खालीं टाकून बाहेर येत आणि डोकडोकावून चहूं बाजूंना पाहूं लागत. सत्तर वर्षांच्या वयाचा कुणीही म्हातारा चिंतोपंताना किंवा शंभूरावांना रस्त्यानें चालतांना दिसला कीं ते धावत त्याच्याजवळ जात आणि पायापासून डोक्यापर्यंत टवकारून त्याच्याकडे पाहात किंवा लांबून 'लखूमामा' अशी आरोळी मारून तो आपल्याकडे बघतो आहे किंवा नाहीं याची चाचणी घेऊन बघत.

झांशीच्या बाजूकडून मुंबईला आगगाडया केव्हां केव्हां येतात त्यांच्या वेळांची चौकशी करून त्या त्या वेळेला ते रजा काढून स्टेशनवर जात आणि

एकमेकाच्या नजरेला न येईल अशा रीतीनें ते सारी गाडीच्या गाडी पालथी घालीत. एकदां मात्र स्टेशनच्या प्लॅटफॉर्मवर अशीच धावपळ करीत असतांना चितोपंत आणि शभूराव याची समोरासमोर टक्कर झाली.

चितोपत रागानें डोळे गरगरा फिरवीत शभूरावाच्या अंगावर ओरडले, "डोळे फुटलेत का ?"

शभूराव तितक्याच त्वेषानें चितोपंताच्या अंगावर खेकसले, "आणि तुमच्या डोळ्यात काय फुल पडलीत का ?"

चिंतोपंत आणखीच मोठ्यानें किचाळले, "इथं स्टेशनवर काय तुमचं काम आहे ? जणुं काहीं सासराच यायचा असेल तुमचा ! "

त्याच्या आवाजावर पट्टी चढवून शंभूराव ओरडले, "हो, हो, सासराच यायचाय माझा ! मग तुमच काय म्हणण आहे !"

सासरा येणार आहे शभूरावाचा ?—चितोपताच्या पोटांत एकदम कळ उठली. मग लखूमामा ठोमऱ्यानें आपल्याप्रमाणें शभूरावालाही झाशीहून पत्र पाठविलेलें दिसतें आहे !

"कां, असे रोखून काय बघताहात माझ्याकडे टोणग्यासारखे ?" चितोपंत त्याच्याकडे न्याहाळून पाहायला लागले तेव्हा शंभूराव आवेशानें गर्जून म्हणाले. "माझा सासरा येणार आहे म्हणून तुमच्या पोटात का दुखतं ?"

"माझ्या पोटात दुखायच काय कारण ?" चितोपत दोन इंच छाती फुगवून ओरडले, "माझाही सासरा येणार आहे. त्यानाच पाहायला मी स्टेशनावर आलो आहें !"

शंभूरावांच्या छातींत धस्स झालें. ते चितोपतांच्या चेहऱ्याकडे टकमक पाहात राहिले. 'म्हणजे लखूमामा ठोमऱ्यानें आपल्याप्रमाणें या चित्यालाही कार्ड टाकलं आहे तर !' दातओठ खात शंभूराव मनाशीं पुटपुटले.

घरीं आल्यानंतर त्या संध्याकाळीं स्टेशनवर घडलेल्या प्रकाराची बातमी दोघांनींही आपापल्या बायकांना तिखटमीठ लावून सांगितली.

चिंतोपत गंगीला म्हणाले, "अशी झाडली मीं त्या शभ्याची !—"

शंभूराव गोदीला म्हणाले, "अशी बिनपाण्यानें केली मीं त्या चिंत्याची !"

पण प्रत्येकजण मनात समजून चुकला कीं लखूमामा ठोमऱ्याचे पंचवीसचे पंचवीस हजार कांहीं आपल्या एकट्याला मिळत नाहींत. त्यांतला निम्मा हिस्सा आपला साडू उपटणार.

• ५ •

त्यानतर दोनतीन दिवसांनींच एके दिवशीं सकाळीं सात वाजतां चिंतोपंताचें दार कोणी तरी खडखडावलें. चितोपंत आपल्या खाटेवरून उडी मारून एकदम दाराकडे धावले. गंगीला आपलें हृदय बंद पडतें आहे असें क्षणभर वाटलें.

दार उघडून चिंतोपंत बघताहेत तों बाहेर एक पोलिस उभा असलेला त्याना दिसला. चितोपताच्या छातींत धसकाच बसला. पोलिस अन् इतक्या सकाळीं आपल्या दाराशीं?

"चिंतोपंत टाकसाळे आपणच का?" पोलिसानें शांतपणें विचारलें.

"हो—मीच," चिंतोपत ओठ मिटून घुटका घेत उत्तरले.

"झांशीचे लखूमामा ठोमरे कोण तुमचे?" पोलिसानें दुसरा प्रश्न केला.

म्हणजे! आले वाटतें लखूमामा ठोमरे एकदाचे मुबईला? पत्ता सापडत नसेल म्हणून बसले असतील पोलिस चौकीवर जाऊन झालें. चितोपंतांच्या डोक्यात झटकन् विचार येऊन गेला. आनदानें त्यांचे डोळे एकदम चमकू लागले.

"लखूमामा माझे सासरे." चितोपत घाईघाईनें हसून म्हणाले.

"सख्खे चुलत आजे सासरे!" गगीनें पुढें येऊन पुष्टि दिली. "कुठें आहेत ते?"

"ते मेले!" पोलिस शिपाई शातपणें उद्गारला.

"मेले ते?" चिंतोपंत अन् गगी एकदम किचाळलीं. "अन् कधीं?"

"तें मला माहीत नाहीं. आज सकाळीं आगगाडींत त्यांचें प्रेत सांपडलें," शिपाई म्हणाला. "अन् त्याच्या खिशात तुमच्या नांवाची चिठ्ठी सापडली. अकरा वाजता कॉरोनरच्या कोर्टांत तुम्हाला हजर राहिलें पाहिजे."

"अन् बरोबर त्याच्या सामान होतं तें कुठं आहे?" कांहीं तरी आठवण होऊन चिंतोपंतानीं विचारलं.

"सामान कांहीं फार नव्हतं. एक ट्रंक होती, अन् एक वळकटी." पोलिस शिपाई आपल्या हातातल्या पिवळ्या सरकारी कागदावर लिहिलेला मजकूर वाचीत म्हणाला.

"ट्रंक!" चिंतोपंत आणि गंगी पुन्हा एकदम ओरडलीं. आणि एकमेकाकडे 'अर्थ'पूर्ण दृष्टीनें पाहूं लागलीं.

"कुठें आहे ती ट्रंक?" चिंतोपंतांनीं विचारलें.

"ती असेल तिथच कोर्टात!" पोलिस म्हणाला. "अन् काय हो, हे शंभूराव अष्टपुत्रे सात नंबरच्या चाळींत राहतात ना?"

"तें कांहीं आम्हाला माहीत नाहीं!" चिंतोपंत एकदम आतून दार बंद करीत म्हणाले.

"अन् त्याचा न् लखूमामांचा कांहीं एक संबंध नाहीं बरं का?" दाराच्या फटींतून तेवढ्यांतल्या तेवढ्यात गंगीनें रागानें पोलिसाला ओरडून सांगितलें.

"कमाल आहे या तुझ्या लखूमामाची!" चिंतोपंत डावा तळहात वाकडा करीत म्हणाले. "लेकाचा इथें पोहोचायच्या आतच स्टेशनवर मेला!"

"मरूं द्या ते मेले तर," गंगी म्हणाली. "पण त्याची ट्रंक तर त्यांनीं मागे ठेवली आहे ना?"

"ते खरं; पण तो शंभ्या त्यात वाटेकरी होणार ना?" चिंतोपंत चिंतातुर चेहरा करून म्हणाले. "त्याच्याही नावाची चिठ्ठी लखूमामानीं आपल्या खिशांत ठेवून दिलेली दिसते आहे!"

"मग असं करा ना," गंगी चिंतोपंताच्या दंडाचा चिमटा घेऊन म्हणाली. "तो शंभ्या तिथें जायच्या आंत तुम्ही जा अन् त्या ट्रंकेचा ताबा घेऊन टाका म्हणजे झालं!"

"चांगली आहे युक्ति!" गंगीच्या पाठीवर जोरानें थाप मारून चिंतोपंत म्हणाले, "हा मी चाललोच तिकडे!"

• ६ •

पण चिंतोपंत टांकसाळे कॉरोनरच्या कोर्टात जाऊन पोहोचताहेत, तोंच शंभूराव अष्टपुत्रे धापा टाकीत तेथें येऊन पोहोचले. ते डोळे फाडफाडून चिंतोपंतांकडे बघूं लागले.

"माझ्यावर मात करतोस काय लेका?" चिंतोपंतांना ऐकूं जाईल अशा तऱ्हेनें ते स्वतःशीं पुटपुटले, "तुझे बारसें जेवून बसलों आहें मी!"

त्या दिवशीं ज्याचा पंचनामा होणार होता अशीं पाचसात प्रेतें एका पत्र्याच्या लहानशा इमारतींत ठेवलेली होतीं. त्यांपैकीं आपलें प्रेत कोणतें तें ओळखून घ्यायला चिंतोपंतांना आणि शंभूरावांना पोलिसांनीं कोर्ट सुरू होण्या-पूर्वी तेथें बोलावून नेलें.

त्या प्रेतांमध्यें सत्तर वर्षांच्या म्हाताऱ्याचीं तीन वाळलेलीं आणि हाडकुळीं प्रेतें होतीं. त्यामधलें लखूमामाचें प्रेत कोणते? चितोपंत आणि शंभूराव बुचकळ्यांत पडले. आणि डोकें खाजवूं लागले. त्यांनीं लखूमामांना जन्मात पूर्वी कधीं पाहिलेलें नव्हतें.

"असे बघता काय धादरटासारखे? तुमचें प्रेत कोणतें तें ओळखा झट-पट!" हवालदार आपल्या करड्या आवाजात ओरडला.

चितोपंतानीं मनाचा धडा करून डाव्या बाजूच्या एका प्रेताकडे कापत कापत बोट नेलें. अन् शभूरावांनीं रामाचें नाव घेऊन उजव्या बाजूच्या प्रेताला शिवल्यासारखे करून हात झटकन् मागे घेतला.

हवालदार दोघाच्या तोडाकडे पाहून हसूं लागला. चितोपंतानीं दाखविलेलें प्रेत शिव्या संभ्या नावाच्या एका मागाचें होतें आणि शभूरावानीं हात लावलेलें प्रेत अब्दुल हुसेन नावाच्या एका भिकाऱ्याचें होते.

हवालदारानीं प्रेताला बाधलेल्या चिठ्या मोठ्यानें वाचल्या. चितोपताचा आणि शभूरावाचा चेहरा पाहण्यासारखा झाला. मग मध्यें ठेवलेल्या म्हाताऱ्या प्रेताची चिठी वाचून हवालदार हसत हसत म्हणाला, "हा दिसतो आहे तुमचा लखूमामा ठोमरे! काय जावई आहात तुम्ही! आपल्या सासऱ्याचें प्रेत बी ओळखता येत नाहीं तुम्हाला?"

"हो, हो. हेंच आमचे प्रेत!" चितोपत आणि शभूराव मोठमोठ्यानें माना हलवीत ओरडले.

"पण यांच्याजवळची ट्रंक कुठं आहे?" शंभूरावानीं चितोपतांवर आघाडी मारून हवालदाराला प्रश्न केला. चिंतोपत त्याच्याकडे मोठमोठे डोळे करून पाहूं लागले.

"ट्रंक असेल तिकडे कोडतांत!" हवालदार एका दिशेकडे हात उंच करून म्हणाला.

अकरा वाजतां कॉरोनरच्या कोर्टांत रीतीप्रमाणें लखूमामाच्या प्रेताचा पंचनामा झाला. "वार्धक्यामुळें प्रवासांत हृदय बंद पडून त्यांना मरण आलें," असा कोर्टानें निर्णय दिला. पंचनामा चालू असता डोळे आणि, नाकें पुसून कोर्टाचें लक्ष आपल्याकडे जाईल अशा रीतीनें चितोपत आणि शंभूराव दोघेही मोठ-मोठ्यानें रडत होते. पण कोर्टानें त्यांच्याकडे ढुंकूनही पाहिलें नाहीं. प्रेत दोघांच्या ताब्यांत देऊन टाकण्याचा कोर्टानें हुकूम सोडला.

"अन् ट्रंकेचें काय ?" चिंतोपंत मध्येंच ओरडले.

त्यावर शिरस्तेदारानीं 'शू' करून त्याना दटावलें, "वारसाचें सर्टिफिकेट मिळवून तुम्ही त्याबद्दल तिकडच्या कोर्टात अर्ज करा. जा."

लखूमामांच्या प्रेताचा दोघांना ताबा देण्याचा कॉरोनरनें हुकूम दिला खरा, पण एका प्रेताचा दोघानीं ताबा घ्यायचा कसा ?—आला किनई प्रश्न ? मध्यभागीं लखूमामाचें प्रेत ठेवून एकमेकावर डोळे गरगरा फिरवीत आणि दोन बोक्याप्रमाणें एकमेकाच्या अंगावर गुरगुर करीत चिंतोपत आणि शभूराव किती वेळ तरी कोर्टाच्या आवारात तसेच बसून राहिले.

"दिसला बर का तुमचा शहाणपणा !" शेवटीं चितोपत शभूरावाच्या अंगावर ओरडून म्हणाले.

"हो, अन् कळली बरं का तुमची अक्कल !" शंभूरावानीं त्यांना त्याच स्वरांत उत्तर दिलें.

"आता हें प्रेत आपल्या चाळींत नेईपर्यंत तरी भाडण नको. मग पुढें भाडूं आपल्याला काय भांडायचें तें !" कोपरापर्यंत हात जोडून चितोपंत म्हणाले.

"मग आम्ही तरी दुसरें काय म्हणतों आहोंत ? या प्रेताचा आधीं निकाल लावूं. मग आपण आहोत नि ती ट्रंक आहे !" शंभूराव आवाज पडता करून म्हणाले.

चिंतोपंतांनीं एक व्हिक्टोरिया बोलावली आणि लखूमामांचें प्रेत शंभूरावांनीं आत गादीवर झोपविलें. समोरच्या सीटवर दोघेही शेजारीं शेजारीं बसले. शंभूरावानीं लखूमामाचें डोकें दाबून धरलें अन् चितोपंतांनीं त्याचे पाय आपल्या हातानीं आवळून धरले. वाटेंत एके ठिकाणीं गाडी थाबवून त्यांनीं मर्तिकाचें सामानही खरेदी केलें.

दोन तासांनीं गाडी अहमद सेलरच्या चाळींत आली. पण पुन्हा आलें भाडण ! प्रेत एक नंबरच्या चाळींत न्यायचें कीं सात नंबरच्या ? शेवटीं चार नंबरची चाळ मधोमध होती. तिच्या आवारातच प्रेताची बांधाबांध करावयाचें उभयताच्या संमतीनें ठरलें.

प्रेताची तयारी होत असतांना गंगीनें एक नंबरची चाळ रडून रडून अगदीं डोक्यावर घेतली. आणि गोदीनें आपल्या आरोळ्यानीं सात नंबरची चाळ अगदीं दणाणून सोडली. आपल्या झांशीच्या आजोबांचें आपल्यावर किती प्रेम होतें हें दोघीही ओक्साबोक्शीं रडून रडून आपल्या शेजारच्या आयाबायांना सांगत होत्या.

प्रेत उचलताना कोणाच्या माणसांनीं कुठें खादा द्यायचा याचें पुन्हा भाडण निर्माण झालें; पण चितोपंतांच्या दोघां चाळकरांनीं उजव्या बाजूला खांदा द्याव-याचा आणि शंभूरावाच्या दोन शेजाऱ्यानीं डाव्या बाजूला खांदा द्यावयाचा अशी यावर तोड निघाली. आणि गंगी-गोदीच्या हंबरड्यात लखूमामाची ताटी शेवटीं उचलली गेली. चितोपंत आणि शभूराव आपापल्या हातात स्वतंत्र मडकें घेऊन प्रेताच्यापुढें एका लायनीनें सारखीं पावलें टाकीत चालूं लागले. या अद्‌भुत प्रेतयात्रेकडे रस्त्यातले सारे लोक मोठ्या आश्चर्यानें पाहात होते.

लखूमामाचें और्ध्वदेहिक संपल्यानंतर चितोपंत आणि शभूराव हे दोघेही मिशा काढून आणि डोक्याचें मुंडन करून स्मशानातून परत आले. दोघानींही लखूमामाचा तेरावा दिवस आपापल्या चाळींत दणक्यानें साजरा केला. 'आजोबाना गव्हाची खीर फार आवडत असे,' म्हणून गगीनें ब्राह्मणाना पातेलेंभर खीर करून खाऊं घातली, तर 'आजोबाना गुळाच्या पोळ्या फार आवडत,' म्हणून गोदीनें परातभर पोळ्या करून अगदीं अजीर्ण होईपर्यंत ब्राह्मणाना खायला घातल्या.

सासऱ्याच्या मरणामुळें आपल्याला इतकें दुःख झालें आहे कीं आपल्या हातून काम होणें कांहीं दिवस तरी अशक्य आहे असें म्हणून चितोपंत आणि शंभूराव यानीं महिन्या दीड महिन्याची रजा काढली आणि आपली भादरलेलीं तोडें उपरण्यानीं गुडाळून ते दिवसभर आपापल्या चाळीच्या आजूबाजूला हिंडूं लागले.

•७•

सतरा वेळां जेव्हां कोर्टात खेटे घातले आणि वकिलाच्या डोसक्यावर पांच-पन्नास रुपये खर्च केले, तेव्हा कुठें शेवटीं लखूमामांच्या 'इस्टेटी'चें दोघांनाही प्रोबेट मिळालें. कोर्टानें दोघानाही लखूमामाचे वारसदार ठरविलें.

"चला, कांहीं नाहीं तर नाहीं, साडेबारा हजार तरी कुठें गेले नाहींत!" चितोपंत सुटकेचा निश्वास टाकीत गंगीला म्हणाले.

"आजच्या काळांत साडेबारा हजार तरी कांहीं कमी का आहेत?" शंभूराव स्वतःची आणि गोदीची समजूत काढीत म्हणाले.

शेवटीं ट्रंकेंतल्या ऐवजाची वांटणी कोर्टामार्फत करून घेण्याचा दिवस उजा-डला. गंगीनें अन् गोदीनें त्या दिवशीं आपापल्या नथा नाकांत चढवून खालून

वर अन् वरून खालीं चकरा मारण्याची अगदीं पराकाष्ठा केली. 'आज सकाळपासून यांना झालंय तरी काय,' असा चाळींतल्या साऱ्या बायका डावा हात कमरेवर अन् उजवा हात ओठांवर ठेवून अचंबा करूं लागल्या.

चितोपंत अन् गंगी व्हिक्टोरियात बसून कोर्टांत गेलीं. तर गोदी अन् शंभूराव टॅक्सी करून त्याच्या अंगावरून दिमाखानें गेलीं.

चितोपत गंगीला हसून म्हणाले, "मी तुला खात्रीनें सांगतों कीं हा शम्या एका आठवड्याच्या आंत त्या साडेबारा हजाराचें वाटोळें करतो कीं नाहीं बघ!"

शंभूराव हसून गोदीला म्हणाले, "स्वतःच्या शरीराला जर आपण सुख लावून नाहीं घेतल तर काय जाळायचंय त्या साडेबारा हजार रुपयाना!"

बरोबर बारा वाजता 'क्लार्क ऑफ् दि कोर्ट'नें लखूमामाची पादरी पत्र्याची ट्रंक पट्टेवाल्याकडून आपल्यासमोर आणून ठेवली. तिला एक भलें-मोठे कुलूप होतें अन् त्यावर कोर्टानें लाखेचें तांबडें सील लावलें होते. एका बाजूला चितोपत अन् गंगी खुर्च्यांवर बसली होतीं आणि दुसऱ्या बाजूला गोदी अन् शंभूराव बसली होतीं.

ट्रंकेचा आकार पाहून चिंतोपंत अन् शंभूराव थक्क होऊन गेले. कदाचित् पंचवीस हजारापेक्षां जास्त ऐवज तिच्यामध्यें असण्याचा संभव आहे असा दोघांच्या मनामध्यें विचार आला. तो दोघानींही आपापल्या बायकाच्या कानांत सागितला.

शेवटीं पट्टेवाल्यानें सील तोडलें अन् कुलुपात किल्ली फिरवून तें ट्रंकेच्या कोयंड्यांतून एकदाचें बाहेर काढलें.

गंगीनें मनातल्या मनांत शितळादेवीला नवस केला अन् गोदीनें चटकन् डोळे मिटून खणानारळानें परभादेवीची ओटी भरली. चिंतोपंतांनीं वडाळ्याच्या मारुतीच्या गळ्यांत रुईच्या पानांचा हार चढविला. अन् शभूरावानीं वरळीच्या पंचमुखी मारुतीच्या डोक्यावर तेलाची वाटी ओतली.

पट्टेवाल्यानें ट्रंकेचें झाकण उघडलें. तों आंतून अशी वसकन् घाण आली कीं सर्वांनीं आपापली नाकें दाबून धरलीं. मेलेला उंदीर शेपटीला धरून जसा उचलतात तशा सावधगिरीनें पट्टेवाल्यानें ट्रंकेंतला एकेक जिन्नस बाहेर काढायला सुरुवात केली.

चिंतोपंत अन् शंभूराव डोळे फाडून त्या जिनसांकडे बघूं लागले. शेजारचा कारकून त्या त्या वस्तूचें नांव मोठमोठ्यानें उच्चारून त्याचें टिपण करूं लागला.

" दोन धाबळ्या, तीन लोकरी बंड्या, दोन कानटोप्या, चार गरम पायमोजे जोड, एक मुकटा, चार लोकरी अंगरखे, चार पोथ्यांचीं दप्तरें, एक देवांची संबळ, तीन शंख मोठे मोठे, एक डाव्या सोंडेचा गणपति, चार रुद्राक्षांच्या माळा, खडावा जोड एक, एक चिपळ्याचा जोड अन् दोन टाळाचे जोड—संपलं !"

"संपलं ?" चिंतोपंत मोठ्यानें ओरडले.

"आंत कांहीं नाहीं ?" शंभूराव किचाळले.

"कांहीं नाहीं !" आंतून एक जिन्नस काढीत पट्टेवाला ओरडला, " फक्त ही एक एवढी पिकदाणी आहे !"

"घ्या, पिकदाणी घ्या सासऱ्याची तुम्हाला थुकायला !" चिंतोपंत शंभूरावांच्या अंगावर खेकसून म्हणाले.

"तुम्हीच घ्या. पानतंबाखू खायचें व्यसन तुम्हाला आहे, मला नाहीं !" शंभूराव तोंड वेंगाडून चिंतोपंताना म्हणाले.

"भाडताय काय इथें ? आटपा. घ्या आपापलं सामान बांधून." कारकून दोघांच्या अंगावर ओरडला.

दोघानींही त्या सामानाच्या ढिगाचे कसे तरी दोन भाग केले. आणि वेडीं-वाकडीं तोंडें करीत आपापल्या उपरण्यात गुंडाळून त्याचीं दोन गांठोडीं बाधली.

"घ्या आपल्या लाडक्या आजोबांची इस्टेट !" दोघेही आपापल्या बायकाच्या अंगावर ओरडले. गंगीनें अन् गोदीनें माना खाली घालून तीं दोन्ही बोचकीं कडेवर घेतली.

"अन् ही ट्रंक ?" पट्टेवाला ओरडला.

"ती घे तुला बक्षीस !" चिंतोपंत तिच्याकडे न पाहतां म्हणाले.

"आमच्या सासरोबाची आठवण म्हणून !" शंभूराव चमत्कारिकपणें हसून म्हणाले.

• ८ •

लखूमामा ठोमऱ्यांच्या बेचाळीस पिढ्यांवर मनांतल्या मनांत एक शब्दकोश भरेल एवढ्या शब्दाची लाखोली उधळीत चिंतोपंत आणि शंभूराव कोर्टाच्या बाहेर पडले. रस्त्यातून मद्रासी भिकाऱ्याचें एक काळें कुळकुळीत लंगडें अन् पांगळें कुटुंब चमत्कारिक भाषेंत ओरडत नि गात, खरडत अन् फरपटत चाललें होतें. चिंतोपंत अन् शंभूराव यानीं आपापल्या बायकांच्या हातांतली

गाठोडीं खसकन् ओढून घेतलीं आणि त्यामधील सारा ऐवज त्या भिकाऱ्यांच्या पुढयात भडाभड ओतून मोकळा केला.

"इद मिल्ली चिद बरक्यान!" साऱ्या भिकाऱ्यानीं आनंदानें जयघोष केला.

न्हावी जशीं केसाचीं फडकीं रस्त्यावर झटकतो तशीं आपापलीं उपरणीं रस्त्याच्या बाजूला फटाफट झटकून चिंतोपत अन् शंभूराव ओरडले, "चला, सासरा मेला अन् विटाळ फिटला!"

पुन्हा उपरणीं गळ्याभोवतीं गुडाळताना उभयतामध्यें इतके दिवस वितुष्ट उत्पन्न झालें होते आणि उभयताचे संबध इतके पराकाष्ठेचे दुखावले होते, ह्याची आठवण देखील दोघेजण विसरून गेले.

"तुम्ही काहीं म्हणा शभूराव," चितोपत त्याच्या गळयात प्रेमानें हात घालून म्हणाले, "हा सगळा घोटाळा आमच्या बायकोनें निर्माण केला! या थेरड्याजवळ पन्नास हजाराची माया होती, हे विष तिनें माझ्या कानात ओतले."

"तुमच्या बायकोचें कशाला सागताय्?" शंभूराव स्नेहार्द्र दृष्टीनें चितोपताकडे पाहात म्हणाले, "आमची ही काय कमी आहे? त्या म्हातारड्याच्या पचवीस हजारापैकीं एक पैही तुम्हा दोघाच्या हातीं पडता कामा नये ही—ही मसलत हिनें मला दिली. आता बघा बघतेय कशी मारक्या म्हशीसारखी माझ्याकडे!"

"तुम्ही काहीं म्हणा शभूराव," चिंतोपंत एकंदर झालेल्या गोष्टीचें तात्पर्य सागण्याच्या मनःस्थितींत येऊन म्हणाले, "जगातल्या चागल्या माणसामध्यें जे तटे उत्पन्न होतात त्याचें कारण—"

"बायका!" शंभूराव टरक्या नजरेनें गोदीकडे अन् गंगीकडे पाहात म्हणाले.

"नाहीं—नाहीं, हा पैसा!" चितोपंतानीं आपलें वाक्य पुरें केलें. "पैसा बरें—पैसा!"

शभूरावाचा चेहरा एकदम गभीर झाला व ते आत्मसंशोधन करूं लागले. गगी आणि गोदी एकमेकीकडे पाहून खुदकन् हसल्या.

जाताना ट्रॅमच्या भाड्याचे पैसे कोणीं द्यायचे याबद्दल चिंतोपंत आणि शंभूराव याच्यामध्यें कडाक्याचें भाडण झालें.

चितोपंत म्हणाले, "मी थोरला साडू आहें. पैसे मी देणार."

शभूराव म्हणाले, "आमच्या कुळांत धाकट्यानें पैसे द्यावेत अशी रीत आहे."

साडूसाडूंच्या बंधुप्रेमाचें तें रोमहर्षक प्रदर्शन बघून गंगीला अन् गोदीला धन्य झालें. त्याच्या डोळ्यात अश्रू उभे राहिले.

त्या रात्रीं 'दामोदर हॉल'मधल्या 'संगीत दोन बायकांच्या दादल्या'ला असा काहीं रंग भरला म्हणताय! चितोपंतांनी आणि शंभूरावानीं 'वाजवायची' अगदी कमाल केली, असे ज्यानें त्यानें उद्गार काढले.

'म्हाळसाकांत नाट्यसमाजा'च्या 'एक घाव दोन तुकडे' या नाटकाच्या तालमीला दुसऱ्या दिवसापासूनच पुन्हा सुरुवात झाली. अन् नाटककार च. कृ. वाघमारे आपल्या चाळींतून पुन्हा डरकाळ्या मारीत फिरूं लागले.

गंगीच्या खोलीत जाऊन तिचा मसाला कुटायला गोदीला अन् गोदीच्या खोलीत जाऊन तिचें लोणचें घालायला गंगीला असा काहीं जोर आला कीं सांगता सोय नाही!

* * *

# ९ सार्वजनिक जीवन

सकाळची सात वाजण्याची वेळ. 'टाइम्स' वाचीत मी बिछान्यावर लोळत पडलो होतो. माझा हा नेहमींचाच शिरस्ता आहे. इतक्यात दाराबाहेरची घंटा वाजली आणि नोकर मला सांगायला आला कीं, "कुणी तरी पाच-सात माणसं भेटायला आली आहेत."

इतक्या सकाळीं कशाला येतात हीं माणसं दुसऱ्याला त्रास द्यायला कोणास ठाऊक अशा त्रासिक नजरेनें मीं नोकराकडे पाहिलें नि 'बसव त्याना दिवाण-खान्यात' असें अर्धवट शब्दांनीं आणि अर्धवट खुणेनें त्याला सांगितलें.

पाच मिनिटानीं मी दिवाणखान्यात गेलों. तो दिवाणखाना अगदीं भरून गेला होता. पाच-सात का, चागली आठ-नऊ माणसें होतीं. लाबून कोणत्या तरी जिल्ह्यातून आलीं होतीं. बरोबर त्यानीं माझ्या परिचयाचीं मुंबईतली दोनतीन माणसेंही आणलीं होतीं.

"आताच उठला वाटतें ?" त्यापैकीं एक जण मुद्दाम हसूं उकरून काढावें तसा चेहरा करून, मी आत येतांच, म्हणाला.

मी कांहींच बोललों नाहीं.

"आम्हाला वाटलं, इतक्या लौकर तुम्ही उठलां असाल कीं नाहीं कोणास ठाऊक !" पहिल्या माणसापेक्षां जास्त मोठ्यानें हसून दुसऱ्यानें पृच्छा केली.

त्याला चांगला तडाखा देण्याचा विचार क्षणार्ध माझ्या मनांत डोकावून गेला. पण तो तसाच दाबून अगदीं थंड स्वरात मीं विचारलें, "काय, विशेष कांहीं काम ?"

"काम म्हणजे—तुमच्याकडे दुसरं काय काम असायचं ?" तिसरा माणूस आणखी वरच्या पट्टींत हसून बाहेरगांवाहून आलेल्या त्या माणसापैकीं एकाकडे वळला व त्याला म्हणाला, "गणपतराव, कुठें आहे तुम्हीं आणलेलें पत्र ?"

गणपतरावांनीं आपल्या शरीराची एक बाजू उंच करून कडोसरीला लावलेला

एक मळकट रंगाचा घडीदार कागद बाहेर काढला. आणि त्याच्या घड्या साफ करून अन् त्याला जास्त सभ्य स्वरूप देऊन तो माझ्या हातात ठेवला.

"रामभाऊनी आपल्याला पत्र दिलं आहे," दुसऱ्या एका माणसानें हलकेच खुलासा केला.

पत्राच्या तळाशीं केलेल्या लपेटदार मोडी सहीची गुतावळ किलकिल्या डोळ्यानी सोडविण्याचा निष्फळ प्रयत्न करीत मी म्हणालो, "रामभाऊ? रामभाऊ कोण?"

त्याबरोबर गणपतराव चटकन् उत्तरले, "रामभाऊ कुलकर्णी, वकील हो! त्याची न् तुमची फार दोस्ती आहे असं ते म्हणत होते."

"मुंबईला आले म्हणजे तुमच्याकडेच उतरतात—" दुसरा म्हणाला.

"परवा त्याच्या मुलीचं लग्न झाल तेव्हा त्यानी तुम्हाला आमंत्रण धाडल होतं बघा," तिसरा म्हणाला. "अन् तुम्हीही येणार होता, पण आयत्या वेळीं तुमची काहीं तरी भानगड निघाली. अन् तुम्हीं तार पाठविलीत, येता येत नाहीं म्हणून. गावकऱ्याची फार निराशा झाली त्या वेळीं."

"असं असं. म्हणजे आपले रामभाऊ कुलकर्णी वकील म्हणता होय? असे उंचेले गोरटेले आहेत, तेच ना?" काहीं तरी बोलायचें म्हणून मी बोलून गेलो.

"उंचेले गोरटेले?" गणपतराव मध्येंच म्हणाले, "अहो, बुटकेले अन् काळगेले आहेत बघा—तुमच्या तोंडवळ्याशीं त्याचा तोंडवळा जुळतो—अन् वयानें देखील तुमच्याएवढेच असतील!"

"अगदी!" गणपतरावाचा दुसरा गावकरी म्हणाला, "रामभाऊंना परवाच त्रेसष्टावं वर्ष लागल!"

त्या माणसाच्या नाकाचा कडकडून चावा घ्यावा असें त्या वेळीं मला वाटलें.

इतक्यात मुंबईकर माणूस कौतुकाचा वाजवीपेक्षा जादा आविर्भाव तोंडावर आणून हळूच पुटपुटला, "तुम्हाला किती, एकसष्टावें का बासष्टावें—"

"बावन्नावें—" मी शांतपणानें उद्गारलो. माझ्या वयाची त्यानीं चालविलेली आगंतुक विटंबना मला अगदीं असह्य झाली.

"पण चेहऱ्यावरून तर तुमची चाळिशीदेखील ओलांडलेली वाटत नाहीं. का हो शंकरराव?" दुसऱ्या एका मुंबईकरानें खुर्चीच्या दांड्यावर बऱ्याचशा कष्टानें बसलेल्या एका माणसाच्या पाठीवर थाप मारून त्याचें मत विचारलें.

पण तो उत्तर द्यायच्या आंतच खुर्चीच्या दांड्यावरून खालीं निसटला.

तिकडे दुर्लक्ष केल्यासारखे करून माझ्या इतक्या परिचयाचे 'रामभाऊ कुलकर्णी' ही व्यक्ति कोण असावी ह्याचा मी मनांतल्या मनांत विचार करूं लागलो. 'कुलकर्णी' आडनांवाच्या शाळेमधल्या अन् कॉलेजमधल्या सर्व वर्गबंधूंचे आणि त्यानंतर आतांपर्यंत भेटलेल्या सर्व माणसाचे चेहरे आंतल्या 'रुपेरी पड्या' वर मीं चटकन् सरकवून पाहिले. पण त्यांमध्यें हे 'त्रेसष्ट वर्षांचे बुटकेले अन् काळगेले रामभाऊ कुलकर्णी वकील' काहीं मला आठवून येईनात. तेव्हा तो नाद सोडून देऊन मीं त्यानीं मला लिहिलेलें तें पत्र स्वतःशीं वाचू लागलो.

पहिल्याच संबोधनाशीं मी ठेचाळलो. "परमपूज्य देशकार्यधुरंधर साहित्य-मुकुटचिंतामणि भाऊसाहेब याच्या चरणसेवेशीं—"

"भाऊसाहेब!" भातात एकदम खडा लागावा तसा चरफडून मी मध्येच थाबलो. "भाऊसाहेब कोण?—"

"तुम्हाला ते भाऊसाहेब म्हणतात—" गणपतरावानीं मध्येंच हसून खुलासा केला.

"ठीक आहे," मी मनांतल्या मनांत पुटपुटलों. बोलूनचालून मी सार्वजनिक मालच कीं नाहीं? तेव्हां कुणीही मला वाटेल तीं नावं ठेवावींत—भाऊसाहेब नाही तर दाजीसाहेब.

मी पुढें वाचूं लागलों, "आमच्या गांवीं सालाबादप्रमाणें श्री काळभैरवनाथ ह्याची वार्षिक जत्रा भरत असते. आजूबाजूच्या दहा कोसातलीं दहा-वीस हजार माणसें जमत असतात. अशा प्रसंगीं आपल्यासारख्या थोर आणि विद्वान् देशभक्ताच्या तोंडून निघणाऱ्या ज्ञानामृताचा फायदा जनतेला मिळावा अशी सर्व गावकरी मंडळींची इच्छा आहे. आपण या भागात आजपर्यंत कधीं आलेले नाहींत. आपला लौकिक अनेक वर्षांपासून आमच्या कर्णरंध्रांवर आदळत आहे. आपणाला बघण्यासाठीं आणि आपलें व्याख्यान श्रवण करण्या-साठीं आम्ही सर्व मंडळी चक्रवाक् पक्ष्याप्रमाणें डोळ्यात तेल घालून अक्षरशः वाट पाहात आहोंत. आपण न आल्यानें हजारों लोकाची निराशा होईल. तरी आमच्या गावीं या निमित्तानें आपली पायधूळ झाडण्याचे उपकार आमच्या-वर करावेत. याच मुहूर्तावर एक मोफत वाचनालय आणि तालीम सुरू कर-ण्याचा गांवकऱ्यांचा विचार आहे. वाचनालयाचें उद्घाटन तुमच्याच हस्तें

करण्याचा आणि तालमीच्या इमारतीचा दगडही तुमच्याच करवीं बसविण्याचा मंडळीचा विचार आहे. आपण येणार असें गृहीत धरूनच आम्हीं आपलें नाव आमच्या जाहिरातींत आणि पत्रकात जाहीर केलें आहे. इ. इ."

मी पत्र वाचीत असतांना मला बोलावण्यास आलेले 'गावकरी मंडळी'चे ते पाचसात प्रतिनिधि अत्यंत केविलवाणीं तोडें करून माझ्या चेहऱ्याकडे बघत होते.

पत्र वाचून मी तें खालीं टेबलावर ठेवतो आहें, तोंच गणपतराव लगट-पणाच्या स्वरात म्हणाले, "रामभाऊंनीं मला सांगितलंच आहे कीं माझं पत्र वाचल्यावर नाही म्हणायची भाऊसाहेबाची छातीच नाहीं—"

"माझं नाव भाऊसाहेब नाहीं," मी मध्येंच दुरुस्ती केली.

"तेंच तें—जे काय असेल तें."—गणपतराव दात विचकून मोठ्यानें हसण्याचा प्रयत्न करीत म्हणाले.

"पुढल्या सोमवारपासून जत्रा सुरू होते" दुसरे एक गृहस्थ म्हणाले, "अन् शनिवारीं संपते. सहा दिवसापैकीं कोणत्याही एका दिवशीं आपण आलां तरी चालेल."

"नाहीं–नाहीं. कोणत्याहि दिवशीं कसें?" तिसरे एक जण सात्त्विक आवेशाचा आव आणून म्हणाले, "यात्रेच्या पहिल्या दिवशींच साहेबाचं आम्हाला व्याख्यान ठेवायचं आहे. त्या दिवशीं तर खरी गर्दी जमणार. मागाहून गर्दी ओसरल्यावर साहेबाना तिथ कशाला न्यायचंय?"

तो हातानीं अभिनय करून पुढें काहीं तरी 'चमत्कारिक' बोलणार होता, पण त्यानें कसेंबसें स्वतःला आवरले. मींही सुटकेचा एक मोठा निश्वास टाकला.

"गावकरी लोकानीं तर आम्हाला साफ सांगितलंय" चौथा एक जण म्हणाला, "कीं साहेब जर आले नाहींत तर आम्हांला दुसऱ्या कोणाची मुळीं व्याख्यान ऐकायचीं नाहींत. अहो, असतील दुसरे पुष्कळ व्याख्यान देणारे—पैशाला पासरीभर! त्याना काय चाटायचंय!"

"गेल्या वर्षीं पुण्याच्या शनिवारवाड्यासमोर साहेबांचं व्याख्यान होतं. काय गर्दी—काय गर्दी! मी होतो ना तिथं. कसली सभा होती बघा—काहीं आठवत नाहीं!—" डोकें खाजवीत पाचवा म्हणाला.

'अजून कोणाला काहीं बोलायचं असल्यास बोलून घ्या' अशा अपेक्षेनें मीं सर्वांच्या तोंडाकडे क्रमशः पाहिलें. पण त्यानंतर आतां मीं बोलावें अशी

सर्वांची अपेक्षा दिसली. तेव्हां मला बोलायला संधि दिल्याबद्दल मनांतल्या मनांत त्याचे आभार मानून मी म्हणालो, "तुमच्या रामभाऊ कुळकर्णी वकिलांना कळवा कीं म्हणावं, तुमचं पत्र पावलं. आभारी आहें. पण कामाच्या गर्दीमुळें यंदा काहीं मला येतां येत नाहीं—माफ करा म्हणावं."

त्याबरोबर डोक्यावर पटई कोसळून पडावी असे सर्वांनीं चेहरे केले आणि ते एकमेकाकडे मोठ्या दुःखानें बघूं लागले.

एक मुंबईकर म्हणाले, "नाहीं, नाहीं—साहेब, अं—हें हें नाहीं चालायचं. आमच्यासाठीं तरी तुम्हाला याना 'हो' म्हटलंच पाहिजे."

दुसरे मुंबईकर म्हणाले, "आम्हीं तर या मंडळीला सांगितलं कीं, साहेब दुसऱ्याना काय वाटेल तें म्हणोत, पण आम्ही तर त्याना हात धरून घेऊन आल्याशिवाय राहणार नाहीं!"

"कामाची गर्दी तर साहेब आपल्यामागे नेहमीं असायचीच," तिसरे मुंबईकर म्हणाले, "पण तेवढ्यातल्या तेवढ्यात एका दिवसासाठीं सवड काढायची, दुसरें काय? शहरातल्या लोकाना तर आपलीं व्याख्यानें ऐकायला नेहमीच मिळतात. त्याना एक दिवस नाहीं आपलं व्याख्यान ऐकायला मिळालं तर त्याचा काहीं विशेष तोटा होणार नाहीं. खेडेगावच्या लोकासाठीं एवढी तसदी आपण घेतलीच पाहिजे—"

"तें सगळं खरं," मी वेडेंवाकडें तोंड करीत म्हणालों, "पण मला मुंबई-बाहेर जायला ह्या महिन्यात मुळीं वेळच मिळणार नाहीं. त्याला मी तरी काय करूं?"

"आता तुम्हीं असं म्हटल्यावर आमची कंबरच मोडली, नाहीं का?" आपल्या ग्रामस्थ बंधूंकडे पाहात गणपतराव म्हणाले. सगळ्यानीं त्याच्या म्हण-ण्याला होकार देऊन कबरा मोडल्याचा अभिनय केला. "म्हणजे गावाला परत जायची आता आम्हाला सोयच नाहीं राहिली. गावकरी पायतणानंच आमचीं थोबाड फोडतील!"

"असं नका करूं, साहेब!" दुसरा एक जण अगदीं पायां पडल्याचा अभि-नय करून म्हणाला, "आम्ही एक दिवसापेक्षां जास्त तुमचा वेळ मुळींच घेणार नाहीं. तुम्ही इथून रविवारीं रात्रीं दहाला निघा. सोमवारीं सकाळीं दहाला तुम्ही आमच्या गावांत पोचाल. जेवण झाल्यावर दोन तास खुशाल विश्रांति घ्या. संध्याकाळचं व्याख्यान झालं तुमचं कीं तुम्हाला साडेसाताच्या गाडीनं

बसवून देतों, कीं मंगळवारीं सकाळीं सात वाजतां पुन्हा इथं आपले परत!"

"नाहीं तर, तुम्ही म्हणत असाल तर इथून तुम्हांला स्पेशल मोटारनं घेऊन जाण्याची आम्ही व्यवस्था करतों." तिसऱ्या गृहस्थानें सुचविलें.

"विमानाची सोय असती तर आम्ही विमानानें देखील तुम्हांला घेऊन गेलों असतों!" चौथा मोठ्यानें हसून म्हणाला. त्याला सर्वांनीं खदखदा हसून साथ दिली.

"पण काय वाटेल तें झालें तरी आम्ही तुम्हांला घेऊन जाणारच!" समेवर येऊन गणपतरावांनीं आपल्या माडीवर जोरानें थाप मारली.

इतक्यांत दाराची घंटा जोरानें वाजली. आणि कोणा तरी दोन गृहस्थाना घेऊन नोकर आत आला.

दिवाणखान्यात बसलेल्या माणसाकडे दुर्लक्ष करावयाला ही चांगली संधि आहे, अशा भावनेनें मीं आलेल्या गृहस्थापैकीं एकाला डोळ्यानी खुणावून विचारलें, "काय हो, कां आलात?"

"यंदा गणपतीच्या उत्सवात तुमचा कार्यक्रम ठेवावा अशी आमच्या चाळीं-तल्या सर्व लोकांची इच्छा आहे." तो बोलूं लागला.

त्याला मध्येंच थांबवून मी म्हणालो, "गणपतीला अजून पुष्कळ अवकाश आहे. पुढें बघू. पुन्हा केव्हां तरी मला ऑफिसात भेटा, नाहीं तर पत्र टाका."

तेव्हा तो गृहस्थ पुढें काहीं न बोलतां नमस्कार करून तसाच निघून गेला. पण त्याच्याबरोबर आलेला दुसरा गृहस्थ मात्र तसाच रेंगाळत मागे राहिला. तेव्हां मीं आश्चर्यानें त्याला विचारलें, "काय हो, आपलं काय काम?"

तेव्हा तो माणूस अर्धवट दात विचकून म्हणाला, "मी इथं एक पत्र ठेवून गेलों होतों परवां. आपण वाचलच असेल. आज रात्रीं आमच्या क्लबचें नाटक आहे. आपण अध्यक्ष आहांत. तेव्हां आपल्याला आठवण करून द्यायला आलो होतों."

"तुमच्या क्लबच्या नाटकाचा मी अध्यक्ष आहें?" घेरी आल्यासारखे डोळे फिरवीत मी म्हणालों, "मला माहीत नाहीं."

"आपल्याकडून पत्राच उत्तर आल नाहीं म्हणून आम्हीं गृहीत धरल कीं आपणाला आमची विनति मान्य आहे." त्या गृहस्थानें अगदीं सरळ माझ्या-वर चाल केली.

"हें पाहा, मला तुमचा क्लबही माहीत नाहीं आणि नाटकही माहीत

नाहीं," मी चिडून म्हणालो. "अन् शिवाय आज रात्रीं मला वेळही पण नाहीं—"

"पण तुम्ही आलां नाहींत तर लोकाची फार निराशा होईल," तो गृहस्थ लोचटपणें मध्येच उद्गारला.

"होऊ द्या लोकाची निराशा झाली तर—" मी माघार न घेतां बोललो, "लोकाच्या सर्वच आशा सर्वकाळीं पूर्ण झाल्या पाहिजेत असं थोडच आहे?"

"पाच मिनिटं येऊन गेलां तरी चालेल," त्या गृहस्थानीं शेवटचा खडा टाकून पाहिला.

त्याच्याशी फार हुज्जत घालण्यात अर्थ नाहीं, असा विचार करून मी म्हणालो, "ठीक आहे. जाईन डोकावून मी कुठल्या तरी अंकाच्या मधल्या सुट्टीत."

तो गृहस्थ खूष होऊन निघून गेला. मी समोर बघू लागलों.

दोन संकटें मीं कशींबशीं टाळली. पण 'काळभैरवनाथा'च्या जत्रेचें जे संकट आधींपासून मला वेढा घालून बसलें होतें, ते काहीं टळलें नव्हतें. उलट ते गळयांत पडण्याच्या अगदीं बेतात आलें होतें.

"मग आमच काय ठरलं?" गणपतरावानीं आपला तगादा पुन्हा निकरानें सुरू केला.

"अहो, आपलं काय ठरायचय? आपलं ठरलंच!" एका मुंबईकरानें माझ्या वतीनें परस्पर उत्तर देऊन टाकलें.

"रविवारीं साहेबाना घेऊन जायला तुम्ही आपला माणूस पाठवा अन् त्याना खुशाल घेऊन जा." दुसऱ्या मुंबईकरानें त्याला साथ दिली.

"चला, उठा!" तिसरा मुंबईकर आणखी पुढें जाऊन म्हणाला, "साहेबाच्या पाठीमागे सत्रा हजार कामं. त्याना डोक खाजवायला वेळ नाही. अन् आपण कशाला त्यांचा वेळ घ्या!—"

त्याबरोबर सगळे एकदम उठले.

गणपतराव म्हणाले, "मग आम्ही आज जातो संध्याकाळीं, अन् ह्या किशाला ठेवून जातो इथ तुमच्यासाठीं."

"तुम्ही खुशाल जावा! मी अगदीं नक्की साहेबांना घेऊन येतो!" स्वयंसेवकाचा खादीचा मळकट गणवेष घातलेला खप्पड गालांचा किशा मोठ्या उत्साहानें किंचाळला.

मला निसटायला त्यांनीं कुठें फटच ठेवली नाहीं. दिवाणखान्यांतून बाहेर जाता जाता त्यापैकीं एकजण आठवण झाल्यासारखा चेहरा करीत मागे वळून म्हणाला, "अन् बरं का साहेब, आमच्या गावांतल्या मुलानीं बंगाल फंडासाठीं तुमच एक नाटक करायचं ठरवलं आहे."

"अरे, त्याची कशाला परवानगी मागायची आहे?" मुंबईकरानें बोलायची तेवढीसुद्धा संधि गमावली नाहीं. "साहेबानीं आपलं नाटक करायची साऱ्या जगाला मुळीं परवानगीच देऊन टाकली आहे—"

त्याच्याकडे दुर्लक्ष करून मी शातपणें म्हणालों, "परवानगीबद्दल तुम्हाला पंचवीस रुपये द्यावे लागतील—"

"पण बगाल फडासाठी नाटक आहे, साहेब." पहिला माणूस म्हणाला.

"बंगाल फंडाला मीं तुमच्या आधीं मदत केली आहे. तुम्हाला करायची असेल तर तुम्ही करा. तेवढ्यासाठीं माझ्या खिशात पुन्हा तुम्ही कशाला हात घालताहांत!" मी किंचित् चिडून म्हणालो.

इतक्यात पुढें गेलेले गणपतराव मागे वळून आत आले आणि म्हणाले, "असं करा साहेब, तुम्ही या वेळेला आम्हाला फुकट परवानगी द्या. दुसऱ्या वेळेला आम्हीं तुमचं नाटक केलं तर पचवीस काय पन्नास रुपये आम्ही देऊं तुम्हाला."

"हो साहेब!" बाकीच्या सगळ्या ग्रामस्थानीं अगदी 'कोरसा'त होकार दिला.

"बरं आहे—तुम्ही म्हणता तर—"

ओठातल्या ओठात मी अर्धवटपणें पुटपुटलो. 'काळभैरवनाथ'वाले खूष झाले आणि मला नमस्कार करून निघून गेले.

'टाइम्स' वाचायचा तसाच राहिला होता. आठवड्याच्या लेखाचा आरंभ त्या दिवशीं करायचें मीं ठरविलें होतें, पण सकाळ तर जवळजवळ सगळी संपून गेली होती. 'लोक' या सामान्य नामाला मनातल्या मनात काहीं तरी शिव्या पुटपुटत मी डोक्यांत असलेल्या काहीं विचाराचीं सूत्रे गोळा करूं लागलों, तोंच पोस्टमननें दार खडखडावले. एक मनिऑर्डर येणार होती ती आली असावी या आशेनें मीं दार उघडलें. पण पत्र किंवा मनिऑर्डर यापैकीं काहींच घेऊन पोस्टमन आला नव्हता. मीं विचारलें, "काय?"

अगदीं लाडिकवाण्या आवाजांत पोस्टमन म्हणाला, "आज आपला सिनेमा

लागलाय त्या ह्या थेटरांत. पास पाहिजे होता."

"किती माणसाचा?" मीं निर्विकार मुद्रेनें विचारलें.

"चार!" हाताचीं चार बोटें उडवीत पोस्टमन उद्गारला.

टेबलावर पडलेल्या कागदाचा एक कपटा फाडून त्यावर 'चार माणसाचा पास' मीं घाईघाईनें खरडला आणि पोस्टमनच्या हातात टाकून दार एवढ्या मोठ्यानें लावलें कीं म्हटलें त्यापासून त्याला काहीं बोध व्हावा. त्या पोस्टमनला काय वाटलें कुणाला ठाऊक? दार बद असल्यानें मला काहीं त्याचा चेहरा पाहावयास मिळाला नाही.

रविवार उजाडावयाला काहीं फार दिवस लागले नाहींत. किशानें तर सकाळ-पासून येऊन घरात मुक्काम ठोकला. रविवारीं संध्याकाळीं परगावला जावयाचें या विचारानें मी सकाळपासून अगदीं अस्वस्थ होऊन गेलो. त्यामुळें त्या विश्रातीच्या दिवसाचें अगदीं वाटोळे होऊन गेलें. मनाला थोडीशी काहीं तरी उसंत मिळाली असती, पण किशा यमदूतासारखा दिवसभर समोर वावरत होता. आणि मधून मधून आपल्या गावचें 'राजकारण' मिटक्या मारीत मला वर्णन करून सागत होता.

रात्रीं नऊ वाजता मीं नोकराला टॅक्सी बोलवायला सागितली. सुतळीनें करकचून आवळून बाधलेली एक छोटीशी वळकटी खाद्यावर भिरकावीत किशा माझ्या अगोदर टॅक्सींत जाऊन बसला आणि स्टेशनावर गाडी थाबताच उडी मारून माझ्या आधी बाहेर पडला.

"तिसऱ्या क्लासात लई गर्दी होते. मी जाऊन माझी जागा पकडतो. तुम्ही तिकीट काढून आपल्या डब्यात बसा. मीही आलोच." असें घाईघाईनें बोलून किशा स्टेशनाबाहेर अंधारात आणि गर्दीत एकदम अदृश्य झाला. मला त्याला जे काहीं सागायचें होतें तें तसेंच माझ्या तोंडात राहिले.

टॅक्सीवाल्याला पैसे देऊन मी सेकड क्लासचें तिकीट काढलें आणि प्लॅट-फॉर्मवर जाऊन गाडीची वाट पाहात बसलो. गाडी उशिरानेंच आली आणि जी आली ती अगदीं भरून आली. अंधारात सेकंड क्लासचा डबाही मला सांपडेना. शेवटीं गाडी सुटायच्या आधीं एक मिनिट एका डब्यांत मला वरची जागा कशीबशी मिळाली. किशाचा तर पत्ताच नव्हता. मी वर चढून माझी वळकटी सोडतों आहें तोंच गाडी सुरू झाली.

अर्धा-पाऊण तास झाला तरी मला कांहीं झोप येईना. खाली झोपलेल्या

माणसाला "दिवा विझवूं का?" म्हणून विचारलें. तो म्हणाला, "असूं द्या कीं!" माझ्या वजनानें वरचा बर्थ तुटून आपल्या अंगावर पडणार या भीतीनें तो भेदरून गेल्यासारखा मला दिसला. तेव्हा जें काहीं व्हायचें तें उजेडांतच झालेलें बरें या विचारानेंच दिवा विझवायला तो कबूल झाला नसावा.

'सार्वजनिक जीवनामुळें माणसाच्या आयुष्याची होणारी परवड' या विषयावरील निरनिराळ्या मुद्द्याचा स्वतःच्या मनाशीं विचार करीत असतां केव्हां मला झोप लागली ते कळलेंच नाहीं. पहाटे पाच वाजायच्या सुमारास कुठल्या तरी एका लहानशा स्टेशनावर गाडी थाबली होती. मला एक भयंकर स्वप्न पडत होते.

आमचे एक लहानपणचे मारके मास्तर माझ्या हातावर सपासप छड्या मारून विचारीत होते, "जाशील का पुन्हा व्याख्यानाला—जाशील?" आणि मी मोठमोठ्यानें किंचाळ्या मारून त्याना सागत होतों, "नाहीं—आता नाही जाणार!" इतक्यात किशानें डब्याचें दार जोरजोरानें खडखडवायला सुरुवात केली. मी दचकून जागा झालो. आणि घाईघाईनें खाली उतरलो.

"साहेब, आलें स्टेशन, उतरा लौकर. नाहीं तर गाडी सुटेल!" डब्याला जणुं काहीं आग लागली आहे अशा स्वरात किशा बाहेरून ओरडत होता. मी माझें सामान घाईघाईनें बाहेरच्या अंधारात फेकून दिलें आणि डब्यातून प्लॅट-फॉर्मवर उडी मारली.

बाहेर अजून चागलाच अंधार पसरला होता. दोनतीन माणसें डोक्यावरून आणि अंगावरून उपरणीं घेऊन कुडकुडत उभीं होतीं. मी तो 'मी'च आहे अशी त्यापैकीं एकानें खात्री करून घेतली. आणि आपल्या उपरण्याखालून वाळलेल्या शेवतीचा एक सुकलेला लहानसा एकपदरी हार झटकन् बाहेर काढला अन् घाईघाईनें माझ्या गळयात घालून तो किरट्या आवाजानें ओरडला, "महात्मा गाधी की जय!"

मी रागावून म्हणालो, "महात्मा गाधींचा इथें काय संबध?"

तेव्हा त्यानें चटकन् खुलासा केला, "काहीं तरी ओरडाया पाहिजे, नगं का?" त्या प्रश्नानें मी निरुत्तरच झालों.

मला जिथें जायचें होतें तें गांव स्टेशनापासून दहापधरा मैल दूर होतें. किशानें हार घालणाऱ्या माणसाला दरडावून विचारलें, "शिरपतराव, रामलालची मोटार घेऊन आलात ना?"

शिरपतराव विव्हळत विव्हळत म्हणाले, "अहो, कसची मोटार अन् काय घेऊन बसला आहात राव? आठ दिवस झाले, रामलालची मोटार 'पञ्चर' होऊनशान पडली आहे. तवा पाटलाची गाडी घेऊनशान आलों. या विमाना-मोटारींचा कुठं काय भरंवसा असतो व्हय राव? आपली पहिली बैलाची गाडी आहे तीच खरी!"

"अन् गावाबाहेरून बावन बैलाच्या गाडींतून मिरवणूक काढायचं काय झाल?" किशानें पुन्हा दुसरा प्रश्न केला.

"अन् ते कशाच जमायचय आता?" शिरपतराव आपल्या विव्हळण्याचा सूर अधिक वाढवून म्हणाले, "त्यो लाळचा रोग झालाय ना समद्या बैलाना!"

पाटलाची गाडी जुपून स्टेशनावरून निघायला चागले आठ वाजले. गाडीला तट्टया नव्हता. आत चौघेजण दाटीवाटीनें कसे तरी आम्ही बसलो. खालून गाडीचे एकसारखे धक्के खात आणि वरून उन्हाचे चटके सोशीत आम्ही अकरा वाजायच्या सुमारास कसेबसे एका गावठाणात येऊन पोहोचलो.

सकाळपासून माझ्या पोटात काहीं नव्हते. आणि त्यात वरून उन्हाचा मारा. त्यामुळें माझा जीव अगदीं कासावीस होऊन गेला. गावाच्या बाहेर एक पिपळाचा पार होता. त्यावर दहावीस माणसें डोक्यावर उपरणीं पाघरून आमची वाट पाहात बसली होतीं. त्यात मला पूर्वी भेटलेले गणपतराव आणि त्याच्या-बरोबर आलेली काहीं माणसें याचे चेहरे मीं ताबडतोब ओळखले.

"काय व्यवस्थित झाला ना सगळा प्रवास?" सस्मित मुखानें माझे स्वागत करीत गणपतराव म्हणाले, "या, या, भाऊ या. असे मागे का?"

आपल्या पडक्या दाताचें प्रदर्शन करीत एक पाढऱ्या केसाचे 'बुटकेले आणि काळगेले' गृहस्थ हात जोडीत पुढें आले. मला चिठी लिहिणारे रामभाऊ कुलकर्णी वकील ते हेच हें मीं ताबडतोब ओळखलें.

"का, आता तरी ओळख पटली का आमच्या रामभाऊची?" गणपत-रावानीं मला विचारलें. पण मीं उत्तर द्यायच्या आधींच रामभाऊंनीं ताबडतोब खुलासा केला, "माझाच त्या बाबतींत थोडासा गैरसमज झाला. हे नाही, याचे थोरले बंधु माझ्या वर्गात होते."

"मला थोरले बंधु नाहींत—मीच थोरला!" मीं थंडपणें म्हणालो.

पण रामभाऊंच्या चेहऱ्यावर त्याचा काहींच परिणाम झाला नाहीं. "असं, असं—म्हणजे ते तुमचे थोरले बधु नव्हेत का? आम्ही तर त्यांना तुमचे थोरले

बधूच समजत होतों." प्रसंगावधान राखून रामभाऊंनीं सरळ सारवासारव केली.

माझ्या मुक्कामाची व्यवस्था अर्थात् रामभाऊंच्या घरांत केली होती हें सांगावयाला नकोच! एका अरुंद नि अंधाऱ्या बोळात आणि एका पडक्या खिडाराजवळ रामभाऊचा 'वाडा' होता. रामभाऊच्या घरांत पाऊल टाकलें नाहीं तोंच त्याच्या निरनिराळ्या वयाच्या आणि निरनिराळ्या उंचीच्या सात-आठ पोराचा माझ्याभोवतीं गराडा पडला. 'हेच बरं का ते!' असें गंभीर चेहऱ्यानें आणि अर्थपूर्ण नजरेनें रामभाऊ प्रत्येकाला सांगत होते. मी येण्यापूर्वी आपल्या पोराजवळ रामभाऊंनीं माझी काय बदनामी करून ठेवली होती, याचा मला त्याच्यापैकीं कोणाच्याही चेहऱ्यावरून थागपत्ता लागेना.

आठ वर्षाखालचीं मुलें एकादा 'बाऊ' पाहावा तशा भेदरलेल्या मुद्रेनें माझ्याकडे पाहात होतीं, तर बारा वर्षाच्या वरचीं मुलें सर्कशींतल्या पिजऱ्यामधल्या वाघाकडे ज्या आदरानें पाहतात तशा दृष्टीनें मला न्याहाळत होतीं.

"चिमे, तुझ ते पहिलीच पुस्तक यानीच लिहिलय बरं का!" रामभाऊ आपल्या सातआठ वर्षांच्या 'चिमी' नामक कन्यारत्नाला उद्देशून म्हणाले. चिमी आपल्या परकराचा सोगा दातात चावीत माझ्याकडे अचंब्यानें पाहूं लागली. जणुं काहीं पहिलीचें पुस्तक म्हणजे 'ज्ञानेश्वरी' किंवा 'भगवद्-गीता'च होती.

सकाळपासून मी शौचालाही गेलों नव्हतों किंवा तोडही धुतलें नव्हतें. त्यामुळें शरीराच्या अन्तर्विभागातून असे काहीं चमत्कारिक संदेश माझ्या मेंदूपर्यंत चढत होते कीं, त्याचें शब्दानीं वर्णनही करता येणें शक्य नव्हतें.

कानाभोवतीं बोट फिरवीत केविलवाणा चेहरा करून अखेर मी रामभाऊंना म्हणालो, "मला जरा—ह्याला जाऊन यायचें आहे."

रामभाऊ एका पोराला हाक मारून म्हणाले, "सद्या, अरे आतून तांब्या भरून आण." आणि नंतर विश्वामित्रासारखा हात उच करून अनुनासिक स्वरात ते हलकेच मला म्हणाले, "पलीकडच्या परड्यात जा. हवी तितकी जागा आहे. कुटंही बसा!"

हातांत ताब्या घेऊन मी परड्याकडे जाऊं लागलों. तशीं रामभाऊंचीं दोन-चार मुलें माझ्यामागून येऊ लागली. डोळे वटारून जेव्हां मीं त्याच्याकडे पाहिलें, तेव्हां तीं मागल्यामागे पसार झालीं.

एका पडक्या भिंतीच्या आडोशाला जागा हेरून मी बसलों; तों पलीकडून हातभर लांबीचा एक करंगळीएवढा जाड असा साप सळसळ करीत कोपऱ्यांतल्या बिळात शिरला. त्या वेळेला माझी अशी घाबरगुडी उडाली म्हणतां! मग कसली शौचाला अन् कसलं काय?

सर्व आटोपून परत आल्यानंतर रामभाऊंच्या एका पोरानें 'आंघोळीची तयारी आहे' असें नाकांतला शेंबूड फर्रकन वर ओढीत फर्मावलें. मी चोळणा नेसणारा. मजजवळ धोतर नव्हतें. तेव्हां रामभाऊचेंच एक जुनेरें नेसून मी अंगणात उघड्यावर एक बादलीभर गरम पाण्यानें आंघोळ केली.

रामभाऊच्या त्या जुन्या धोतराला केऱ्याच्या चिकाचे काळे नि तांबडे डाग ठिकठिकाणीं पडलेले होते. आणि डिकेमालीचा त्याला असा कांहीं उग्र वास येत होता कीं कांहीं विचारूं नका! माझ्या आंघोळीचें काम मी व्यवस्थित रीतीनें करतो आहें किंवा नाहीं यावर देखरेख करण्यासाठीं रामभाऊच्या मुलाबाळाची पलटणच्या पलटण माझ्यासमोर उभी होती. आणि 'तिथ कोरडं राहिलय्' 'ते भिजलं नाहीं' असें त्यापैकीं काहींजणें बोटें रोखून मधूनमधून ओरडत होतीं.

आंघोळ संपतांच गणपतराव आणि त्याचे सहकारी मला बोलवायला आले.

"वाचनालयाचा आणि तालमीचा समारंभ आतांच उरकून घेऊं," गणपतराव म्हणाले, "म्हणजे दुपारीं त्याचा त्रास नको!"

'काळभैरव' मोफत वाचनालयाचा उद्घाटन समारंभ गांवच्या चावडींत भरविण्यात आला. समारंभाला गांवांतील दहावीस प्रौढ माणसें आणि मराठी शाळेंतलीं पाचपचवीस पोरें होतीं. गणपतराव त्या वाचनालयाचे सेक्रेटरी होते.

"आजच्या अध्यक्षाची आपल्याला ओळख करून द्यायची म्हणजे सूर्याची ओळख एखाद्या काजव्यानें करून देण्यासारखे आहे," गणपतरावांनीं आपल्या प्रास्ताविक भाषणांत ओरडून सांगितलें. "त्याचें भाषण ऐकून हसून हसून तुमचीं पोटें फुटल्यावांचून राहणार नाहींत."

त्याबरोबर मराठी शाळेंतल्या सर्व मुलांनीं आपापलीं पोटें हातांनीं गच्च आवळून धरली आणि ओठ घट्ट मिटून 'बघूं तुम्ही आमचीं पोटें कशीं फोडतां तें' अशा आव्हानपूर्वक दृष्टीनें तीं माझ्याकडे पाहूं लागलीं. "ह्या वाचनालयाला अध्यक्षानीं सक्रिय मदत करण्याचें कबूल केलें आहे" असें गणपतरावानीं दडपून आपल्या भाषणाच्या शेवटीं जाहीर केलें.

श्रोतृवृंदाच्या बुद्धीचा वकूब आणि त्याच्या चेहऱ्यावर चमकणारें शहाणपणाचें तेज लक्षात घेऊन मी माझे भाषण पाच-दहा मिनिटातच कसेबसे संपविले, आणि खिशातून एक दहा रुपयाची नोट काढून टाळ्याच्या गजरात ती गणपतरावाच्या हवाली केली. त्यामुळें गणपतरावाना आणखी स्फुरण चढले. आणि ते एकदम उठून ओरडले, "अध्यक्षानीं आपलें साप्ताहिक पत्र वर्गणी न घेता पाच वर्षेपर्यंत आमच्या वाचनालयाला फुकट पाठवून देण्याचें कबूल केले आहे." श्रोत्यानी टाळ्याचा प्रचंड कडकडाट केला, तेव्हा गणपतरावाच्या घोषणेला मान हलवून समति देणें मला भागच पडलें.

तालमीचा दगड बसविण्याचा समारंभ शेजारीच होता. तेव्हा वाचनालयाचा समारभ आटोपताच तेथल्या सर्व सामानासह व श्रोत्यासह आम्ही त्या जागी स्थलातर केलें. तो समारभ तालमीचा आहे, हें सूचित करण्यासाठीं लाल सदरा घातलेला, सुजलेल्या कानाचा आणि आडमाप आकाराचा एक पहिलवान आधीपासून आणून त्या ठिकाणीं बसविण्यात आलेला होता.

मी गणपतरावाना विचारलें, "का हो, इथें पाया खोदलेला दिसत नाहीं, नि तालमीच्या इमारतीचा दगडही पण दिसत नाहीं!"

तेव्हा गणपतराव हसून म्हणाले, "तें आम्ही सर्व मागाहून करणार आहोत. आज तुम्ही आपल्या भाषणात ह्या ठिकाणी पायाचा दगड पुढ बसवला जाणार आहे, एवढं जाहीर करून टाका म्हणजे झाल!"

वाचनालयाच्या समारंभात गणपतरावानीं जें भाषण केलें तेंच तालमीच्या समारंभातही केलें व 'तालमीच्या इमारतीला अध्यक्षाकडून सक्रिय मदत होईल' अशी बळकट आशा व्यक्त केली.

मी माझ्या भाषणात म्हणालों, "माझा आणि तालमीचा किंवा 'तालीमबाजी'चा काहींएक संबंध नाहीं. लहानपणीं माझ्या घरासमोर एक तालीम होती इतकेंच काय तें! माझ्या आकारावरून तुमचा काहीं तरी गैरसमज झालेला दिसतो आहे. वास्तविक पाहता कोणत्याही इमारतीच्या पायाचे दगड बसविण्याचें काम हें कॉग्रेस सरकारच्या मंत्र्याचें असताना त्याच्या हक्कावर अतिक्रमण करून तुम्हीं मला इकडे बोलाविलें हें काहीं तुम्हीं बरें केलें नाहीं. आता या ठिकाणीं हे जे गृहस्थ तुम्हाला बसलेले दिसत आहेत त्या ठिकाणीं तालमीच्या पायाचा एक भलाभक्कम दगड बसवलेला आहे, असेंच तुम्हीं समजावें."

त्याबरोबर सारे श्रोते आनंदानें टाळ्या वाजवूं लागले. माझ्या शब्दांचा अर्थ ध्यानात न आल्यानें तो पहिलवानही हसून टाळ्या वाजवूं लागला.

भाषण संपण्यापूर्वी पुन्हा आणखी एक दहा रुपयाची नोट मीं गणपतरावांच्या स्वाधीन केली. सर्व समारभ आटोपून मुक्कामाला यावयाला एक वाजून गेला. उन्ह डोक्यावर इतकें तापलें होतें कीं काहीं सागता सोय नाहीं. जीव मधून मधून अगदीं घाबरा होत होता माझा.

एक फाटका जाळीदार मुकटा नेसून माझी वाट पाहात रामभाऊ पडवींत उभे होते. "या! आता जेवण करून खुशाल एक झोप काढा! पाच वाजेपर्यंत तरी तुम्हाला आतां काहीं काम नाहीं." रामभाऊंनीं मला आश्वासन दिलें.

जेवता जेवता रामभाऊ अनेक विषयांवर बचावचा बोलत होते. पण माझें त्याच्या बोलण्याकडे मुळींच लक्ष नव्हतें.

"आमच्या सौभाग्यवतीही कविता करतात बरं का!" रामभाऊ मध्येंच एकदम म्हणाले. सीताबाईनीं वाढता वाढता एवढ्या जोरानें मुरका मारला कीं त्याच्या हातातलें वरणाचें पातेलें खाली पडतें कीं काय असे मला वाटले.

एक मोठा ढेकर देत रामभाऊ आपल्या बायकोबद्दल म्हणाले, "गाधीजींच्या मरणावर तिनं एक अशी फर्मास कविता केली आहे कीं, ती तुम्हीं स्वतःच ऐकली पाहिजे. गाधीजी वारल्यानतर आमच्या गांवात जी एक मोठी सभा भरली होती, तींत तिनें स्वतःच ती वाचून दाखविली. अन् काय सागावं साहेब—" रामभाऊ मोठ्या कौतुकानें मिटक्या मारीत सांगूं लागले, "सारी सभा कीं हो ढळढळा रडायला लागली!"

"शक्य आहे!" असें म्हणून मीं आमटीचा भुरका मारला. तोंच त्यातला लाल मिरचीचा माझ्या जिभेला असा काहीं चटका बसला, कीं माझ्या डोळ्यात टचकन् पाणी उभे राहिलें. त्याचा रामभाऊंच्या मनावर इष्ट तो परिणाम झाला. मुकट्याच्या टोकानें आपले डोळे पुशीत ते म्हणाले, "काहीं म्हणा, पण गाधी हा फार मोठा माणूस होऊन गेला."

रामभाऊसारख्यानें ज्याअर्थी गांधीजींना एवढें सर्टिफिकेट दिलें, त्याअर्थी गाधी हा खरोखरच कुणी तरी मोठा माणूस होऊन गेला असेल अशी माझी मनोमन खात्री पटली.

जेवण झाल्यानतर वळकटी अंथरून मी तिजवर कुठें कलंडतों आहें, तोंच रामभाऊंचा वंशवेल पुन्हा माझ्याभोवतीं वेढा घालून बसला. झाडून सगळ्यांनीं

आपापल्या शाळेंतील वह्यांवर किंवा कागदाच्या तुकड्यांवर माझ्या स्वाक्षऱ्या घेतल्या. बंड्यानें आपल्या वर्गाच्या हस्तलिखितावर माझा अभिप्राय घेतला. सद्यानें 'यंदाच्या गणपतीच्या मेळ्यासाठीं विनोदी संवाद लिहून द्या' असा तगादा लावला. यमीनें 'मला आवडणारें पुस्तक' या तिच्या वर्गाच्या बाईनें लिहावयास सागितले त्या निबंधाचे मुद्दे माझ्याकडून लिहून घेतले आणि महाद्यानें 'लोकसत्ते'मधलें चालू आठवड्याचें कोडें माझ्याकडून सोडवून घेतलें.

इतकें होतां होतां पांच वाजले. व्याख्यानाचें बोलावणें घेऊन किशा आणि त्याचे चारपाच स्वयसेवक आले. कपडे करून मी, रामभाऊ, सौ. सीताबाई आणि वाटेंत आम्हाला येऊन मिळणारे दहावीस लोक असे आम्ही पायीं चालत चालत काळभैरवनाथाच्या देवळाकडे गेलों.

देवळासमोरच्या उघडया पटागणात दोनचार हजार लोकांची जत्रा भरली होती. निरनिराळया दुकानाचीं पालें औंडक-चौंडक पडलेलीं होतीं. दोनतीन रहाटगाडगीं मोठमोठयानें कराकरा आवाज करीत फिरत होतीं. आणि त्याच्या पाळण्यांत बसलेले लोक मोठमोठयानें ओरडत होते. एका बाजूला एक पोताड्याचा फड बसला होता. तर दुसऱ्या बाजूला कोणीतरी एक दाढीवाला बाबाजी एकतारीवर भजन करीत बसला होता.

साऱ्या पटागणात एवढा गलगा, गडबड आणि आरडाओरड चालली होती कीं तो बाजार बघून माझी तर कंबरच खचून गेली. कुठून आपण या लचांडात सांपडलों असें मला होऊन गेलें.

"तुमचें एकदां व्याख्यान सुरू झालें म्हणजे हें सगळें एकदम शात होईल!" माझ्या चेहऱ्यावरून माझ्या मनात काय विचार चालले असावेत याचा कयास बांधीत रामभाऊ म्हणाले.

एका वडाच्या झाडाखालीं लाकडाच्या फळ्यांचें व्यासपीठ बांधून तयार केलें होतें. शें-दोनशें माणसें व्यासपीठाभोवतीं विरळ वर्तुळ करून बसलेलीं होतीं.

मी गणपतरावांना जरा टोचून म्हणालों, "तुम्ही तर बोललां होतां कीं व्याख्यानाला दहावीस हजाराची गर्दी होईल म्हणून—"

"दरवर्षी होते. विचारा याना. काय हो, ग्यानबा?" आपल्या शेजारच्या एका माणसाचा दंड हालवून गणपतराव म्हणाले, "यंदा काय झालंय कोणास ठाऊक. रुपयांत दोन आणे गर्दी नाहीं!"

"त्या लाळंचा रोग झालाया ना जनावरांना !" ग्यानबानीं यंदा जत्रा कां कमी त्याजवर आपल्या अकलेप्रमाणें प्रकाश टाकला.

"किशा, अरे जा अन् आणखी एकदां दवंडी पिटून या. म्हणावं, व्याख्यानाला सुरुवात झाली." गणपतराव किशाच्या अंगावर खेकसून ओरडले.

त्याबरोबर किशा "बघता काय ? जा ना !" असें आपल्या स्वयसेवकांच्या अंगावर ओरडला. पण आपल्या जागेवरून तोही हलला नाहीं आणि त्याच्या हाताखालचे स्वयसेवकही हलले नाहींत.

होता होता तास दीड तासानें आणखी शें-दीडशें माणसें जमा झालीं. आणि मग सभेच्या कामाला सुरुवात झाली. कुस्त्या, बोथाटी, लेजीम इत्यादि आरंभींचे कार्यक्रम झाले आणि मी व्याख्यानाला उभा राहिलो. तेव्हा सात वाजून गेले होते. चोहोकडे अंधार पडला होता. आणि आजूबाजूचा गलगा पराकाष्ठेचा वाढलेला होता.

आजपर्यंत आयुष्यात मीं नाना तऱ्हेच्या सभापुढें व्याख्यानें दिलीं होतीं. पण त्या दिवशींची सभा बघून माझी तर अगदीं दातखिळी बसली. मी बोलायला सुरुवात करणार तोच शेजारीं बसलेले रामभाऊ हळूच पुटपुटले, "आज मजा आली पाहिजे, बरं का !"

रामभाऊंच्या टाळक्यावर चांगली एक थप्पड मारावी असें मला त्या वेळीं वाटलें. एक तासभर माझ्या तोंडाला येईल तें मी गुरासारखा ओरडत होतों. मी काय बोलत होतो तें मलाही कळत नव्हतें आणि श्रोत्यानाही पण समजत नव्हतें. तरी पण ते मधूनमधून टाळ्या वाजवीत होते.

भोवतालचा खकाणा माझ्या नाकातोडांत उधळत असल्यानें मी मधूनमधून जोरानें खोकत होतो. तो माझा 'विनोद' आहे अशा समजुतीनें कांहीं श्रोते मोठमोठ्यानें हसत होते. माझें व्याख्यान संपवून स्वतःला आणि श्रोत्यांना शिव्या देत मी खालीं बसलों तेव्हां साडेआठ झाले होते.

रामभाऊना मी म्हणालो, "आतां मला काहीं जेवायच नाहीं. सरळ मला आतां स्टेशनावर पोहोचवा !" जसें कांहीं आपल्याला यांतलें कांहींच माहीत नाहीं असा चेहरा करीत रामभाऊ म्हणाले, "म्हणजे ? आतां तुम्ही जाणार ? मला वाटलं, इतक्या लांब आल्यासारखे दोनतीन दिवस तरी राहाल. आमच्या येथून चारपांच मैलांवर पांडवलेणीं आहेत. तीं पाहण्यासारखीं आहेत—"

'पांडवलेणीं गेलीं खड्डयांत !' असें मनांतल्या मनांत म्हणत मी गणपत-

रावांना म्हणालों, "गणपतराव, काय वाटेल तें झालें तरी आज रात्रीं मला परत मुंबईला गेलेंच पाहिजे!"

"पण मुंबईला जायला आतां गाडी कोणती?—" रामभाऊंनीं शांतपणें विचारलें.

"म्हणजे? मुंबईला जायला आतां गाडी नाहीं?" मीं घाबरून विचारलें.

"नवाची गाडी तर कांहीं आतां सांपडणार नाहीं," गणपतराव म्हणाले. "मघांशींच आपण निघायला पाहिजे होतें. पण तुमच्या व्याख्यानाला रंग भरला. मध्येंच तुम्हाला मला काहीं थांबविता येईना!"

"उद्यां सकाळची आठाची पॅसेंजर नक्की मिळेल तुम्हांला," रामभाऊ मला आश्वासन देत म्हणाले. "अन् तोपर्यंत दुसरी गाडी मुळीं आहे कुठें?"

झालें. निकाल लागला! म्हणजे पुन्हा रामभाऊंच्या घरात जाऊन तेथल्या पोरवड्यात रात्रभर मुक्काम करावा लागणार, या विचारानें माझ्या अंगावर अगदीं शहारे आले. रामभाऊंच्या फाटक्या धोतराचा डिकेमालीचा वास आठवला आणि ओकारी येते आहे असें वाटलें. कुंडलीतल्या ग्रहाना मनांतल्या मनांत शिव्या देत मुकाट्यानें मी रामभाऊबरोबर गेलो.

रात्रीं जेवण झाल्यावर मी सौ. सीताबाईंच्या तडाख्यात सापडलो. असहकारितेच्या मोहिमेपासून तों देशाला स्वातंत्र्य मिळेपर्यंत सर्व राजकीय चळवळींवर त्यांनीं रचलेलें आपलें कवित्व मला आळवून आळवून आणि विव्हळून विव्हळून म्हणून दाखविलें.

शेवटीं गांधीजींच्या मरणावरची ती कविता वाचायला त्यानीं सुरुवात केली. पहिली ओळ त्यानीं उच्चारली तोच त्या हुंदके देऊन मोठमोठ्यानें रडायला लागल्या. रामभाऊंनीं तर हंबरडाच फोडला. आजूबाजूला सतरंजीवर लोळत असलेलीं आणि अर्धवट झोपलेलीं मुलेंही जागीं होऊन किंचाळूं लागलीं. अशा परिस्थितींत आपण न रडता तसेंच स्वस्थ बसून राहिलों तर तें हास्यास्पद दिसेल म्हणून मीही डोळ्यांना हातरुमाल लावून फुसफुसूं लागलों.

गांधीजींवरच्या सीताबाईंच्या कवितेचें वाचन संपण्याच्या सुमारास सांघिक आक्रोशाचा स्वर एवढा वाढला कीं, आजूबाजूच्या घरांतील लोक काहीं तरी भलताच समज होऊन तेथें धावत आले आणि तेही त्या आक्रोशाच्या कार्यक्रमांत सामील झाले. सीताबाईंचें 'काव्य-रुदन' संपावयाला रात्रीचे दोन वाजले.

सकाळीं सहा वाजतां गणपतराव गाडी घेऊन येणार होते. पण बैलाच्या गाडीचा आवाज कानीं पडायच्या ऐवजीं मोटारच्या शिंगाचा आवाज ऐकूं आला. तेव्हां रामलालच्या गाडीचें पंक्चर दुरुस्त झालें असावें अशा समजुतीनें मी धडपडत उठलो.

तो गणपतराव दारांतून माझ्या नांवानें ओरडतच आले, "हे दुनाखे मास्तर आले आहेत साहेब, तुमच्याकडे."

ही काय नवीन बला उपटली आहे या विचारानें डोळे चोळीत चोळीत मी बघूं लागलो. त्या गावापासून पधरा मैलांवर असलेल्या दुसऱ्या एका गावांतील 'ए. व्ही. स्कूल'चे दुनाखे हे हेडमास्तर होते. गणपतरावानीं त्याची माझी ओळख करून दिली. दुनाखे हसून म्हणाले, "मी आपल्या एस. टी. सी. क्लासांतला आपला जुना विद्यार्थी आहें. मुंबईच्या पत्त्यावर मीं आपल्याला एक पत्र पाठविलें होतें. आपल्याला मिळालें नाहीं वाटतें?"

मी म्हणालों, "नाहीं बुवा. कां?"

दुनाखे म्हणाले, "आज आमच्या शाळेचें गॅदरिंग आहे. आणि अध्यक्ष म्हणून मी आपलें नाव जाहीर करून बसलो आहें."

"अहो, पण आत्ताच्या गाडीनें मला गेलें पाहिजे, दुनाखे. वास्तविक कालच रात्रीं जायचा—" अगदीं रडकुडीला आलेल्या मुलाच्या स्वरात मी बोलूं लागलों.

"तें काय वाटेल तें झालं तरी तुम्हीं आज आमच्या समारंभाला आलं पाहिजे, साहेब" दुनाखे तितक्याच रडक्या आवाजांत गयावया करून म्हणाले. "तुम्ही आलां नाहींत तर माझी अब्रू जाईल. तुम्ही समारंभाचीं आमंत्रणें स्वीकारता आणि आयत्या वेळीं येत नाहीं, असा आधींच तुमच्याबद्दल गैरसमज पसरलेला आहे. त्यांत तुम्ही न येण्यानें भर पडेल. आमच्या सोसायटीचे प्रेसिडेंट छातीवर हात मारून म्हणाले, कीं तुम्ही येणें शक्य नाहीं. त्यांच्याशीं मीं दहा रुपयाची पैज मारली कीं काय वाटेल तें झालें तरी मी त्यांना घेऊन आल्यावांचून राहणार नाहीं."

"तेव्हा मी आलों नाहीं तर दहा रुपयांचा तुम्हांला चट्टा बसेल हेंच ना तुमचें म्हणणें?" मीं खिशातून दहा रुपयाची एक नोट बाहेर काढीत म्हणालों.

"तेवढ्यानें भागणार नाहीं, साहेब. कदाचित् मला माझी नोकरी गमवावी लागेल!" दुनाखे डोळ्यांत अश्रु आणून म्हणाले.

आदल्या रात्रीं अश्रूंच्या महापुरांत बुडतां बुडतां मी वांचलों होतों. म्हणून पुन्हा अश्रूंचें दर्शन होताच मीं घाबरून दुनाख्याना एकदम होकार देऊन टाकला. "बरें आहे," मी म्हणालों, "एवढंच असेल तर मी येतों."

"आपल्याला आम्ही यत्किंचितहि तसदी देणार नाहीं. म्हणूनच मोटार घेऊन आलों आहें. समारंभ झाला कीं संध्याकाळच्या गाडीला आपल्याला सरळ स्टेशनावर पोहोचवतों." दुनाखे म्हणाले. त्याच्या डोळयातले अश्रूबिश्रू पार नाहींसे झाले आणि त्यांच्या चेहऱ्याची कळी एकदम उमलली.

"बरं आहे साहेब, येतो." गणपतराव कोपरापासून हात जोडून म्हणाले. "आतां तुम्हांला आम्हीं मास्तराच्या ताब्यांत दिलें आहे. आमच्या जबाबदारी-तून आम्ही सुटलों. असाच दयालोभ ठेवा. अन् पुन्हा कधीं बोलावलें तर या!"

माझ्या जाण्यायेण्याच्या खर्चाचें काय असें मीं गणपतरावांना विचारण्याच्या आधींच स्वारी तडक पसार झाली.

रामभाऊंच्या घरात आदला दिवस जसा गेला, तसाच तो दिवस दुनाखे मास्तरांच्या घरांत गेला. दुनाखे मास्तराच्या पत्राला डिकेमालीचा वास येत नव्हता अन् त्याची बायको कविता करीत नव्हती, एवढाच काय तो फरक. आतां मुंबईला आपण केव्हां पोंचणार याचा विचार करावयाचेंच मीं सोडून दिलें.

दुनाखे मास्तरांच्या शाळेचा समारंभ संपल्यानतर त्यांच्या संस्थेच्या ज्या प्रेसिडेंटनें मी येणार नाहीं अशी दुनाखे मास्तरांशीं पैज मारली होती, त्यांच्या 'जटाशकर टॉकीज'चें उद्घाटन दुसऱ्या दिवशीं रात्रौ त्यानीं माझ्या हस्तें करून घेतलें. "इतक्या लाब तुम्ही आल्यावर तुम्हांला तसे आम्ही थोडेच सोडणार आहोंत?" जटाशंकर परदेशी माझ्या गळयांत प्रेमानें हात घालून म्हणाले. मग माझी काय छाती होती 'नाहीं' म्हणण्याची?

बुधवार रात्रौ सिनेमागृहाचें उद्घाटन झाल्यानंतर गुरुवारीं दुपारीं एक थाटाची मेजवानी देऊन त्या संध्याकाळीं शेटजींनीं मला आपल्या मोटारींतून एका स्टेशनावर आणून सोडलें. शेटजींना काहीं महत्त्वाचें काम असल्यामुळें ते कांहीं मजबरोबर स्टेशनापर्यंत येऊं शकले नाहींत. दुनाखे मास्तरही आदल्या दिवसा-पासून कुठें तरी बेपत्ता झाले होते.

मुंबईपर्यंत तिसऱ्या वर्गानें जाण्याइतकेच पैसे माझ्या खिशांत उरले होते. गुरुवारीं रात्रीं मला कोणत्याही गाडींत जागा मिळाली नाहीं. जी गाडी यायची

ती अगदीं भरून यायची. सबंध रात्र मीं स्टेशनवर तशी कुडकुडत घालविली. घसा बसला आहे, डोळे दुखताहेत, अंग ठणकतें आहे, अशा अवस्थेत शुक्रवारीं रात्रीं साडेदहा वाजतां दादर स्टेशनवर येऊन पोहोंचलों.

बाहेर एक टॅक्सी नव्हती कीं व्हिक्टोरिया नव्हती. हमालाच्या डोक्यावर सामान देऊन मी रखडत रखडत अर्ध्या-पाऊण तासानें घरीं आलो. वाटेनें गणपतराव, रामभाऊ, सीताबाई, दुनाखे मास्तर, जटाशंकर यांना मनांतल्या मनांत काय काय शिव्या दिल्या असतील त्या इथें सागता येत नाहींत.

घरीं येऊन कोचावर मी अंग टाकतों आहें तोंच टेलिफोनची घंटा वाजूं लागली. रात्रीं अकरा वाजता टेलिफोन करणारा हा महात्मा कोण, म्हणून मीं चिडून टेलिफोन घेतला आणि 'कोण आहे?' म्हणून दरडावून विचारलें.

तोंच माझा आवाज ओळखून दुसऱ्या बाजूनें कोणी तरी मोटमोठ्यानें बोललें, "साहेब का? आता इथ त्या ह्याच व्याख्यान होतं. पण ऐन वेळीं ते कांहीं आले नाहींत. तेव्हा तुम्हीं यावं अस लोकाचं म्हणणं आहे. फार नाहीं—अर्ध्या तासासाठीं तुम्ही आलांत तरी चालेल. सगळे लोक खोळंबून बसले आहेत."

मी काहीं बोलण्याच्या आधींच "आलों मी आता गाडी घेऊन" असें म्हणून त्या माणसानें टेलिफोन बंद देखील करून टाकला.

माझ्या डोळ्यांसमोर अंधारी आली.

"तुमबिन कौन सहारा, प्रभुजी!' शेजारच्या घरातल्या रेडिओवरून आर्त स्वरांत कोणी तरी हें ध्रुवपद आळवीत होतें.

* * *

# १० मला भेटलेला बदमाष

पुण्याचे भामटे आणि दिल्लीचे सोदे हे इतिहासकालापासून प्रसिद्ध आहेत. मी दिल्लीला चारपाच वेळा जाऊन आलों आहें. पण तेथें कांहीं मला 'सोदे दिसले नाहीत. आणि पुण्यात तर माझा सारा जन्मच गेला आहे. पण इतक्या वर्षांत एकही भामटा तसा मला तिथें आढळला नाहीं. हल्लींच्या काळी पुणें हें भामट्यासाठींच प्रसिद्ध आहे असें म्हणणें ही पुण्याची बदनामी आहे.

इतिहासकाळीं काय असेल तें असो. इतिहास जसा बदलतो तशीं माणसेही बदलतात आणि गावेंही बदलतात. पुण्याचें आणि दिल्लीचें महत्त्व दुसऱ्या दृष्टीनें जरी आज कमी झालेलें नसलें तरी पैशाच्या आणि व्यापाराच्या दृष्टीनें त्यांना आज काय महत्त्व राहिलेलें आहे? मग भामटे आणि सोदे त्या ठिकाणीं कशाला विनाकारण मुक्काम करून राहतील?

पुण्याला काय ते विद्यार्थ्यांचीं पुस्तकें चोरतील अन् दिल्लीला काय ते सेक्रेटरिएटमधून 'फायली' पळवतील! जेथें गूळ तेथेंच मुंगळे गोळा व्हायचे. त्याप्रमाणें जेथें पैसा तेथेंच सारे चोर जमायचे; म्हणूनच इतिहास-प्रसिद्ध सोद्यांचें आणि भामट्याचे आजच्या काळांतील सारे वंशज ज्या ठिकाणीं लक्षावधि नि कोट्यवधि रुपयाच्या प्रतिक्षणीं घडामोडी चालतात अशा मुंबई किंवा मद्राससारख्या अवाढव्य शहरांमधून ह्या ना त्या रूपानें वावरत असल्यास नवल नाहीं.

ह्या पुरातन व्यवसायांतला आणि घराण्यांतला एक वस्ताद वारसदार नऊ वर्षांपूर्वी मुंबई शहरांत मला प्रत्यक्ष पाहावयाला मिळाला. एवढेंच नव्हे तर आपल्या बुद्धिकौशल्याचा एक मासलेवाईक प्रयोग त्यानें माझ्यावरच करून दाखविला. माझे नशीब एवढेंच कीं, त्या प्रयोगांत मला फारसा चट्टा बसला नाहीं. अगदीं थोडक्या खर्चांतच मी त्याच्याकडून अक्कल शिकलों.

व्यापाराच्या क्षेत्रांत वावरणाऱ्या मुंबईतल्या माणसांना असे बदमाष अन्

भामटे पदोपदीं भेटत असतात. पण इतर धंद्यांपेक्षां चित्रपटांच्या व्यवसायांत अशा लोकांचा धोका जास्त असतो, हें मीं सांगावयास पाहिजे असें नाहीं. प्रत्येक व्यवहार करताना अगदीं डोळयात तेल घालून माणसाला जागे राहावें लागतें. नाहीं तर केव्हां कोणत्या भानगडींत आपण पटकन् सापडूं हें काहीं सागता यावयाचें नाहीं.

चाळीस सालीं मी मुंबईला आलों. आणि परळ येथें 'चित्रमंदिर' नांवाचा एक स्टुडिओ विकत घेतला. अन् स्वतःचे चित्रपट निर्माण करावयास सुरुवात केली. रोज हजारों रुपयांची हातून घडामोड होऊं लागली. कर्ज हेंच माझें भांडवल असल्यानें रोज सकाळपासून संध्याकाळपर्यंत पैसा कसा उभा करायचा हाच माझा मुख्य उद्योग होऊन बसला.

पैशाच्या व्यवहारांत रोज नाना तऱ्हेच्या भल्याबुऱ्या लोकांच्या गांठी पडूं लागल्या. चित्रपटाच्या व्यवसायात लाखाशिवाय गोष्टी नाहींत. सामान्य सावकाराकडून काहीं लाखों रुपयाचें कर्ज मिळण्याची शक्यता नसते. म्हणून मोठमोठे लक्षाधीश, भांडवलवाले आणि राजेमहाराजे ह्यांच्याकडून चित्रपटाचे निर्माते पैसे जमा करण्याच्या नेहमीं नादांत असतात. आणि त्या कामीं कित्येकाना कधीं कधीं यशही पण मिळतें.

चित्रपटनिर्मात्याचें हें मानसशास्त्र सर्वसामान्यपणें जगजाहीरच असतें. आणि त्याचा फायदा जसा धदेवाईक दलाल घेतात, त्याप्रमाणें कांहीं लफंगे भामटेही पण घेत असतात. माझी गरज दीड-दोन लाखाच्या आंत होती. आणि ही गरज हुंडी बाजारांतून मी तशी भागवूं शकत होतों. राजेमहाराजांच्या स्वभावाची मला पूर्ण माहिती असल्यानें त्यांच्याकडे ढुकून देखील बघायचें नाहीं असें मीं मनाशीं ठरविलें होतें. माझे पैशाचे सारे व्यवहार मी अतिशय जपून आणि सावधगिरीनें करीत होतों.

एके दिवशीं सकाळीं दहा वाजायच्या सुमारास 'चित्रमंदिर'मधील माझ्या हपिसांत बसलों असतां एक गृहस्थ माझ्या भेटीला आला. त्याचें वय पंचावन्न-छपन्न वर्षांचें होतें. अंगानें तो उंचापुरा आणि बाध्यानें मजबूत, पण थोडासा स्थूल होता. मुद्रेवरून तो गभीर आणि प्रौढ असा दिसत होता. त्यानें इंग्रजी पद्धतीचा पोषाख केला होता.

त्यानें आपल्या नांवाचें इंग्रजी कार्ड जेव्हां आंत माझ्याकडे पाठविलें, तेव्हां तें वाचून कोणी तरी गोरा साहेबच मला भेटायला आला असावा असें मला

वाटलें. त्याचें नांव 'कॅशर' असें होतें. पण त्यानें त्या नांवाचें स्पेलिंग 'Cassier' असें केलें होतें. त्यानें निराळीच कल्पना होत होती. तो ज्यू होता. आणि इंग्रजी भाषा एखाद्या साहेबाच्या ठसक्यानें आणि अस्खलितपणानें तो बोलत होता. त्याची चालण्याची आणि वागण्याची पद्धत एखाद्या सुसंस्कृत आणि सुशिक्षित साहेबाप्रमाणें रुबाबदार होती.

माझ्या समोरच्या खुर्चीवर तो मोठ्या अदबीनें बसला आणि आपल्या कोऱ्या करकरीत अन् पिवळ्या रंगाच्या कातडी पिशवींतून त्यानें टाईप केलेलीं पांचसात जाड पत्रें बाहेर काढून माझ्या हातात दिलीं. तीं पत्रे वाचून मी तर पहिल्या झटक्यासरशीं चीत झालों. मुंबईतल्या सुप्रसिद्ध लक्षाधीश व्यापाऱ्याच्या नोटपेपरवर त्याच्या सह्याचीं तीं पत्रे होतीं. तीं पत्रे बनावट होतीं असा संशयही कोणाच्या मनांत येणें शक्य नव्हते. आणि कदाचित् तीं पत्रे खरींही पण असतील, नाहीं असें नाहीं.

सदर व्यापाऱ्यांनीं आपल्या स्वतःसाठीं चार-चार लाखाचें, पाच-पाच लाखाचें कर्ज उभे करण्याचें अधिकार-पत्र कॅशर ह्याला दिलें होते. तीं पत्रे वाचून झाल्यानंतर मी मोठ्या आदरानें आणि विस्मयानें कॅशरकडे पाहू लागलों. कर्ज मिळवून देणारे अनेक दलाल तोंपर्यंत माझ्याकडे आले होते आणि रोज येतही पण होते. पण लाखाचा व्यवहार करणारा एवढा मोठा दलाल मात्र त्या क्षणा-पर्यंत माझ्याकडे कधींच आला नव्हता.

"बोला, काय म्हणणें आहे आपलें?" कॅशरचीं पत्रे त्याला परत करीत मीं इंग्रजीमध्यें त्याला विचारलें.

"आपली सेवा करण्याची आपण मला संधि द्यावी एवढीच विनंति आहे," कॅशर सस्मित मुखानें म्हणाला.

त्या त्याच्या विनम्र उद्गारांनीं एका क्षणांत माझ्या काळजाला वेढा घातला. पण पैशाचे व्यवहार अतिशय काळजीपूर्वक करावयाचे आणि कोणाही अनोळखी माणसावर त्याबाबत विश्वास ठेवावयाचा नाहीं, हा एक अलिखित नियम मीं माझ्या मनाशीं करून ठेवला होता त्याची मला आठवण झाली. आणि अगदीं ओठांपर्यंत आलेले शब्द मागे घेऊन मी एकदम गप्प बसलों.

माझ्या मनांतली ती हालचाल कॅशरनें ताबडतोब ओळखली आणि तो मोठ्या ऐटीनें म्हणाला, "अत्रेसाहेब, मला आपण धंदेवाईक दलाल समजूं नका. मी लष्करी माणूस आहें. पहिल्या महायुद्धांत मी लढलों आहें. मला

'व्हिक्टोरिया क्रॉस' मिळणार होता. पण थोडक्यांत चुकला. माझे वडील पोरबंदर संस्थानचे दिवाण होते. फार श्रीमंतींत आणि वैभवांत आम्हीं दिवस काढले आहेत. केवळ नाइलाज म्हणून मी हा धंदा करतों आहें. पण म्हणून वाटेल त्या अलबत्यागलबत्या माणसाचें काम मी हातीं घेतों असें आपण कृपा करून समजू नका. चारदोनच कुळें मी घेतो. पण अगदीं निवडक निवडक आणि मोठीं मोठीं. जास्त पंचायतींत मी पडत नाहीं. देवाच्या दयेनें मला एकच मुलगी आहे. तिची मला तरतूद करायची आहे. दुसरं काहीं नाहीं."

ऐकणाराच्या मनांत आदर आणि विश्वास निर्माण करील अशीच कॅशरची बोलण्याची पद्धत होती. त्याच्या शरीराच्या बांध्यावरून आणि हालचालींच्या रुबाबावरून तर तो उघड लष्करी माणूस वाटत होता. आणि त्याच्या बोलण्यावरून मोठमोठया लोकांशीं त्याचा संबंध आलेला असावा, असा कोणाचाही ग्रह झाला असता.

तरी देखील पहिल्याच भेटीला आपण त्या माणसापाशीं आपल्या गरजेची झाकली मूठ कशाला मोकळी करा, असा विचार करून मी त्याला म्हणालो, "आपण इतक्या अगत्यानें येऊन मला भेटलांत ह्याबद्दल मी आभारी आहें. पण मी एक लहान माणूस आहें. लाखाचे व्यवहार जुळविणाऱ्या आपल्यासारख्या मोठया माणसाला मी का म्हणून तसदी देऊं?"

त्याबरोबर अगदीं मोकळेपणानें तो हसला आणि शुद्ध मराठीमध्यें त्यानें माझ्याशीं बोलायला सुरुवात केली, "अत्रेसाहेब, अजून आपण मला परका मानतां. तुम्ही जरी आज मला प्रथम पाहात असला तरी मी मात्र तुम्हाला पुष्कळ दिवसांपासून ओळखतों. आपल्या नाटकाचा आणि चित्रपटांचा लौकिक किती दिवसांपासून तरी माझ्या कानावर आहे."

"तो कसा काय?" मीं आश्चर्यचकित होऊन विचारलें. "आणि मराठी भाषा तुम्ही इतक्या चागल्या तऱ्हेनें कशी काय बोलूं शकतां?"

"इंग्रजी, मराठी, गुजराती, हिंदी आणि उर्दू ह्या पाचही भाषा मी चांगल्या तऱ्हेनें बोलू शकतो," कॅशर हसत म्हणाला. "मूळचे आम्ही कोकणातले. पण पुढें गुजरातेंत स्थायिक झाल्यामुळें गुजराती ही आमची मातृभाषा झाली. लष्करातल्या नोकरीमुळें पुढें तिचें स्थान इंग्रजीनें घेतलें. युरोपमध्ये काहीं वर्षे मी घालविल्यामुळें मला फ्रेंच आणि जर्मनही पण चांगलें येतें—"

"पण माझीं नाटकें तुम्हीं कुठें वाचलींत?" मीं मध्येंच विचारलें.

"मी कबूल करतों कीं, मीं स्वतः कांहीं तुमचीं नाटकें वाचलेलीं नाहींत," कॅशर मिनतवारीच्या स्वरात म्हणाला, "तितकें मराठी मला समजतही नाहीं. पण माझी बायको ही तुमच्या वाङ्मयाची मोठी भक्त आहे. तिचें सारें शिक्षण पुण्यांतच झालें. तिच्या तोंडून ऐकून ऐकून मला तुमच्या नाटकांच्या आणि चित्रपटाच्या गोष्टी अगदीं पाठ झाल्या आहेत म्हणानात. आणि आजदेखील मी तुमच्याकडे जो आलो आहें त्याला कारण तीच आहे."

"तें कसें काय?" मीं अचंब्यानें विचारलें.

"आपण मुंबईत येऊन हा चित्रमंदिर स्टुडिओ विकत घेतला आणि 'पायाची दासी' नावाचा एक चित्रपट आपण सध्या काढीत आहात हें तिनेंच मला सागितलें. कारण ती तुमचा 'नवयुग' नियमितपणें वाचते," कॅशर अगदीं माहितगाराप्रमाणें सागूं लागला. "आणि तीच किती दिवसांपासून तरी मागें लागली आहे, कीं दुसऱ्याच्या पैशाची जमवाजमव तुम्ही करीत फिरता त्यापेक्षा अत्रेसाहेबाचें तुम्ही जर काम कराल तर एका सुशिक्षित आणि लायक माणसाला मदत करण्याचें श्रेय तरी तुम्हाला लाभेल. वास्तविक पाहता आज मी जो इथें आलो आहें तो केवळ तुमची ओळख करून घेण्यासाठीं. एकदा आपला परिचय झाला आणि मी कोणत्या प्रकारचा माणूस आहें हे आपल्या लक्षात आलें म्हणजे मग व्यवहाराच्या गोष्टी आपण सावकाश पुढें करूं. बरें आहे, येतां मी."

एवढें बोलल्यानंतर माझा स्टुडिओ दाखविल्यावांचून त्याला जाऊं देणें हें काहीं मला बरें दिसलें नसतें. म्हणून मीं त्याला विनंतिपूर्वक विचारलें, "आता आपण इथे आलाच आहात. तर एकदा आपण माझा स्टुडिओ पाहून गेलात, तर मी आपला फार आभारी होईन."

"ओ, थॅंक्स, विथ् प्लेझर!" कॅशर लष्करी ऑफिसरच्या ऐटबाज पवित्र्यांत चपलतेनें उठून म्हणाला.

कॅशरला मीं स्टुडिओ दाखविला. स्टुडिओंतील निरनिराळी यंत्रसामग्री आणि प्रत्येक खात्यांत चाललेलीं कामें त्यानें मोठ्या उत्सुकतेनें समजावून घेतलीं आणि शेवटीं अंतःकरणपूर्वक आभार मानून त्यानें माझा निरोप घेतला. पहिल्याच भेटीला माझें त्याच्याबद्दल उत्तम मत झालें.

त्यानंतर महिना दीड महिना कधीं तरी अधूनमधून तो मला फोन करीत असे. एकदा-दोनदां तो स्टुडिओंत आला. आणि एकदां-दोनदां तो घरींही पण आला.

पण त्या काळांत व्यवहाराची त्यानें एकदांही कधीं गोष्ट केली नाहीं. वक्तशीरपणा आणि चोखपणा हे दोन विशेष गुण त्याच्या वर्तणुकीमध्यें मला आढळले. सात वाजता येतों म्हणून त्यानें सागितलें कीं, बरोबर सात वाजतां तो यावयाचा. त्यात मिनिट पुढेंमागें व्हायचें नाहीं. एकादे वेळीं पत्रासाठीं दोनचार आण्याचीं तिकिटें त्यानें मागून घेतलीं कीं त्याचे पैसे खिशातून काढून तो ताबडतोब टेबलावर ठेवायचा.

असल्या बारक्यासारक्या गोष्टींचे पैसे कसले देता, असें मीं चिडून म्हटलें तर तो उलट माझ्यावरच रागावल्यासारखे दाखवून म्हणे, "ज्याला व्यापार करायचा आहे त्यानें असें करूं नये. पै-पैची तुम्हीं काळजी घ्याल, तेव्हा लाखो रुपये कमवाल!"

एक-दोनदां माझ्या फोनवरून तो परगांवीं बोलला. त्याचेही पैसे त्यानें मला त्याच वेळीं काढून दिले. अशा रीतीनें महिन्या दोन महिन्यांत आमची चागलीच ओळख झाली. माझ्या गरजा काय आहेत हें त्याला माहीत झालें. आणि त्याच्या ओळखी कोणाकोणाशीं आहेत हें मलाही समजून आलें.

भावनगरच्या महाराजाचा बोलताना तो पुष्कळदा उल्लेख करी. एक-दोनदां माझ्यासमक्ष फोनवरून त्याच्याशीं तो बोलला. आणि एकदां भावनगरची लाल पाटी असलेल्या कोऱ्या करकरीत मोटारीमधूनही तो माझ्या स्टुडिओत आला. माझ्या मित्रमंडळींशीं त्याचा परिचय झाला. लढाई आणि राजकारण हे त्याच्या बोलण्याचे नेहमींचे विषय असत.

एकदां तो सहज मला म्हणाला, "अत्रेसाहेब, मी ही रोजची तुमची धांवपळ पाहतों आहें त्यामुळें तुमच्या शक्तीचा निष्कारण व्यय होतो आहे असें मला वाटतें. माफ करा अं, स्पष्ट बोलतो म्हणून. वास्तविक तुम्हीं शांतपणें बसून गोष्टी लिहाव्यात. तुमच्यासारख्यानें ही पैशाची दगदग करूं नये."

मनुष्याच्या कष्टाबद्दल सहानुभूति दाखविणें हा त्याचें अंतःकरण काबीज करण्याचा अगदीं रामबाण उपाय आहे.

मी कृतज्ञतेनें त्याला म्हणालों, "तुम्ही माझ्याबद्दल इतक्या आपुलकीनें बोलतां आहांत याबद्दल मी तुमचा आभारी आहें. मला देखील ही धावपळ आवडत नाहीं. पण ह्यातून सुटायच कसं?"

कॅशरनें क्षणभर विचार केला आणि एकदम तो उद्गारला, "तुम्हांला दोन लाख रुपये मिळाले तर तुमचं काम भागेल?"

"दोन कशाला ? दिडांतसुद्धां होईल!" मी म्हणालों.

"अस्सं ? ठीक आहे. एकदोन दिवसात आपण पुन्हा त्याबद्दल बोलूं." असे अर्धवट ओठातल्या ओठात बोलून तो निघून गेला.

दोन दिवसांनीं त्यानें मला फोन केला आणि "उद्या दहा वाजता मी स्टुडिओत येतो" असें मला तो म्हणाला. त्याप्रमाणें बरोबर दहाच्या ठोक्याला तो स्टुडिओत आला.

आल्याबरोबरच चेहऱ्यावर कोणतीही भावना न दाखवितां तो शात स्वरात म्हणाला, "अत्रेसाहेब, तुमचें काम झालें!"

मी आनंदानें म्हणालो, "म्हणजे काय ?"

कॅशर अगदीं हलक्या आवाजात म्हणाला, "कृपा करून ह्यातलें एक अक्षर कुणाला सांगूं नका. अगदीं 'कॉन्फिडेन्शल' ठेवा. काल रात्रीं जेवायच्या वेळीं मीं महाराजाना—म्हणजे आमच्या भावनगरच्या—तुमची गोष्ट काढली. आणि तुमचें नशीब असें कीं, त्यानीं ती गोष्ट ताबडतोब मान्य केली. तुम्ही दीड म्हणालात; पण मी दोनाचंच बोललों. एवढ्या धद्यात पन्नास हजार हातांत आणखी शिल्लक असले तर काही बिघडत नाहीं. काय ?"

माझ्या पोटातून हर्षाच्या गोड गोड अन् गरम उकळ्या उठायला लागल्या. आणि डोळे आनंदानें नाचू लागले.

"महाराजानीं मला विचारलें—" कॅशर पुढें म्हणाला, "कीं रकमेला तारण काय ? मीं म्हणालो, त्याच्या मालकीचा चार-पाच लाखाचा स्टुडिओ आहे."

"एवढा नाहीं. पण अडीच-एक लाखांपर्यंत येईल!" मी मध्येच म्हणालों.

"ते पाहूं आपण. मला आतां तुम्ही स्टुडिओतल्या यंत्राच्या आणि सामानाच्या तपशिलाची अन् त्यांच्या किंमतीची यादी चटकन् करून द्या—" कॅशर म्हणाला.

"रकमेला व्याज काय ? अन् ती परत केव्हां करायची ?" मीं विचारलें.

"व्याज जास्तींत जास्त आठ आणे आणि मुदत आपण घालूं पाच वर्षांची!" कॅशर निर्धास्तपणाच्या स्वरात म्हणाला.

मी तीन तीन रुपये व्याज देऊन बाजारातून हुंड्या काढीत होतों. अन् त्याची जास्तींत जास्त मुदत तीन महिने असे. अन् हा माणूस तर आठ आणे मितीच्या व्याजानें आणि पाच वर्षांच्या मुदतीनें दोन लाख रुपये देण्याच्या गोष्टी करतो आहे.

मी कॅशरचा हात दोन्ही हातांत धरून अंतःकरणापासून म्हणालों, "कॅशर, तूं खरोखरच एक अद्‌भुत माणूस आहेस!"

कॅशर थडपणें म्हणाला, "साहेब, अजून तुम्हाला काय माझं ठाऊक आहे? मी तुमच्यासाठीं काय काय करणार आहें ह्याची तुम्हाला कल्पना नाहीं. अद्यापपर्यंत मी त्याबद्दल तुम्हाला बोललो नाहीं. असें आहे कीं, माणसानें केल्यावाचून बोलू नये. मुंबई शहरात तुमचा स्टुडिओ हा एक आदर्श स्टुडिओ व्हावा एवढीच माझी इच्छा आहे."

"पण त्याला वीस पचवीस लाख रुपये लागतील!" मी चिंतातुर चेहरा करून म्हणालो.

"त्याची मला पूर्ण कल्पना आहे," कॅशर हसून म्हणाला. "मी इतके दिवस स्वस्थ बसलो होतो अशी तुमची समजूत आहे कीं काय? मीं अमेरिकेहून तें सगळें वाङ्मय मागविलें आहे. हें तुमचें काम झालें कीं, मी एक आठवडा कलकत्त्याला जाऊन येणार आहें. तिथें माझ्या जवळ एक फार मोठी पार्टी आहे—"

माझ्या आनदाला पारावार राहिला नाहीं. मुंबईतल्या माझ्या पंचवीस लाखांच्या आदर्श स्टुडिओचे सोनेरी कळस एकदम माझ्या कल्पनासृष्टीत झळकूं लागले.

इतक्यात मला आठवण होऊन मीं कॅशरला विचारलें, "पण कॅशरसाहेब, ह्या तुमच्या दोन लाखाच्या व्यवहाराबद्दल तुम्हाला कमिशन काय द्यावयाचें?"

"छे, छे, ह्या व्यवहाराबद्दल मी तुमच्याकडून कमिशन कांहींही घेणार नाहीं!" कॅशर मान जोरानें हलवून म्हणाला. "दोन लाखांबद्दल दलालाच्या नेहमींच्या दराप्रमाणें होणार किती कमिशन? चार हजार रुपये. मी तुमच्याकडून काय चारच हजार रुपये घेऊं? अत्रेसाहेब, माझी भूक फार मोठी आहे. मी जेव्हा तुमचें तें पंचवीस लाखाचें काम करून देईन तेव्हा मग माझी खरी किंमत मी तुमच्याकडून वसूल करून घेईन. हा व्यवहार म्हणजे माझ्या कर्तबगारीची एक नववर्षाची तुम्हांला नजरभेट आहे असेंच समजा ना तुम्ही!"

कॅशरचा तो युक्तिवाद इतका परिणामकारक होता कीं त्याला उत्तर देणें अशक्य होतें. तरी देखील मी माझ्याकडून म्हणायचें तें सारें म्हणालों आणि ह्या व्यवहाराबद्दल जें कांहीं रीतसर कमिशन असेल तें त्यानें घेतलेंच पाहिजे असा त्याला आग्रह केला.

तेव्हां शेवटीं तो खांदे उडवीत नाइलाजाच्या स्वरानें मला म्हणाला, "याउप्पर तुमची मर्जी. तुमच्या मनाला येईल तें तुम्ही द्या."

स्टुडिओतल्या मालमत्तेची तपशीलवार यादी करून मीं कॅशरला दिली. त्यानंतर एकदोन वेळा मी त्याच्याबरोबर त्याच्या सॉलिसिटरच्या कचेरींत गेलो. तो आंत जायचा. मी बाहेर मोटारींत बसून राहायचा.

दहा-पंधरा दिवसानीं सॉलिसिटरनें तयार केलेला कर्जाच्या कराराचा तपशीलवार खर्डा त्यानें माझ्या हातात ठेवला. त्यानें सांगितल्याप्रमाणें तो अगदीं व्यवस्थित होता. त्यात कुठेंही कोणत्याही प्रकारचा उणेपणा नव्हता. फक्त 'भावनगरच्या महाराजा'च्या नांवाच्या ठिकाणीं मात्र जागा मोकळी सोडलेली होती.

मीं त्याला विचारलें, "असें का?"

कॅशर म्हणाला, "हा कर्जाचा व्यवहार महाराज आपल्या स्वतःच्या नांवावर कधींही करीत नाहींत. कदाचित् ते आपल्या खाजगी कारभाऱ्याचें नांव ह्या करारात घालतील. पाहू या. एक दोन-दिवसात मी हा ड्राफ्ट त्यांच्याकडून मंजूर करून आणतो."

त्याप्रमाणें आणखी चारपांच दिवसांनीं तो ड्राफ्ट घेऊन माझ्याकडे आला. त्यावर लाल पेन्सिलीच्या एक-दोन ठिकाणीं ठळक खुणा होत्या आणि तळाशीं 'अप्रूव्हड' अशीं ऐटदार आद्याक्षरें आणि त्याच्या खाली सहीची दोन झोकदार अक्षरें होतीं.

कॅशर हसून माझ्या कानात पुटपुटला, "ही महाराजांची सही आहे."

मी महाराजांच्या अक्षराचें किती तरी वेळ मनातल्या मनात कौतुक करीत होतो. महाराजातर्फे करारात त्यांच्या खाजगी कारभाऱ्याचें नाव घालण्यात आलें. तें एक गुजराती माणसाचें नाव होतें.

मीं हर्षानें विचारलें, "आता पुढें?"

कॅशर म्हणाला, "आतां फायनल ड्राफ्ट अन् त्यानंतर तुमच्या हातांत दोन लाखांचा चेक—"

दहा-पंधरा दिवसांनीं पन्नास का शभर रुपयांच्या स्टॅप पेपरवर कॅशरनें तो करार अगदीं व्यवस्थित रीतीनें करून माझ्याकडे आणला. अशा व्यवहाराचे सॉलिसिटर जसे करार करतात तसाच तो करार होता.

तो करार पाहून मी खूष झालों. मीं खिशांतून चेकबुक काढीत त्याला विचारलें, "ह्याचा निम्मा खर्च मलाच द्यायचा आहे ना?"

कॅशर माझें चेकबुक माझ्या खिशांत कोंबून म्हणाला, "तो खर्चांचा हिशेब आपण मागाहून करू हो. महाराज सध्या पुण्याला गेले आहेत. तेव्हां मलाही त्याच्याबरोबर तिकडे गेलें पाहिजे. कारण एकसारखा त्यांच्या पाठीमागे लकडा लावल्याखेरीज अशीं कामे होत नाहींत. मोठीं माणसें आहेत तीं. त्यांना आठवण राहात नाही."

मीं विचारलें, "अजमासें किती दिवसात काम होईल हें?"

कॅशर म्हणाला, "तरी एक पंधरवडा लागेल."

पुण्याला जाण्यासाठीं कॅशरनें माझी मोटर मागितली. मींही त्याला मोठ्या आनंदानें ती दिली. मध्यंतरीं दोन वेळा मी पुण्याला जाऊन आलों. दर वेळेला मला भेटायला कॅशर स्टेशनावर येई. तो लढाईचा काळ होता. स्टेशनावर पुष्कळसे गोरे लष्करी अधिकारी नेहमीं इकडून तिकडून फिरत असत. त्याच्याशीं कॅशर मोठ्या सलगीनें बोलतांना पण आढळून येई. कोणाला तो 'हॅलो स्मिथ' म्हणे, तर 'हॅलो जॉन' म्हणून कोणाच्या पाठीवर थाप मारी.

स्टेशनावर कॅशरला मीं एकदां-दोनदां 'पेय' देण्याचा प्रयत्न केला. पण त्यानें तें साफ नाकारलें. तो म्हणाला, "मी सिगरेट ओढत नाहीं. दारूच्या थेंबा-लाही स्पर्श करीत नाहीं." कॅशरला कशाचेंही व्यसन नाहीं हें बघून तर मी अगदीं चाट झालों.

'भावनगर'च्याच मोटरींतून कॅशर पुण्यांत फिरत असे. पुण्यांतल्या माझ्या एकदोन मित्रांची मीं कॅशरशीं ओळख करून दिली. त्यांच्याकडेही तो कधीं कधीं गप्पा मारायला जात असे. अधूनमधून एकादे वेळीं माझ्या डोक्यात विचार येत असे, नाहीं असें नाहीं, कीं हा माणूस आपल्याला फसवीत तर नाहीं ना?

पण त्याच्या वागणुकीचा जेव्हां मी बारकाईनें विचार करीं तेव्हां तिच्यांत कुठेही मला फट आढळून येत नसे. त्याच्याबद्दल ज्या ज्या शका माझ्या मनात येत, त्यांचें यथाक्रम निरसन होत असे अन् अशा माणसाबद्दल आपण संशय घेणें म्हणजे त्याला अन्याय करण्यासारखे आहे असें मागाहून मनाला वाटे.

पंधरावीस दिवसांनीं एके दिवशीं कॅशरचा पुण्याहून मला तातडीचा फोन आला, कीं "आजच्या डेक्कन क्वीननें तुम्ही पुण्याला ताबडतोब या."

त्यानें मला कशाला बोलाविलें असावें हें तत्काळ माझ्या लक्षांत आलें.

त्याप्रमाणें मोठ्या आनंदानें नि उत्सुकतेनें मी त्या दिवशीं पुण्याला गेलों. स्टेशनावर मला घ्यावयाला कॅशर हजर होताच.

मी गाडींतून खालीं उतरतांच माझा हात त्यानें हातांत धरला आणि तो म्हणाला, "कुठल्या तरी शात ठिकाणीं आपण जाऊं या. पुष्कळ बोलायचंय मला."

मी कॅशरला घेऊन 'पूना हॉटेल'मध्यें गेलों. एका खोलींत आम्ही जाऊन बसलों.

कॅशर माझ्याशीं हस्तांदोलन करीत म्हणाला, "आपलें काम झालें. आज मला अतिशय आनद झाला आहे. उद्या अकरा वाजता करारावर सही होऊन महाराज आपल्याला दोन लाखाचा चेक देतील. आताच मी सगळें मुक्रर करून आलो आहें."

तो क्षण म्हणजे सुखाची मला पराकाष्ठा वाटली.

"मी कधीं पीत नाहीं, पण आज या आनदाप्रीत्यर्थ मी एक छोटा पेग ब्रॅण्डी घेईन."

मी त्याप्रमाणें बॉयला बोलावून पेये आणायला सागितलीं. डोक्यावर पंखा गरगर फिरत होता. बर्फाच्या खड्यानीं थंडगार झालेल्या पेयाचा आस्वाद घेत निवांतपणें आम्ही बोलूं लागलों.

मध्येंच कॅशर सहज काहीं तरी बोलावें तसें बोलला, "आतां आपल्याला हजार बाराशें रुपये रोख मिळूं शकतील का इथें?"

मी म्हणालो, "कां?"

कॅशर म्हणाला, "नाहीं. उद्यां महाराज आपल्याला चेक देणार ही बातमी तिथच्या नोकरांना आतां माहीत झालेली आहे. तेव्हां त्यांना आपल्याला कांहीं ना काहीं तरी द्यावें लागेल. नाहीं का? महाराजांचा पर्सनल सेक्रेटरी आहे तो जरा जास्त मागतो आहे. पण मी त्याला सात-आठशें रुपयातच भागवणार आहें. उगाच जास्त कोण देतो आहे लेकाच्याला! अन् बाकीच्या नोकर-माणसांना चारशें रुपये पुरे होतील."

तोंपर्यंत कॅशरनें माझ्याकडून एक रुपयादेखील घेतला नव्हता. उलट त्यानें आतांपर्यंत शंभर-दीडशें रुपयांचा खर्च केलेला मला दिसत होता. बरें, ज्या कामासाठीं त्यानें ही पैशांची मागणी केली होती तें कामही खोटें वाटण्यासारखें नव्हतें. असे पैसे हे द्यावे लागतातच. क्षणभर मला मनांतून वाटलें कीं

माझ्याकडून पैसे उपटण्याचा कॅशरचा हा डाव तर नसावा ना? पण असें वाटून सुद्धां त्याच्या मागणीप्रमाणें त्याला पैसे देण्यावांचून त्या वेळीं सुटका कुठे होती?

मी अगदीं कोंडींत सांपडलों होतों. नाहीं पैसे द्यावे, तर आपला कद्रूपणा दिसतो. एवढें दोन लाख रुपयाचें काम आपण जुळवीत आणलें असतां आणि उद्या अकरा वाजता ह्याच्या हातांत चेक पडणार असतां हा माणूस एक हजार-बारारों रक्कम द्यावयाला काकूं करतो म्हणजे काय, असें साहजिकच कॅशर म्हटल्यावाचून राहणार नाहीं. आता थोडक्यासाठीं हें दोनतीन महिन्यांचें काम मोडावयाला नको. जें काय व्हावयाचें असेल तें होऊं द्या, असा विचार करून मीं कॅशरला पैसे द्यावयाचें ठरविलें.

मी म्हणालो, "मजजवळ चारशे रुपये रोख आहेत. मी आठशें रुपयांचा तुम्हाला चेक देतो. इथे पुण्यात माझे खाते नाहीं."

कॅशरनें क्षणमात्र विचार केला व ग्लासातलें पेय एकदम संपवून तो म्हणाला, "ठीक आहे. मग उशीर नको. चारशे रुपये रोख द्या. आणि चेक मात्र 'बेअरर' द्या."

त्याप्रमाणें मीं त्याला बारारों रुपये दिले. दुसऱ्या दिवशीं सकाळीं साडेदहा वाजता पुन्हा 'पूना हॉटेल'मध्येंच भेटावयाचें ठरलें व तो निघून गेला. त्या रात्रीं मी मोठ्या आनंदानें झोपीं गेलों.

दुसऱ्या दिवशीं ठरलेल्या वेळीं मी 'पूना हॉटेल'मध्यें जातों आहें तोंच 'टाइम्स ऑफ इंडिया'चा घडी केलेला अंक हातात घेऊन अन् दुःखी चेहरा करून कॅशर आला!

"बॅड न्यूज, अत्रेसाब— !" कॅशर म्हणाला.

माझ्या छातींत धस्सच झालें. मीं विचारलें. "काय भानगड आहे?"

मला 'टाइम्स' मधला मजकूर दाखवीत कॅशर म्हणाला, "काल रात्रीं ध्रागध्राचे महाराज वारले. ते आमच्या भावनगरच्या महाराजांचे जवळचे नातेवाईक. काल रात्रींच महाराजांना फोन आला. ते आतां मोटरनें ध्रांगध्राला जावयाला निघाले आहेत."

कॅशर म्हणत होता तें अक्षरशः बरोबर होतें. ध्रांगध्राचे महाराज खरोखरच वारले होते अन् ते भावनगरच्या महाराजांचे नातेवाईक असणेंही पण शक्य होतें. कां असूं नयेत?

मी हताश होऊन म्हणालों, "आतां?"

" निराश होण्याचें काय कारण आहे ?" कॅशर उत्तेजक स्वरांत म्हणाला, " आज काम होणार होतें तें महिना पंधरा दिवस आणखी पुढें गेलें एवढेंच. दुसरें काय ?"

" बरें आहे, मग आज दुपारीं मी परत मुंबईला जातों." मी म्हणालों.

" ठीक आहे. महाराज ध्रांगध्राहून परत आले म्हणजे मी तुम्हांला फोन करून इथे बोलावतोच. कदाचित् एकादे वेळीं मुंबईलाच आपलं काम होईल. म्हणजे इथें तुम्हाला यावयाची जरूरही पडणार नाहीं." कॅशर म्हणाला.

जातां जातां तो माझ्या हातावर टाळी देत म्हणाला, "काल रात्रीं तुम्हाला सांगितल्याप्रमाणें अवघ्या आठशें रुपयात मी महाराजाच्या चिटणिसाला भागवला. गप्प बसला तो. मुकाट्यानें त्यानें ते पैसे घेतले. माझ्यापुढें त्याची काय मात्रा चालते आहे !"

कॅशरच्या अक्कलहुशारीचें मनातल्या मनात कौतुक करीत मीं त्याचा निरोप घेतला.

मुंबईस जाऊन मी कॅशरच्या फोनची वाट बघूं लागलों. पंधरा दिवस झाले. महिना झाला. दोन महिने झाले. तीन महिने देखील होऊन गेले. पण कॅशरचा फोन कांहीं आला नाहीं.

भावनगरचे महाराज खरोखरच ध्रांगध्राला गेले का नाहीं गेले, गेले असल्यास ते पुण्या-मुंबईला परत आले कीं नाहीं आले, हें कळावयाला मला मार्ग नव्हता. कॅशरनें आपल्याला बाराशें रुपयाला सफाईनें टांग मारली हें उमगायला कांहीं मला फार दिवस लागले नाहींत. मनांतल्या मनांत मी असा चरफडलों आणि स्वतःला अशा कांहीं शिव्या दिल्या कीं कांहीं विचारूं नका.

पैसे गेल्याबद्दल मला वाईट वाटलें नाहीं. पण एका सभ्य भामट्यानें खुशाल आपल्या डोळ्यात धूळ टाकून आपल्याला फसवून जावें ह्याचा मला राग आला. पैशाचा तोटा माणूस सहन करतो; पण आपल्या बुद्धीचा अपमान झालेला मात्र कधींही तो सहन करूं शकत नाहीं.

एके दिवशीं पुण्याच्या लष्करांतून जात असतांना काहीं गोऱ्या सोल्जरांबरोबर फिरत असतांना मीं कॅशरला पाहिलें. बरा सांपडला हा आतां, ह्याला सोडतां कामा नये, असा विचार करून दोन तास त्याच्या मागें मी फिरलों व शेवटीं तो कुठें राहतो, त्याचा पत्ता तर मीं काढला ! 'नेपियर रोड'वरील एका बंगल्याच्या 'आऊट हाऊस' मध्यें तो राहात होता.

आठ दिवस त्याच्या पाळतीवर मीं माझा एक नोकर ठेवला. त्यामुळें तो जातो केव्हां, येतो केव्हां, करतो काय ह्याचा मला पुरता तलास लागला. गोऱ्या सोल्जर लोकाना बाया पुरविणें हा त्याचा एक धंदा होता. तें जेव्हां मला कळलें तेव्हा सोल्जर लोकाशीं त्याची एवढी ओळख कां तें माझ्या ताबडतोब लक्षांत आलें.

पुण्याच्या ॲडिशनल मॅजिस्ट्रेटच्या कोर्टात फसवणुकीच्या आरोपावरून मीं त्याच्यावर फौजदारी फिर्याद दाखल केली. आणि एके दिवशीं तो घरीं आहे असें पाहून त्याच्यावर वॉरंट नेऊन बजावलें. मला पाहताच त्याचा चेहरा खर्रकन् उतरला. त्याला मी अशा रीतीनें पकडीन ह्याची त्याला मुळींच कल्पना नव्हती. जामीन देतां देता त्याची अगदीं तिरपीट उडाली.

फिर्याद सुरू झाल्यावर त्याची पहिली शान पार नाहींशी झाली. पुष्कळ वेळां दाढी न करता फाटके कपडे घालूनच तो कोर्टात येई. चारशें रुपयांची कांहीं मजजवळ पावती नव्हती. पण आठशें रुपयाच्या चेकच्या पाठीवर मात्र त्याची सही होती. तो चेक बॅंकेंतून आणून मी कोर्टापुढें दाखल केला.

कॅशरनें वकील दिला व खटला लढवण्याचें अवसान आणलें. पण फीच्या पोटीं वकिलाला त्याने दिलेला चेक जेव्हां पास न होतां परत आला, तेव्हां त्याचा वकीलच माझी बाजू घेऊन त्याला शिव्या देऊं लागला. आणि मला म्हणाला कीं, "कांहीं नाहीं. या बदमाषाला तुम्ही तुरुगात पाठवा. माझी तुम्हांला मदत आहे."

एकदोन तारखा तशाच गेल्यानतर, एके दिवशीं कोर्टाच्या बाहेर कॅशरनें माझ्या पायावर अक्षरशः डोकें ठेवलें. आणि 'कसेंही करून मला वांचवा' अशी डोळ्यात पाणी आणून माझी तो करुणा भाकूं लागला.

मी कठोरपणें म्हणालों, "दयेबियेचें कांहीं बोलूं नकोस. माझे घेतलेले बाराशें रुपये आधीं परत कर."

होय नाहीं म्हणतां म्हणतां कॅशर मला सातशें रुपये परत द्यायला कबूल झाला. मींही मनात म्हटलें कीं आता फार ओढून धरण्यांत अर्थ नाहीं. प्रकरण सातशें रुपयांवर मिटवून टाकावें. दर वेळेला पुण्याला येण्या-जाण्याचा आणि वकिलाचा खर्च होतो, तो तरी वांचवावा.

कॅशरनें ऐटीनें आपल्या खिशांतून चेकबुक काढलें व तो सातशें रुपयांचा चेक लिहूं लागला. त्याचें बुक त्याच्या खिशात कोंबीत मी त्याला हसून म्हणालों, "मिस्टर कॅशर, नो चेक—कॅश प्लीज!"

माझी ती सावधगिरी पाहून कॅशरही मनापासून हसला आणि त्यानें खिशांतून शंभर रुपयांच्या सात नोटा काढून माझ्या हातीं ठेवल्या.

खटला मीं काढून घेतला. जसें कांहीं कांहींच झालें नाहीं, अशा भावनेनें कॅशर माझ्या गळ्यांत हात घालून मला म्हणाला, "आतां एके ठिकाणीं बसून चहा घ्यायला काय हरकत आहे?"

त्याचा तो निर्लज्जपणा बघून मी थक्कच झालों. मी म्हणालों, "ठीक आहे. चहा घ्यायला कांहीं हरकत नाहीं. पण त्यांत कसल्या तरी औषधाची चिमूट तर तूं टाकणार नाहींस ना? कारण, तूं दिलेले सातशें रुपये अजून माझ्या खिशांत आहेत."

"ए गुड जोक!" असें म्हणून कॅशर पोट धरधरून खो-खो हसला आणि त्यानें माझा टोला हसण्यावारी उडवून नेला.

चहा घेतां घेतां कॅशर म्हणाला, "यापुढें मराठी लोकांच्या वाटेला मला जातां कामा नये. तुम्ही लोक बडे पक्के असतां. त्यापेक्षां आमचे ते मुंबईचे गुजराती अन् बोहरीच बरे. त्यांना फसविलें तर गप्प बसतात. अशा फिर्यादी तरी करीत नाहींत."

"तुझ्या ह्या फसवणुकीचा नमुना मला कळला. त्याची पांचशें रुपये मला फीच द्यावी लागली!" मी म्हणालों. "पण तुझ्या बुद्धिकौशल्याचा दुसरा एकादा नमुना तरी मला सांग. एखाद्या गोष्टींत मला त्याचा उपयोग तरी होईल."

मीं जितक्या मोकळेपणानें त्याला हा प्रश्न विचारला, तितक्याच मोकळेपणानें त्यानें मला उत्तर दिलें. बदमाष लोक तसे खेळाडू असतात.

"एका मुंबईच्या बोहऱ्याचीच गोष्ट सांगतों," कॅशर सांगू लागला. "त्याला जी. आय. पी. रेल्वेचें दहा लाख रुपयांचें कंत्राट घ्यायचें होतें. तो माझ्या तडाख्यांत सांपडला. त्याला मीं सांगितलें, कीं जी. आय. पी.च्या ट्रॅफिक मॅनेजरची आणि माझी चांगली ओळख आहे. तुला मी हें कंत्राट मिळवून देतों. एकै दिवशीं मी त्या बोहऱ्याला घेऊन गेलों साहेबाच्या बंगल्यावर. त्याला मोटरींत बाहेर बसवून ठेवलें. अन् मी त्या साहेबाबरोबर त्याच्या बंगल्याच्या व्हरांड्यांत जाऊन गप्पा मारूं लागलों. साहेबाला फुलझाडांचा नाद होता. ती माहिती मीं आधीं काढली होती. फुलझाडांच्या बियांचा मी एजंट आहें, असें मीं साहेबाला सांगितलें आणि निरनिराळ्या फुलझाडांसंबंधीं चांगले अर्धापाऊण

तास आम्ही बोलत बसलो. आम्ही काय बोलत होतों हें लांबून त्या बोहऱ्याला कळणें शक्यच नव्हतें. त्याची एवढी खात्री झाली कीं त्या साहेबाची अन् माझी खूप दोस्ती आहे.

"परत आल्यावर बोहऱ्यानें मला विचारलें, 'साहेब काय म्हणतो आहे?' मी म्हणालों, 'तो वीस हजार मागत होता. पण मीं दहा हजारात ठरवलं. उद्यां तुमच्या समक्षच मी त्याला पैसे देतों. म्हणजे तुमची खात्री पटेल. महिन्याच्या आत तुम्हाला कत्राट मिळाल्याचं कंपनीकडे उत्तर येईल. अगदीं निश्चित.'

"त्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं बोहऱ्यानें मला हजार रुपयांच्या दहा नोटा आणून दिल्या. त्या मीं त्याच्या समक्षच एका पाढऱ्या पाकिटांत घालून बंद केल्या, आणि पाकीट आतल्या खिशात घातलें. बोहऱ्याला मोटारींत घालून साहेबाच्या बंगल्यावर नेलें. मोटार अगदीं पोर्चमध्यें नेली. साहेब व्हराड्यात बसला होता. त्या बोहऱ्याला दिसेल आणि ऐकूं येईल अशा तऱ्हेनें मीं खिशातून पाकीट काढलें, अन् 'परवां तुम्हांला वचन दिलें त्याप्रमाणें ही वस्तु आणली आहे' असें म्हणून तें पाकीट साहेबाच्या हवालीं केलें. साहेबानें हसून त्याचा स्वीकार केला. आणि तें पाकीट आपल्या टेबलाच्या खणात ठेवून दिलें.

"बंगल्याबाहेर आल्यावर बोहऱ्याला मीं विचारलें, 'पाहिलंस ना तूं आपल्या डोळ्यानीं! झालं तुझ काम? आता महिन्यानें येईल तुला पत्र!' बोहरी खूष होऊन घरीं गेला!"

कॅशरनें हसत हसत आपली गोष्ट पुरी केली.

मी म्हणालो, "माझ्या नाहीं लक्षांत आलें. तुम्हीं त्या साहेबाला दहा हजार रुपये देऊन टाकलेत ना?"

कॅशर मोठ्यानें हसून म्हणाला, "म्हणजे तुम्ही देखील बनलांत का? तुमच्या नाहीं लक्षांत आली ही ट्रिक? एका विशिष्ट फुलाचें बी एका पांढऱ्या पाकिटात घालून मीं आधींच आपल्या खिशात ठेवून दिलें होतें. 'अमुक अमुक फुलाच बी मी तुला आणून देईन' असें आधल्या भेटींत मीं साहेबाला वचन दिलें होतें. त्याप्रमाणें दहा हजार रुपयांचें पाकीट खिशांतून काढायच्या ऐवजीं मीं तें बियाचं पाकीट काढून त्या साहेबाच्या हातांत ठेवलें. त्यामुळें साहेब खूष झाला, बोहरी खूष झाला आणि दहा हजार रुपये आपल्या खिशात पडले म्हणून मनांतल्या

मनांत मीही खूष झालों !"

"मग त्या बोहऱ्याचें पुढें काय झालें ?" मीं विचारलें.

"काय व्हायचेंय ?" कॅशर हसत म्हणाला, "जी. आय. पी. कडून पत्र येईल म्हणून बसला असेल तो वाट पाहात. त्याला आतां सहा महिने होऊन गेले असतील !"

कॅशरच्या हातून आपला कांहीं अगदींच 'बोहरी' झाला नाहीं ह्याचें मला सर्वांत जास्त समाधान वाटलें. अशा भयंकर माणसाच्या हातून आपण थोडक्यात बचावलो याबद्दल परमेश्वराचे मीं मनांतल्या मनात आभार मानले. पुन्हा कांहीं मीं कॅशरला पाहिलें नाहीं.

एका माणसाला लाख रुपये कर्ज देतो, असें सागून त्यानें त्याच्याकडून दहा हजार रुपये रोख घेतले आणि त्याला लाख रुपयाचा चेक दिला. तो बॅंकेत अर्थात् वटला नाहीं. ह्या फसवणुकीच्या आरोपावरून कॅशरला नुकतीच दीड वर्षांची शिक्षा झाली, असें कोणी तरी मला परवाच सांगत होतें.

* * *

# ११ हडळीचा वंश

रात्रीचे नऊ वाजून गेले होते. अवसेला दोन दिवस अवकाश होता. म्हणून बाहेर काळाकुट्ट अंधार पडला होता. थडीचे दिवस असल्यानें आमचीं जेवणें लौकरच आटोपली होतीं. अन् आम्ही मुलें मुलें पासोड्या अंगाभोवतीं घट्ट लपेटून माजघरात अंथरुणावर भेंड्या लावीत बसलो होतो. आई स्वयंपाकघरात काहीं तरी झाकपाक करीत होती. आणि वडील कुळकर्णीपणाचे कागद काढून ओसरीवर काहीं तरी लिहीत बसले होते. फुली मोलकरीण मागल्या दारीं भांडीं घाशीत बसली होती.

डोळ्यावर झोप आल्यानें आणि आमच्या डोक्यांतला कवितांचा सांठा जवळजवळ संपत आल्यानें आमचें भेंड्याचें काम अडखळत आणि रेंगाळत रेंगाळत कसें तरी चाललें होतें. इतक्यात माझ्या वाट्याला 'ड' हें अक्षर आलें. 'ड' छापाचा माल मजजवळ शिल्लक नसल्यानें "'ड' हें व्यंजन आहे तेरावें हो मराठि भाषेत" ही अगदी ठेवणींतली 'रामबाण' आर्या मी म्हणत होतों. इतक्यात आपल्या फाटक्या पदराला हात पुशीत पुशीत फुली आमच्या अंगावरून जाऊं लागली. तेव्हां माझी बहीण काशी म्हणाली, "फुले, इतक्या रात्रीची घरीं एकटी जातेस? तुला भय नाहीं का वाटत?"

'भय' हा शब्द जणुं काय फुलीनें जन्मांत कधीं ऐकलाच नव्हता.

"भ्या! अन् कशाचं भ्या?" फुलीनें मान वळवून विचारलें.

"अग, भुतांखेताचं." मी म्हणालो.

"अन् त्या कोपऱ्यावर पिलंभटाच्या बखळींत तर म्हणे हडळ आहे हडळ!" चंप्या तोडाचें वर्तुळ शक्य तितकें करीत म्हणाला.

"हडळ? अन् हडळ काय करतिया मला?" फुली किंचित् हसून म्हणाली. तिच्या आवाजात कांहीं तरी चमत्कारिकपणाचा सूर होता. तो आम्हांला जाणवल्याखेरीज राहिला नाहीं.

"अग वा ग वा!" काशी 'हडळी'ची बाजू घेऊन फणकाऱ्यानें म्हणाली, "म्हणे हडळ काय करते मला! तुझ्या मानेवर बसेल तेव्हा कळेल तुला!"

"माझ्या मानवर बसतिया हडळ!" फुली हात ओवाळून तुच्छतेनें म्हणाली, "अशा मस पाहिल्यात हडळी म्या!"

"काय म्हणतेस?" मी पासोडी मागे फेकून अन् गुडघ्यावर अर्धवट उभे राहून ओरडलो, "तूं हडळ पाहिली आहेस डोळ्यानीं, फुले?"

"आमच्या गावामंदी तर जत्रा भरल एवढ्या हडळी हायती. भिती–भितीवर एकेक हडळ बसतिया. त्याना काय पाहायचं राडाना?" जणु कांहीं हडळी म्हणजे रस्त्यावर भिकारणीप्रमाणें किंवा वडारणीप्रमाणें दिवसाढवळ्या भटकणाऱ्या कोणी तरी आल्तू फाल्तू बायाच अशा भावनेनें फुली उद्गारली.

"अन्, त्या कांहीं करीत नाहींत तिथल्या लोकाना?" चंप्यानें आश्चर्यानें विचारलें.

"करीत असत्याल दुसऱ्याना. पन् आम्हाला कशाला काय करत्यात?" फुली मोठ्या ऐटीनें म्हणाली.

"का, तुम्हाला का त्या कांहीं करीत नाहींत?" हाताची मूठ वळून हनु-वटीवर ठेवीत एखाद्या आजीबाईप्रमाणें काशी उद्गारली.

"कां म्हजी, आम्ही तर हडळींच्या वौंशातल्या!" जणु कांहीं आपण 'लक्ष्मी-पार्वती'च्या वंशामध्यें जन्माला आलेल्या आहोत अशा अभिमानानें फुली म्हणाली.

"हडळींच्या वंशातल्या?" आम्ही तिघेजणें एकदम ओरडलों.

काशीनें आणि चंप्यानें तर एकदम उठून फुलीच्या कमरेला मिठ्या मारल्या. आणि तिला अंथरुणाच्या कोपऱ्यावर ओढीत ओढीत आणून खालीं बसविलें.

"फुले, आम्हाला सांग हडळींच्या वंशाची गोष्ट." काशी आणि चंप्या जोरानें किंचाळलीं.

फुली अधूनमधून अशा कांहीं तरी चमत्कारिक गोष्टी सागत असे; तेव्हा फुलीच्या जवळ 'हडळींच्या वंशा'ची कांहीं तरी गोष्ट असली पाहिजे, हें आमच्या लक्षात यावयाला कांहीं फारसा वेळ लागला नाहीं. गोष्ट सागायला फुलीला कांहीं फारसा आग्रह लागत नसे.

"ए आई, लौकर ये. फुली हडळींची गोष्ट सागतीय!" काशी बसल्या जागेवरून ओरडली.

बोटवाती करायचें तांब्याचें ताम्हन हातांत घेऊन आई स्वयपाकघराच्या दारांत येऊन बसली. आम्ही पासोड्या पुन्हा लपेटून नीट सावरून बसलों. फुलीनें आपल्या नाकाच्या डाव्या बाजूला ऐटीनें फुरका मारला, अन् गोष्ट सागायला सुरुवात केली.

"यीर आहे ना?—"

"यीर!" काशी एकदम उद्गारली.

"अग वीर! मध्यें बोल् नकोस." मी काशीवर डोळे वटारून ओरडलो.

"हा–हा, त्येच ते!" फुली म्हणाली. "तिथें म्हस्कोबाची जत्रा भरते दर वरसाला. तिथून पाच मैलावर आमचं गाव हाय. पातेरं-पोतेरं. गांवाबाहेरूनशान दोन मैलांवर नदी वाहते. अन् नदीवर लई मोठा ढव हाय ढव!" काशी मध्येंच बोलायच्या आंत 'ढव' म्हणजे 'डोह' असें ओठानीं त्या उच्चाराची खूण करून मीं तिला सुचविलें.

"त्या ढवाला हडळीचा ढव म्हत्नयात. ढवाच्या वरल्या अंगाला यमाईचें देऊळ हाय. आमी त्या गांवचे पाटील. आम्हाला हडळे पाटील म्हनत्यात. दर अवसेला साजच्या पारीं यमाईच्या देवळात पाटलाच्या घराला सात पानांचा निवेद वाढून ठिवावा लागतो. सात पानांवर गुलालभाताचे सात मुटके, सात लिंबे अन् कणकीचे सात दिवे."

"प्रत्येक अवसेला?" आईनें मध्येंच विचारलें.

"व्हय ना. अगदीं दर अवसंला. दिवेलागणीच्या आत." फुली गंभीर चेहरा करून म्हणाली. "दिवेलागण झाली अन् काळोख पडला, म्हणजे तिथं जायची सोय न्हाई. पाचकोशींतल्या साऱ्या हडळी तिथं जमाया लागत्यात. रातीं बारा वाजतां यमाईच्या देवळांत हडळींची सभा का जत्रा भरते म्हनत्यात."

"अजून?" चंप्याच्या तोंडून एकदम शब्द निसटले. तो घाबरून माझ्याकडे बघू लागला.

"हा, हां, अजून! किती वरसं झाली तवापासून!" वर्षांची संख्या दाखविण्यासाठीं आपला डावा हात डोक्याच्या वर उडवीत फुली म्हणाली, "माझ्या आज्याच्या बापाचा खापरपनजा भीमा हाडळे म्हनूनशान व्हता. त्याच्या आधींपून म्हना कीं!"

"पण दर अवसेला यमाईच्या देवळांत सात दिवे लावायचा अन् सात नैवेद्य ठेवायचा तुमचा काय संबध?" मला राहवेना म्हणून मीं शेवटीं विचारलें.

"त्येच तर मी सांगतेय कीं! ह्या आमच्या भीमा हाडळयाचीच गोष्ट ती. माझ्या आजीन मला सागितली. भीमा आमच्या आजीच्या आजेसासऱ्याचा पणजेसासरा. भीमा कुस्ती खेळण्यात लई हुषार व्हता म्हनत्यात. साऱ्या पाचकोशींत त्याला जोड नव्हती. म्हस्कोबाच्या जत्रेत कणगीएवढा ढोल गळयात बाधून साऱ्या रातभर वाजवत नाचायचा; पट्टा काय खेळायचा; घोडयावर काय बसायचा अन् ह्या हडळींच्या ढवात तर दोन दोन तास म्हणत्यात बुडी मारून-शान बसायचा!

गांवच्या कुलकर्ण्यांचा पोर व्हता त्याच्या वाइटावर. त्यो एक दिशीं भीमाला म्हणाला, 'भिम्या, एवढ्या छातीचा लेका तूं, मग अवसंच्या रातीं यमाईच्या देवळात सात दिवे लावून यायची हाय का तुझी छाती?' भीमा म्हणाला 'लावून आलो तर काय देशील?' कुलकर्ण्यांचा त्योक म्हणाला, 'चादीचा तोडा करून तुझ्या पायात घालीन.' भीमा म्हणाला, 'ठीक हाय.'

दोन दिसानीं आवस आली. भीमा आईला म्हणाला, 'आय, आज रात्रीं बारा वाजता मी यमाईच्या देवळात सात दिवे लावून येणार हाय.' आई म्हणाली, 'लेका, मरायचंय काय रे हडळींनीं झपाटून?' भीमा म्हणाला, 'कुळकर्ण्यांच्या पोराशीं पैज मारलीया मीं. हडळी काय करत्याल मला?' आई म्हणाली, 'जायचं तर जा. पण पाढऱ्या घोडीवर बसून जा. पायीं जाऊं नगस. घोडयावर माणूस बसलं म्हंजी हडळीचं काय चालत नाय.'

रात झाली. भीमानें डोक्याला पटका बांधला. पडवींतून पाढरी घोडी बाहेर काढली. अन् आईला म्हणाला, 'जातो ग मी आय.' आई म्हणाली, 'थाब.' तिनें हातांत तूप न् हिंग आणला. अन् पांढऱ्या घोडीच्या साऱ्या अंगाला फासला. अन् म्हणाली, 'हडळीं चेटूक करत्याल. पन ह्या हिंगाचा वास विसरूं नगस!' भीमा आईच्या पायां पडला अन् पाढऱ्या घोडीवर टांग मारून चौखूर निघाला.

यमाईचें देऊळ होतं गांवापासून दोन मैल लांब. बरोबर बारा वाजता भीमा तिथं पोहोंचला. पाढरी घोडी त्यानं झाडाला बांधली. इकडं पाहिलं न्हाई. तिकडं पाहिलं न्हाई. सरळ आपला देवळांत शिरला. सात दिवे लावले. यमाईच्या पाया पडला. कपाळाला अंगारा लावला अन् तसाच मागल्या पावलीं देवळाबाहेर पडला. पघतो तों वीस झाडाना वीस पाढऱ्या घोड्या बांधल्या व्हत्या. भीमा पहातच राहिला. पण घाबरला नाहीं. त्यानं समद्या घोड्यांच्या अंगाचा वास घेतला. ज्या घोड्याला हिंगाचा वास येत होता, त्या घोड्यावर

त्यानं टांग मारली अन् त्याला जोरानं पिटाळलं. त्यासरशीं बाकीच्या समद्या घोड्यांच्या हडळीं झाल्या, अन् त्या झिंज्या पिंजारून आरडतओरडत भीमाच्या पाठीमागं लागल्या.

गावची येस येईपतोर भीमानं मागं मुळीं पघितलंच न्हाई. येशीच्या आल्याड एक पिंपळाचं झाड व्हतं. त्याच्या खाली एक यीस वरसाची तरणीताठी पोरगी मोठमोठ्यानं रडत बसली व्हती. तवा भीमान घोडी उभी केली अन् त्या पोरीला विचारलं? 'काय ग बया, कां रडतेस?' पोरगी म्हणाली, 'काय सांगूं बाबा, एका लगिनाच्या वऱ्हाडात आलें. तहान लागली म्हणून पाणी प्यायला खाली उतरून विहिरीवर गेलें, तों समद्या गाड्या निघूनशान गेल्या.' भीमा म्हणाला, 'माझ्याबरोबर घरीं चल. घरात माझी आय हाय. रातभर घरात झोप. सकाळच्या पारीं तुला सांगशील तिथं पोचवीन.'

तशीं ती पोरगी उठली अन् भीमाच्या मागं घोडीवर बसूं लागली. भीमा म्हणाला, 'माग नग बसूंस, पुढ बस.' पोरगी म्हणाली, 'मी पुढं नाय बसणार. मागंच बसणार.' पोरगी ऐकेना, अन् भीमाबी ऐकेना. भीमा रागावला; म्हणाला, 'लई हट करशील तर मारीन मुस्काटांत!' खवाट्याला धरून भीमानं तिला वर उचललं अन् आपल्या म्होरं बसवलं. घोडीला टाच मारली. घोडी वेशीवर आली. पण ती येस कांहीं ओलाडीना. पुढं पळते अन् मागं जाते. पुढं पळते अन् मागं जाते.

भीमा खाली वाकून म्होरं पाहूं लागला. तों पुढं बसविलेल्या पोरीचं पाय खालीं जमिनीला लागल्याती. अन् घोडीच्या पायांत मागंपुढं घुटमळत्याती. भीमा एकदम चरकला. मनात म्हणाला, 'हडळ र हडळ!' आतां काय करायचं? त्यान मागं पघितलं. तों हडळींची पलटन अगदीं जवळ येऊनशान पोचली व्हती. भीमानें चटकन् खिशांतून चाकू काढला. अन् पोरीचा बुचडा खसकन् कापून खिशांत घातला. तवा त्या पोरीचं पाय एकदम लहान झालं. अन् येस ओलांडून पाढरी घोडी गांवांत आली.

आई वाट पघत बसलीच होती. भीमा घोडीवरून खालीं उतरला. हडळीच्या पोरीला त्यानं खसकन् खालीं ओढलं अन् तिला म्हणाला, 'सटवे, पड माझ्या आयच्या पायां!'—आई म्हणाली, 'कोण रे ही?' भीमा हसूनशान म्हणाला, 'तुला सून आणलिया ही हडळ!' आई म्हणाली, 'शाबास रे माझ्या ल्योका, नांव मिळवलंस. आतां ठेव हिला कोलदांडा घालून घरांत.' भीमानें हडळीचे कापलेले

केस अंगणांतल्या खांबाच्या माथ्याला भोक पाडून त्यांत घातले, अन् वरून मेण लावून बद केलं. मग काय करते आहे ती हडळ! तिची अगदीं गाय झाली.

दुसऱ्या दिशीं भीमानं साऱ्या गावाला जेवण घालून हडळीशीं लगीन केल. कुळकर्ण्याच्या पोरानं त्याच्या पायात चादीचा तोडा घातला. तवापून लोक त्याला 'हडळे पाटील' म्हणू लागले. भीमान हडळीशीं वीस वरस ससार केला. त्याला तीन मुलगे अन् तीन मुली झाल्या. सकाळपासून संध्याकाळ-पत्तोर घरातलं समदं काम एकटी ती हडळ करायची. सकाळीं उठून चुलीत हातपाय घालून ती चूल पेटवायची. कधीं घरात भाजी नसली म्हणजे आपल्या हातापायाचीं बोटं तोडून त्याची ती भाजी शिजवायची. पोटरीचं कातड ओरबाडून त्याची ती चटणी बनवायची—"

"आई ऽ ग!" अंगावर चारदोन झुरळें चढावींत तशी काशी एकदम ओरडली.

"पण चुलीत हातपाय घालून तिचे हात नाहीं जळायचे?" चंप्यानें तोंड वासून विचारलें.

"अन् हातापायाचीं बोटं तोडून मग तिला काम कसं करतां यायचं?" काशीनें लागोपाठ दुसरा प्रश्न केला.

"अग, ती हडळ होती ना?" फुली बोलायच्या आंत आईनें शांत आवाजांत खुलासा केला. "हडळीचे हातपाय जळत नाहींत, अन् बोटं तोडली तर पुन्हा उगवतात—"

"हं, पुढं साग–थांबू नकोस" मीं अधीरतेनें फुलीला सुचविलें.

"भीमाच्या घरांत यीस वरसं हडळीनं अगदीं गुरासारखं काम केलं." फुली पुढें सागू लागली, "एक दिस ती अंगणांतल्या खांबाला रवी बांधूनशान डेऱ्यात ताक घुसळत व्हती. पावसाच्या पाण्यानं तो खांब गेला होता कुजून. ताक घुसळतां घुसळता खांब एकदम कचकला आणि मोडून खालीं पडला. त्या धक्क्यानं त्याच्या माथ्यावर दडवूनशान ठिवलेले हडळीचे केस एकदम बाहेर पडले. हडळीनं ते उचलले नि आपल्या ओच्यांत घालून ठिवले.

यीस वरसांनीं तिचं केस तिला परत मिळालं. तवा ती पुन्हा पाहिल्या-सारखी हडळ झाली. दुपारीं ती नवऱ्याला म्हणाली, 'कारभारी! यमाईच्या पायां पडायला आज चला कीं—लई दिस झाले, यमाईला आपुन गेलों नाहीं.' भीमा म्हणाला, 'ठीक हाय.' भीमानें खिल्लारी बैलांची उघडी गाडी जुंपली. आंत हडळ आनि तिचीं सहा पोरं बसली. भीमानें गाडी गांवाबाहेर काढली

हडळ म्हणाली, 'कारभारी, आतां तुम्ही दमलां असाल. वाईच मी गाडी हाकतें!' हडळीनें बैलाचा कासरा नवऱ्याच्या हातातून आपल्या हातात घेतला. ओच्यातले केस हळूच काढून डोक्याला लावले. त्याबरोबर ते पुन्हा जसेच्या तसे चिकटले. ती गाडींत उभी राहिली अन् बैलाच्या पाठीवर आसूडाचे फटकारे मारीत तिन अशी काहीं गाडी चौखूर पिटाळली म्हणताय कीं काहीं विचारूं नका. पोरं मोठमोठ्यानं किचाळाया लागली, 'अग आय, हळू गाडी हाण हळू गाडी हाण—' भीमा ओरडला, 'कारभारनी, तुला येड तर नाहीं लागलं?' पण हडळ कसली ऐकते हाये?

भीमा तिच्याकडे डोळे वासून पाहूं लागला—तों काय? त्याच्या बायकोची एकदम ताडमाड हडळ झाली होती. तिच्या केसाच्या झिंज्या पाठीवर उडत होत्या. अन् ती आपले लालभडक डोळे गरगर फिरवत अन् मोटमोठ्यानं हसत खिदळत अन् ओरडत बैलांच्या पाठीवर सपासप आसूड ओढीत व्हती. भीमाची छातीच फाटली. गाडी धाड धाड उडत व्हती. हडळीला आवरावं का पोरांना वाचवाव हें भीमाला कळेना. त्यानं आपली साही पोर दोन्ही हातांनीं छातीशीं आवळून धरली व्हतीं.

यमाईचं देऊळ आलं, तरी गाडी थाबेना. गाडी पुढंच चालली. भीमा ओरडला, 'अग रांड, पुढं ढव आहे. गाडी थांबव—' पण हडळ कसली ऐकते हाये? गाडी देवळामागच्या दरडीवर चढली, अन् एकदम खालच्या ढवात जाऊन धाडकन् पडली. पोरांच्या नाकातोंडात पाणी जाऊन तीं बुडूं लागलीं. हडळ आनदानं किंचाळून त्यांना आणखी बुडवूं लागली. पण भीमानं तिच्या कचाट्यांतून एक मुलगा अन् एक मुलगी कशीं तरी सोडवून बाहेर आणलीं. बाकीचीं चार मुलं बिचारीं ढवांत बुडून मेलीं.

भीमा दांतओठ खात हडळीला म्हणाला, 'पोरांना ठार मारलंस, टवळे! आतां भरलं तुझं पोट?' हडळ शाप देत म्हणाली, 'हडळीबरोबर संसार करायला पाहिजे व्हता ना तुला? घे हें त्याचं फळ. हडळीचा वंश कधीं जगतो काय रे?' तेव्हां भीमा ओरडून म्हणाला, 'सटवे, माझा एवढा पोरगा अन् पोरगी तरी जगूं दे!' तेव्हां हडळ म्हणाली, 'दर अवसेला यमाईला गुलाल-भाताचे सात मुटके, सात लिंबं अन् सात कणकीचे दिवे लावीत जा, म्हणजे तुझ्या हडळीच्या वंशांतला एक मुलगा अन् एक मुलगी वांचत जाईल!'

तवापासून आमच्या हडळे घराण्यांत दर अवसेला आम्हांला यमाईला हा निवेद

अगदीं नेमानं ठिवावा लागतो. अन् काय सांगू आई—" फुली आमच्या आईकडे वळून गंभीर स्वरात म्हणाली, "ती हडळ म्हणाली ना, तसं आतां पत्तोर होतय बघा. आमच्या घराण्यात कितीबी पोरं न् पोरी का झाल्या, तरी त्यांच्यांतलं एकच पोरग अन् एकच पोरगी जगतीया. बाकीचीं समदीं मरून जात्यात."

फुली थाबली. तिची गोष्ट संपली. क्षणभर कोणी बोललं नाहीं. काशी, चंप्या अन् मी एकमेकांकडे टकमक टकमक पाहात राहिलों. काय बोलावें ते आम्हाला सुचेना.

इतक्यात रामाच्या देवळातला चौघडा वाजूं लागला; तशी 'लई उशीर झाला' असें पुटपुटत फुली चटकन् उठली व तिनें आपला फाटका पदर डोक्यावरून ओढला.

आई म्हणाली, "फुले, उद्यां सकाळीं लौकर ये. उशीर करूं नकोस, बरं का."

काहीं तरी आठवलें म्हणून मी एकदम बोललो, "फुले, तुला ग भाऊबहिणी किती आहेत?"

फुली थबकली अन् वळून म्हणाली, "मस झाली व्हतीं माझ्या अदुगर अन् पाठीवर, पन् समदीं गेलीं. एक भाव हाय थोरला त्योच हाय आमच्या गांवाला पाटील."

इतक्यांत आमचे वडील बाहेरून आंत आले; तेव्हां फुली लाजली अन् अंग चोरून चटकन् बाहेर पळाली.

वडील म्हणाले, "काय रे, इतका वेळ कशाला जागत बसलां आहांत?"

चंप्या म्हणाला, "भाऊ, अहो फुलीनं किनई आम्हाला हडळीची गोष्ट सांगितली."

"अन् बरं का भाऊ," काशी हलक्या आवाजांत म्हणाली, "आपली फुली किनई हडळीच्या वंशातली आहे."

"फुली ना!" वडील शातपणें म्हणाले, "असेल—असेल ती हडळीच्या वंशांतली बरं का? तिच्या चेहऱ्यावरून वाटतं खरं तसं!"

* * *

# १२ बाळंतीण

माझ्या आजोबांना गोष्टी सांगण्याचा भारी नाद असे. त्यांतून भुतांच्या गोष्टी सागण्यात तर त्याचा विशेष हातखंडा होता. ते ज्या भुताच्या गोष्टी सागत, त्यामधल्ीं बहुतेक सर्व भुतें 'आपण अगदीं डोळ्यानीं पाहिली' असें छातीवर हात मारून ते सागत असत. ह्या भुतांच्या गोष्टी पुन्हा पुन्हा त्याच्या तोंडून शेकडों वेळा ऐकल्यामुळें आजोबांनीं प्रत्यक्ष डोळयांनीं पाहिलेल्या सर्व भुतावळींशीं माझी अगदीं जानी दोस्ती झाली होती. त्यामुळें पुढें पुढें भुताचें भय मला अगदीं वाटेनासें झालें.

आजोबांनीं सागितलेल्या सर्व गोष्टींपैकीं एका बाळंतीणबाईची जी एक विलक्षण गोष्ट सांगितली, तिचा माझ्या मनावर सर्वांत जास्त परिणाम झाला. इतकीं वर्षें झालीं तरी ती गोष्ट माझ्या स्मरणातून अद्यापि गेलेली नाहीं. आजोबाच्या तोंडून ती गोष्ट मीं जशी ऐकली तशीच ती तुम्हाला सागतो.

हातातल्या आडकित्त्यानें सुपारी कातरत कातरत एके दिवशीं संध्याकाळीं आजोबा म्हणाले:

त्या वेळीं मी काहीं तरी वीसपंचवीस वर्षांचा असेन. एका कंत्राटदाराच्या हाताखालीं महिना दहा रुपयांवर हिशेबठिशेब लिहिण्याच्या कामावर होतों. त्यामुळें कंत्राटदारानें जेथें जेथें कंत्राटाचें काम घेतलें असेल तेथें तेथें जाऊन मला राहावें लागत असे.

एकदां आमच्या ह्या मालकानें दौंड-मनमाड रेल्वेच्या फाट्यांवर खडी टाकण्याचें कंत्राट घेतलें. तेव्हां मजूर लोक गोळा करण्यासाठीं मी एके दिवशीं आगगाडीनें मनमाडला गेलों. मनमाडच्या स्टेशनावर जेव्हां मी उतरलो, तेव्हा अशी दिवेलागणीची वेळ झाली होती. गांवांत माझ्या ओळखीचें कुणीच नव्हतें. तेव्हां आतां रात्रीचा मुक्काम कुठें करायचा याचा विचार करीत करीत मी

स्टेशनातून बाहेर पडलों. दुपारीं मीं गाडींत खाल्लें असल्यामुळें रात्रीं मला कांहीं जेवायचें नव्हतें. तेव्हा रात्रीं झोपण्यापुरती जागा मिळण्यापलीकडे मला दुसऱ्या कुठल्याही गोष्टीची जरुरी नव्हती.

स्टेशनापासून एका फर्लांगाच्या अंतरावर एक हलवायाचें दुकान होतें. तेथें दुकानाच्या फळींवर एक माणूस विडी ओढीत बसलेला मला दिसला. मी त्या गावात नवखा माणूस आहें हें त्यानें मला पाहून चटकन् ओळखलें. तोंडांतली विडी बाहेर काढून त्यानें मला विचारलें, 'काय पाहुणे, कुठच्या गावचे तुम्ही ?' त्याबरोबर कुणी तरी बोलायला आपल्याला माणूस मिळालें म्हणून मला अतिशय आनंद झाला. आणि मी त्या दुकानाच्या फळींवर जाऊन टेकलो. मी कोण आहें आणि कशासाठी तेथें आलों, हें त्याला सांगितलें.

'कुठें एकादें तुमच्या माहितीचें ब्राह्मणाचें घर असलें तर मला सांगा. म्हणजे रात्रीचा मुक्काम करायला मला बरें पडेल !' मी म्हणालो. 'तुम्हाला एक रात्रभर झोपायलाच जागा पाहिजे ना ?' तो म्हणाला, 'मग गावात कशाला जायला पाहिजे ? हें समोर मारवाड्याचें तीनमजली घर दिसते आहे ना ? तिथेच एका खोलीत मी तुमची झोपायची व्यवस्था करून देतो म्हणजे झालें ! मारवाडी गेला आहे देशावर आणि त्यानें घराची किल्ली माझ्याकडे ठेवून दिली आहे.'

मीं समोर अंधारात पाहिलें तेव्हा मला त्या तीनमजली घराचा उंच आराखडा दिसून आला. एकाद्या चाळीसारखे मला तें घर दिसलें. तळमजल्याला एकदोन खोल्यांत उजेड दिसत होता. पण दुसऱ्या आणि तिसऱ्या मजल्यावर अगदीं अंधारगुडुप होते. तें पाहून मला जरा आश्चर्यच वाटलें. मीं त्या माणसाला विचारलें, 'काय हो, वर कुणी राहात नाहीं वाटतें ?'

तो माणूस म्हणाला, 'उगाच वाटेल तसे पैसे खर्चून या मारवाड्यानें हें भलें मोठे घर बांधून ठेवलें आहे. पुण्या-मुंबईसारखे इथे थोडेच भाडोत्री मिळणार आहेत ? मीं त्याच वेळीं त्या मारवाड्याला सांगितलें, पण त्यानें माझें ऐकलें नाहीं. हें घर बांधून दहा वर्षे झालीं. ह्या सबंध दहा वर्षांत गेल्या चारदोन महिन्यात हे तळमजल्यावर थोडेसे भाडेकरू मिळाले असतील तेवढेच काय ते ! बाकीची इमारत बांधल्यापासून अशी मोकळी पडली आहे.'

'तो मारवाडी इथें राहात नाहीं वाटतें ?' मीं विचारलें.

'छे, हो !' विडीचें विझलेलें थोटूक फेकून देऊन तो माणूस म्हणाला, 'पांच वर्षांपूर्वी या घरांत त्याची बायको मेल्यापासून पुन्हा तो इकडे फिरकलासुद्धां नाहीं !'

अर्धा-पाऊण तास अशा तऱ्हेनें दुकानाच्या फळीवर गप्पा मारल्यानंतर हलवायाच्या दुकानांतून एक कंदील घेऊन आम्ही त्या समोरच्या इमारतींत गेलों.

तो माणूस म्हणाला, 'तिसऱ्या मजल्यावरची एक खोलीच मी तुम्हाला उघडून देतों. म्हणजे हवाही चांगली येईल आणि तुम्हांला झोपही उत्तम येईल!'

त्याप्रमाणें दोन जिने चढून आम्ही तिसऱ्या मजल्यावर गेलों. तो माणूस म्हणत होता त्याप्रमाणें तिसऱ्या मजल्यावर खरोखरच हवा चांगली येत होती. मला त्या माणसानें जी खोली उघडून दिली ती आतून खरोखरच फार चागली होती. तिथें कोपऱ्यात एक खाट पडलेली होती. माझ्याबरोबर एक लहानशी वळकटी मीं घेतली होती. ती मीं त्या खाटेवर पसरली. आणि त्या माणसाला मी म्हणालों, 'आता तुम्हाला जायला हरकत नाहीं. फार चागली सोय करून दिलीत बुवा तुम्हीं! अगदीं देवासारखेच मला भेटला म्हणायचे! तुम्ही नसता तर माझी भारीच पंचाईत झाली असती.'

तथापि तो माणूस गेला नाहीं. चागला अकरा-बारा वाजेपर्यंत सटरफटर गप्पा मारीत तो तिथें बसला. शेवटीं झोपेनें माझे डोळे जेव्हां मिटायला लागले, तेव्हां तो माणूस समजला आणि 'सकाळीं उठवायला येतों' असें सागून तिथून निघून गेला.

तो गेल्यावर मीं दिवा विझवला आणि खाटेवर जाऊन पडलों. मला केव्हां झोप लागली तें कळलेंच नाहीं, इतका मी दिवसाच्या प्रवासानें दमून गेलो होतो. माझी झोप अतिशय गाढ आहे. एकदां लागली म्हणजे सकाळ-पर्यंत क्वचितच मी जागा होतो.

पहाटे दीड-दोनचा सुमार असेल. शेजारच्या खोलींतून कुणी तरी तहानें मूल मोठमोठ्यानें रडतें आहे असा मला भास झाला. पुष्कळ वेळपर्यंत आपल्याला हें स्वप्नच पडतें आहे असें मला वाटलें. पण जसजसें त्या मुलाचें रडणें वाढू लागलें तसतसा मी झोपेतून हळूहळू जागा होत गेलों. अंधारांत डोळे उघडून आणि कान देऊन ऐकूं लागलों तों खरोखरच शेजारच्या खोलीं-तून एक तहानें मूल मोठमोठ्यानें किंचाळून रडत होतें.

बराच वेळ मी तसाच खाटेवर पडून होतों. त्या मुलाचें रडणें आतां थांबेल मग थांबेल असें मला वाटत होतें. पण चांगलीं दहापंधरा मिनिटें झालीं तरी तें रडणें थांबेना. तेव्हां मग मी खाटेवरून उठलों आणि काय प्रकार

आहे तो पहावा म्हणून बाहेरच्या व्हरांडयांत गेलों. पलीकडच्या खोलीचें दार उघडेंच होतें. आणि आतून मिणमिणत्या दिव्याचा अंधुक उजेड बाहेर येत होता. माझ्या खोलीच्या दारासमोर उभा राहून मी शेजारच्या खोलीमध्यें डोकावून बघूं लागलो. तो आत एक बाळतीण बाई आपल्या रडणाऱ्या मुलाला झोपवण्याचा एकसारखा प्रयत्न करीत आहे असें मला दिसलें.

त्या बाईनें डोक्यावरून लुगड्याचा पदर घेतला होता. त्यामुळें तिचा चेहरा मला कांहीं नीट दिसला नाहीं. पण तिचा रंग गोरा असावा आणि तिचे गाल बसके असावेत असें मला त्या अंधुक प्रकाशात दिसलें. अनोळखी बाईशीं एकदम कसें बोलावें, या विचारानें मी थोडा थबकलों, पण क्षणभर मनाचा निश्चय करून मी शेवटीं म्हणालो, 'काय झोपत नाहीं वाटते मूल?'

त्याबरोबर ती बाई वळून दरवाज्यात आली आणि आपल्या दोन्ही हातानीं ते मूल माझ्यापुढें धरून मला अगदी कळवळून म्हणाली, 'तुम्ही तरी याला झोपवा हो! मी त्याची समजूत करून अगदीं कंटाळून गेलें.'

त्या बाईनें तें मूल पुढें केल्यावर मग मला तें हातात न घेणें अशक्यच होतें. बाकी आईला जे मूल शात करतां येत नव्हतें तें मला थोडेंच शात करता येणार? पण काहीं तरी प्रयत्न करायचा म्हणून मीं त्या मुलाला हातावर घेतलें आणि खांद्यावर धरून त्याला झोके दिल्याप्रमाणें मागेपुढें हालवूं लागलो. आणि आश्चर्याची गोष्ट अशी कीं, दोन मिनिटाच्या आतच ते मूल एकादी जादू व्हावी तसें एकदम झोपी गेलें.

माझ्या अंगांत रडणाऱ्या मुलांना शांत करण्याचा हा अद्‌भुत गुण आहे हें बघून माझे मलाच आश्चर्य वाटलें. दरवाज्यात शातपणें उभ्या असलेल्या आईच्या हातात त्या मुलाला अलगदपणें मीं ठेवलें. ती काहीं बोलली नाहीं. तिनें नुसतें हसल्यासारखे माझ्याकडे पाहिलें आणि आतून दार लावून घेतलें. गॅलरींत कठड्याला टेकून वारा घेत मी थोडा वेळ उभा राहिलों. आणि नंतर खाटेवर पुन्हा जाऊन झोपलों. त्यानतर बऱ्याच वेळानें मला झोप लागली.

दुसरे दिवशीं उन्हें बाहेर पडली तरी मी उठलों नाहीं. मला त्या खोलीत आणून झोपवणाऱ्या माणसानें जेव्हां दंडाला धरून अगदीं गदगदां हलवलें तेव्हां कुठें मी जागा झालो.

'काय हो,' तो माणूस हसून म्हणाला, 'चांगलेच पट्टीचे झोपणारे दिसता कीं तुम्ही!'

मी डोळे चोळीत चोळीत म्हणालों, 'त्या शेजारच्या खोलींतल्या पोरानें रात्रीं रडून रडून असा काहीं त्रास दिला कीं सांगतां सोय नाहीं.'

एकादा विंचू चावावा तसा तो माणूस एकदम टुणकन उडी मारून म्हणाला, 'शेजारच्या खोलींतल्या पोरानं! अहो, काय सांगता काय?'

त्यावर मी हसून म्हणालों. 'चांगलेच बनवता आहात कीं राव तुम्ही मला! शेजारच्या खोलीत ती कोण एक बाळंतीण बाई तर राहते आहे. आणि तुम्हीं मला काय सांगितलंत कीं ह्या मजल्यावर कुणीच राहात नाहीं म्हणून!'

त्यावर त्या माणसानें माझा हात धरून मला ओढीत ओढीत बाहेर व्हराड्यात आणलें. आणि शेजारच्या खोलीच्या दरवाज्याकडे बोट दाखवून विचारलें, 'बघा, इथें कोणी राहतें आहे का?'

मीं दरवाज्याकडे पाहिलें तो खरेंच त्या दाराला कुलूप लावलेलें होतें.

मी आश्चर्यानें थक्कच झालों. मी त्या माणसाचा दंड धरून म्हणालों, 'मी तुमच्या गळ्याशपथ सांगतों कीं, ह्या ठिकाणीं ह्या खोलीत रात्रीं मीं एक बाळंतीणबाई पाहिली. आणि तिचें रडणारें मूल मीं माझ्या खांद्यावर घेऊन झोपवलें आणि तिच्या हातात पुन्हा तें परत दिलें.'

त्यावर दांतखिळी बसावी तसा तो मनुष्य थरथर कांपत माझ्याकडे पांच मिनिटें पाहातच राहिला.

मीं त्याला विचारलें, 'कां हो, असे काय बघतां?'

त्यावर तो घोगऱ्या आवाजांत म्हणाला, 'अहो, काल तुम्हांला जी मारवाड्याची बायको मेली म्हणून मीं सांगितलें तीच ही! बाळंतपणात तीं आणि तिचें मूल ह्याच खोलीत मेलें!'

त्या माणसाचे ते शब्द ऐकताच झीट यावी तसा मी एकदम तेथल्या तेथें बेशुद्ध पडलों. त्यानंतर चांगला सहा महिने मी अंथरुणाला खिळून पडलो होतो.

हातातील कातरलेली सुपारी तोंडात टाकून आजोबा म्हणाले, "लहान मुलाचें कां होईना, पण एक भूत ह्या माझ्या खांद्यावर मीं खेळविलें आहे; चेष्टा नाहीं!"

★ ★ ★

# १३ पिलंभट स्वर्गाला कसा गेला?

पिलंभटासारखा लबाड आणि भाडखोर माणूस साऱ्या गांवामध्यें दुसरा कोणी झाला नसेल. त्याचा सारा जन्म गावामधल्या लोकाशी भाडण्यात आणि त्याना फसविण्यात गेला. मूळचे तो भिक्षुक होता. पण उभ्या आयुष्यात त्यानें कधीं भिक्षुकी केली नाहीं. आपण सावकारी करतो असें तो बाहेरून भासवी. पण कर्जाच्या आशेनें आलेल्या गरीब आणि भोळ्या बायाबापड्याना आणि गरजू शेतकऱ्याना फसवून आणि त्याच्याकडून खोटे कागद लिहवून घेऊन त्याचे दागदागिने, घरे आणि शेतें आपल्या घशात घालावयाचीं, हा त्याचा कित्येक वर्षांचा धंदा होऊन बसला होता.

अशा तऱ्हेनें त्यानें किती संपत्ति जमा करून ठेवली होती ह्याची बाहेरच्या लोकाना तर राहू द्याच, पण खुद्द त्याच्या बायकोला आणि मुलानासुद्धा कल्पना नव्हती. उभ्या गावाशीं पिलंभटाचें वैर होते. त्याचें नाव उच्चारलें कीं गावातले लोक त्याला शिव्या द्यावयाला लागत. गावाबाहेर एक पडकी बखळ होती. त्या ठिकाणीं पिलभटाचें घर होतें. तेथें तो एकाद्या महारोग्यासारखा एकटा राहात असे. गावातले लोक कोणीही त्याच्या घरात जात नसत, आणि कोणीही त्याला किंवा त्याच्या बायका-मुलाना आपल्या घरीं बोलावीत नसत.

पिलंभटाचें गावाशीं एवढें शत्रुत्व होतें तरी कोणाही गावकऱ्याच्या कचाट्यात तो कधींही सापडला नाहीं. कायद्याचें कांहीं तरी किटाळ त्याच्यावर निर्माण करून त्याला त्यामध्यें अडकविण्याचा पुष्कळानीं प्रयत्न केला. पण पिलभट इतका हुषार आणि हिकमती होता कीं तो कायद्याच्या कचाट्यात कधींच सापडला नाहीं. तशी पिलभटाची बुद्धिमत्ता असामान्य होती असेंच म्हटलें पाहिजे.

कालांतरानें पिलंभट वृद्ध झाला. आपला अंतकाळ जवळ आला असें त्याला वाटू लागलें, आणि त्याबरोबर त्याला एक निराळीच विवंचना लागून राहिली.

आपण ज्याअर्थी जन्मभर एवढीं दुष्कृत्यें केलीं आहेत, त्याअर्थी मेल्यानंतर आपण स्वर्गात जाणें अशक्य आहे असें त्याच्या मनानें घेतलें, आणि कांहीं तरी युक्ति करून मेल्यानतर आपल्याला स्वर्गात कसें जातां येईल ह्याचा विचार तो करूं लागला.

स्वर्गात जायचें म्हणजे इथें आयुष्यांत कांहीं तरी आपल्या हातून सत्कृत्य घडावयाला पाहिजे हें पिलंभटाला माहीत नव्हतें असें नाहीं. पण पिलंभटाच्या हातून सत्कृत्य तें काय घडणार? तें अगदी अशक्यच होतें. इतक्यांत सत्कृत्य करण्याचा एक योग पिलंभटाकडे आपोआप चालत आला. झालें काय कीं पिलभटाची म्हातारी गाय आजारी पडली. घटका दोन घटकांची ती सोबतीण उरली. तें पाहताच पिलंभटानीं धावपळ करून गावातल्या एका ब्राह्मणाला घरीं बोलावून आणलें. आणि त्याला सागितलें कीं, "भटजीबुवा, ही माझी गाय तुम्हाला दान देण्याची माझी इच्छा आहे. हिचा स्वीकार करा आणि मला आशीर्वाद द्या."

मरणाच्या दारीं पडलेली ती गाय पाहून ब्राह्मण म्हणाला, "पिलंभट, तासाभरानें मरणाऱ्या ह्या तुमच्या गाईचें दान घेऊन मी काय करूं? हिला माझ्या घरीं तरी घेऊन जातां येणें शक्य आहे काय? माफ करा. मला तुमचें हें दान स्वीकारता येत नाहीं!"

ब्राह्मणाचें तें उत्तर ऐकून पिलंभट भयंकर संतापला. पलीकडे एक कुऱ्हाड पडली होती. ती त्या ब्राह्मणाच्या अंगावर उगारून पिलभट रागानें म्हणाला, "पाजी माणसा, मी येथें एक सत्कर्म करावयाला सिद्ध असताना तूं त्याला विरोध करून त्याचें जें पुण्य माझ्या पदरांत पडणार आहे तें हिरावून घेतोस काय? मी तुला बजावून सागतों, तूं हें गाईचें दान जर स्वीकारलें नाहींस, तर मी ह्या कुऱ्हाडीनें तुझीं खांडोळीं करून टाकीन!"

ब्राह्मणाला पिलंभटाचा स्वभाव माहीत होता. तो मनातल्या मनांत घाबरला. खरेंच हा राक्षस आपलीं खाडोळीं करून टाकावयाचा. तेव्हा त्याच्या मरतुकड्या गाईचा स्वीकार करण्यावाचून त्याला गत्यंतरच उरलें नाहीं. त्यानें त्या गाईचा स्वीकार केला आणि मनांतल्या मनात शिव्या देत पिलंभटाला आशीर्वाद दिला.

नंतर तो ब्राह्मण ती गाय घराकडे हळूहळू घेऊन जात असतांना वाटेंतच ती गाय मरून पडली. तिचें और्ध्वदेहिक करण्यासाठीं त्या ब्राह्मणाला पदरचे

पुष्कळच पैसे खर्च करावे लागले. तथापि ब्राह्मणाला गाईचें दान करून आपण एक मोठे सत्कृत्य केलें याबद्दल पिलंभटाला मनामधून मात्र अतिशय संतोष झाला.

काहीं दिवसांनीं पिलंभट फार आजारी पडला. एकदोन दिवसात आपण जाणार अशी त्याची खात्री झाली. तेव्हा त्यानें आपल्या दोघा मुलाना आपल्या बिछान्याजवळ बोलावलें. क्षीण आवाजात पिलंभट मुलाना म्हणाला, "मुलानो, मी आता फार थोड्या वेळाचा सोबती आहें."

तेव्हा थोरला मुलगा धीर करून म्हणाला, "बाबा, तुम्हीं जन्मभर जमा केलेला पैसा कुठें पुरून ठेवला आहे तो तरी आता सागा. नाहीं तर तुमचा अग्निसंस्कार करावयाला देखील आमच्याजवळ पैसा नाहीं."

"त्याची तुम्ही काळजी करूं नका!" पिलंभट खिन्नपणें हसून म्हणाला, "तुमची सर्व व्यवस्था केल्यावाचून मी काहीं मरणार नाहीं. माझ्याजवळ फार पैसा आहे, ही तुमची कल्पना चुकीची आहे. मीं पैसा पुष्कळ मिळवला. पण ज्या मार्गांनी तो आला त्याच मार्गांनी गेला. तथापि, मी तुम्हाला श्रीमत केल्यावाचून मरणार नाहीं. जरा जवळ या अन् मी काय सागतो तें नीट ऐकून त्याप्रमाणें वागा.

"मी मेलों ही गोष्ट कोणालाही सागूं नका. माझा प्राण गेल्यावर कुऱ्हाड घेऊन माझ्या शरीरावर जखमा करा. आणि माझे प्रेत आपल्या गावचे जे इनामदार आहेत ना, त्याच्या वाड्यासमोर टाकून द्या. दुसऱ्या दिवशीं सकाळीं पोलिस तुमच्याकडे चौकशी करावयाला आले म्हणजे तुम्ही मोठमोठ्यानें रडून आणि छाती पिटून त्याना सागा, कीं काल संध्याकाळपर्यंत आमच्या वडिलाची प्रकृति उत्तम होती. इनामदारानीं बोलावणें पाठविल्यावरून काहीं कामासाठीं घाईघाईनें आमचे वडील त्याच्या वाड्यात गेले एवढेंच आम्हांला माहीत आहे.

"रात्रभर ते घरीं परत आले नाहींत म्हणून आम्ही इकडे काळजींत होतों. इनामदार आमच्या वडिलाच्या वाईटावर होता. त्यानींच त्याचा खून केला असावा असा आम्हांला संशय येतो."

बोलतां बोलता पिलंभटाला दम लागला. कांहीं वेळानें त्याचें प्राणोत्क्रमण झालें.

वडिलांनीं सागून ठेवल्याप्रमाणें पिलंभटाच्या प्रेताला जखमा करून त्यांनीं तें त्या रात्रीं गुपचुप नेऊन इनामदाराच्या वाड्यापुढें ठेवलें, आणि आपण घरीं

येऊन झोपले. सकाळीं गांव जागें झालें. लोक रस्त्यांतून हिंडूं लागले. इनामदाराच्या वाड्यापुढें छिन्नविच्छिन्न स्थितींत पडलेलें पिलंभटाचें प्रेत बघून गांवांत खूपच खळबळ उडाली. आजपर्यंत त्यानें जीं पापकर्मे केली त्याचेंच हें फळ त्याला अशा रीतीनें शेवटीं भोगावें लागलें हें सर्वांना कळून चुकलें आणि त्याना मनातून संतोष झाला.

तथापि, सहजासहजीं कोणाच्या हातीं न सांपडणाऱ्या या बिलंदर माणसाचा खून करण्याचें धैर्य शेवटीं कोणाला झालें असावें ह्याबद्दल मात्र सर्वांना अचंबा वाटून राहिला. पोलिसानीं प्रेत ताब्यात घेतलें आणि चौकशीस सुरुवात केली. मुलानीं आक्रोश करून रात्रीं आपले वडील कांहीं खाजगी कामासाठीं इनामदाराच्या वाड्यात गेले असें सागितलें. त्यामुळें साहजिकच पिलंभटाच्या खुनाचा वहीम इनामदारावर आला आणि पोलिसांनीं त्याला अटक केली.

इनामदाराचा आणि पिलभटाचा अनेक वर्षांचा दावा होता. तेव्हा इनामदारानेंच पिलंभटाचा खून केला असावा अशी गावकऱ्याची खात्री झाली. बिचारा इनामदार! त्याला आपल्यावर असें काहीं बालट येईल ह्याची कल्पना नव्हती. जन्मभर ह्या पिलभटानें आपल्याला छळलें तें छळलेंच. आणि शेवटीं मेल्यानंतरसुद्धा तो अशा रीतीनें बोकाडीं बसला ह्या सतापानें इनामदाराच्या अंगाची अगदीं लाही लाही झाली. तथापि खुनाच्या आरोपात सांपडल्यानंतर तो करणार काय बिचारा!

इनामदाराचा एक विश्वासू नोकर होता. त्याच्यामार्फत पिलंभटाच्या मुलाशीं त्यानीं गुप्त बोलणें चालविलें. आणि शेवटीं आपल्याला पन्नास हजार रुपये जर इनामदारानी दिले तर आपण वडिलाच्या खुनाचा त्याच्यावरचा आरोप मागे घेऊं असें त्यानीं कबूल केलें. त्याप्रमाणें पिलभटाच्या मुलाना पन्नास हजार रुपये देऊन इनामदारानें प्राणावर बेतलेल्या त्या सकटातून आपली सुटका करून घेतली. अशा रीतीनें मरता मरता देखील पिलभटानें दुष्टपणा केला. आणि आपल्या मुलांना चांगले श्रीमंत बनवून तो या जगामधून चालता झाला.

मेल्यानंतर यमाच्या दूतानीं पिलंभटाला पकडून चित्रगुप्ताकडे नेलें. चित्रगुप्तानें पापपुण्याच्या वह्या उघडून त्यांत पिलंभटाच्या सबंध आयुष्याचा हिशेब वाचून पाहिला. त्याच्या दुष्कर्मांची लांबलचक यादी वाचून स्वतः चित्रगुप्तसुद्धां आश्चर्यचकित झाला. तो म्हणाला, "पिलंभट, सबंध आयुष्यांत तुम्हीं पापा-

खेरीज काहींच केलें नाहीं. तेव्हां तुमची रवानगी नरकलोकामध्यें केल्याखेरीज मला गत्यंतरच नाहीं."

आपल्याला नरकात जावें लागणार हें ऐकून पिलभटाच्या अंगाचा थरकाप उडाला. पण तो बोलून चालून पिलभट होता. चित्रगुप्त झाला म्हणून तो त्याला थोडाच घाबरतो आहे? पिलभट शातपणें म्हणाला, "तुमचे हे सारे हिशेब खोटे आहेत. मला यमाकडे जाऊन तक्रार नोदवायची आहे."

पिलभटाचें तें उत्तर ऐकून चित्रगुप्त हबकला. त्याचे पापपुण्याचे हिशेब खोटे आहेत असा आरोप आजपर्यंत त्याच्यावर कोणीं केला नव्हता. चित्रगुप्त पिलंभटाला घेऊन यमाकडे गेला.

यम म्हणाला, "काय भानगड आहे?"

पिलंभट म्हणाला, "मला ह्या तुमच्या कारकुनाविरुद्ध तक्रार करावयाची आहे. त्यानें माझ्या पापपुण्याचा हिशेब बरोबर लिहिलेला नाहीं."

यम म्हणाला, "असें तुम्ही कसें म्हणू शकता? हा चित्रगुप्त हजारो वर्षे माझ्याकडे नोकर आहे. त्याच्या हातून चूक होणें अशक्य आहे."

"हा तुमचा भ्रम आहे भ्रम!" पिलंभट ओरडला, "इतका जर हा तुमचा हुषार कारकून आहे, तर त्यानें माझे पुण्यकर्म ह्या हिशेबात कां नोदवलें नाहीं?"

पिलंभटाचें खातें यमाला दाखवीत चित्रगुप्त म्हणाला, "यानें आपल्या सबंध आयुष्यात एकही सत्कृत्य केलेलें नाहीं तर तें मी कुठून लिहिणार?"

"असं काय? मी आयुष्यात एकही सत्कृत्य केलें नाहीं काय?" चित्र-गुप्तावर दातओठ खात पिलंभट म्हणाला, "अशीं कामें करतां होय तुम्ही लोक? अरे, नीट शुद्धीवर राहून तरी हिशेब लिहीत जा!—"

यम म्हणाला, "हें पाहा भटजीबुवा, रागावण्याचें काहीं कारण नाहीं. तुम्हीं केलेल्या एकाद्या सत्कर्माची तुम्हाला आठवण असेल तर अजूनहि तुम्ही सागा. आम्ही त्याची नोद तुमच्या हिशेबांत करूं आणि त्याची जमा तुम्हाला देऊ."

"एका ब्राह्मणाला मीं गाय दान केलेली आहे. तें सत्कृत्य ह्या हिशेबांत मुळींच लिहिलें नाहीं!" पिलंभट म्हणाला.

"पण ती गाय म्हातारी आणि मरतुकडी होती," चित्रगुप्त म्हणाला. "तिच्यासाठीं त्या ब्राह्मणाला उलट भुर्दंड बसला."

"त्यासाठीं पाहिजे तर तुम्ही सांगाल ती शिक्षा मी भोगीन!" पिलभट

म्हणाला. "पण मीं ब्राह्मणाला गाय दान दिली त्या सत्कर्माचें फळ मला मिळायलाच पाहिजे."

यमाला पुष्कळ कामें होतीं. त्यानें विचार केला कीं ह्या भाडखोर माणसाच्या कशाला विनाकारण तोंडीं लागा !

तो म्हणाला, "ठीक आहे. तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें तुमचें तें पुण्यकर्म आम्ही मंजूर करतो. मग बोला, तुम्हीं केलेल्या पापाची शिक्षा आधीं तुम्ही भोगता का तुम्हाला त्या पुण्यकर्माचें बक्षीस आधीं पाहिजे ?"

पिलभट निर्लज्जपणें म्हणाला, "आधीं मला बक्षीस पाहिजे. मग मागून मी नरकात जाईन."

यम म्हणाला, "ठीक आहे. मग मी तुम्हाला बक्षीस हें देतों कीं तुमच्या मनात असेल ती इच्छा एक तासभर तुम्हाला पूर्ण करून घेता येईल. बोला, तुम्हाला काय पाहिजे ?"

पिलभट म्हणाला, "मला तुमचा रेडा पाहिजे आहे. त्याच्या पाठीवर बसून मला फेरफटका करून येण्याची इच्छा आहे."

यम हसून म्हणाला, "ठीक आहे. घेऊन जा या रेड्याला."

"पण महाराज, एक तासभर तरी ह्या रेड्यानें मी सागतों तें मुकाट्यानें ऐकलें पाहिजे." पिलंभट म्हणाला.

यम म्हणाला, "काहीं हरकत नाहीं." त्यानें रेड्याला सागितलें कीं, "एक तासभर तुझ्यावर ह्या पिलभटाची सत्ता राहील. त्या वेळात ते सांगतील तसें तुला वागलें पाहिजे."

रेडा म्हणाला, "ठीक आहे."

लगेच पिलंभट उडी मारून रेड्याच्या पाठीवर बसला आणि त्याची वेसण त्यानें हातात धरली.

"रेड्या, मी सागेन तसें तूं ऐकशील ना ?" पिलभटानें विचारलें.

"भटजीबुवा, तुम्ही आता बोलण्यात न् विचारण्यात वेळ घालवूं नका. तुम्ही आधीं मला आज्ञा द्या." रेडा अधीर होऊन म्हणाला.

पिलंभट म्हणाला, "ठीक आहे. मग आता असें कर. पहिल्या प्रथम तुझा मालक जो यम त्याच्या अंगावर तूं चालून जा. आणि तुझीं शिगे त्याच्या पोटांत खुपस !"

हे शब्द पिलंभटांनें उच्चारावयाचा अवकाश, त्याच क्षणीं शिंगें रोखून रेडा

यमावर चाल करून गेला. यमानें चपळाई केली अन् आपल्या आसनावरून ताडकन् उडी मारून तो पळाला म्हणून वाचला.

पिलभट रेडयाला म्हणाला, "बघतोस काय, चल त्याच्या पाठोपाठ."

त्याबरोबर रेडा चौखूर यमाच्या पाठीमागे धावत सुटला. यम पुढें पळतो आहे आणि रेडा शिंगे रोखून त्याच्या पाठीमागे धावतो आहे. शेवटीं यम जीव मुठींत घेऊन पळत पळत ब्रह्मलोकाला गेला. तेथे ब्रह्मदेव बसला होता.

यम ब्रह्मदेवाचे पाय धरून म्हणाला, "देवा, मला माझ्या रेडयापासून वाचवा."

इतक्यात मागून रेडयावर बसून पिलंभट तेथें येऊन ठेपलाच.

ब्रह्मदेव रेड्याला थोपवीत म्हणाले, "अरे, हो, हो—थाब, हें काय तूं चालविलं आहेस?"

पिलंभट म्हणाला, "विचारतोस काय? खुपस ब्रह्मदेवाच्या पोटांत शिंग!" त्याबरोबर रेडा ब्रह्मदेवाच्या अंगावर चाल करून गेला.

ब्रह्मदेव घाबरून एकदम पळत सुटला. त्याच्याबरोबर यमही पळूं लागला. अन् दोघाच्या मागून रेडा भरधाव धावूं लागला. धावत धावत यम नि ब्रह्मदेव कैलासात गेले आणि त्यानीं शंकराचे पाय धरले.

"महादेवा, वाचवा हो ह्या रेड्यापासून!" शंकराच्या पायावर लोळण घेत दोघांनींही टाहो फोडला.

शकर दोघानाही आश्वासन देत आहेत तोंच रेडा फू फूं करीत आणि डोळे गरागरा फिरवीत तेथें येऊन ठेपला. त्याचें ते भयकर स्वरूप बघून शकराच्या देखील छातींत धडकी भरली.

रेड्यानें पिलंभटाला विचारलें, "आता काय करायचें?"

पिलंभट म्हणाला, "विचारतोस काय? खुपस तिघाच्याही पोटात शिंग!"

त्याबरोबर रेडा तिघाच्याही अंगावर चालून गेला. शंकर, ब्रह्मदेव आणि यम ह्याना पळता भुई थोडी झाली.

तिघेहि देव धापा टाकीत विष्णुलोकामध्यें आले. आणि भगवान् विष्णूंचे पाय धरून ते म्हणाले, "देवा, आम्हाला वाचवा हो वांचवा!"

विष्णूनें विचारलें, "अरे, पण वाचवा कोणापासून?"

"त्या रेड्यापासून!" तिघेही देव मागे वळून बोटें दाखवीत म्हणाले. "त्या रेड्याचं आज डोकं फिरलं आहे."

इतक्यांत खवळलेला रेडा तेथें येऊन पोहोंचलाच. त्याच्या नाकातोंडातून फेस निघत होता.

त्याबरोबर चटकन् प्रसंग ओळखून विष्णूनें आपल्या हातामधलें चक्र त्याच्या अंगावर फेकलें. चक्र अंगावर येताच रेडा काय करणार ? तो मान खाली घालून मटकन् बसला. पिलभटही दाणकन् जमिनीवर आदळला. विष्णूनीं आपल्या दूताना त्या रेड्याला पकडून यमलोकीं नेण्याची आज्ञा दिली.

"बोला, आता तुम्हाला रेडयापासून भिण्याचें काहीं कारण नाहीं. काय भानगड आहे ?" भगवान विष्णूनीं शंकरांना विचारलें.

शंकर म्हणाले, "मला काहीं माहीत नाहीं. ब्रह्मदेवाला विचारा."

ब्रह्मदेव म्हणाले, "मलाही काहीं माहीत नाहीं. तुम्ही यमालाच विचारा."

यमाच्या अंगाचें अगदीं पाणी पाणी होऊन गेलें होतें. कपाळावरचा घाम पुशीत यमानें आरंभापासून सगळीं हकीकत सागितली आणि पिलभटाकडे बोट दाखवून तो म्हणाला, "ह्या माणसानें हा सारा उपद्व्याप केला."

तेव्हा विष्णु क्रुद्ध नजरेनें पिलभटाकडे पाहू लागले. पण पिलंभट शातपणें विष्णूसमोर उभा होता. विष्णु झाला म्हणून काय झालें ? पिलभट त्याला थोडाच भिणार ?

विष्णूनें आपल्या दूताना सांगितलें, "जा या माणसाला नरकात घेऊन ! आणि तेथें त्याला उकळत्या तेलाच्या कढईत टाका !" त्याबरोबर दूत एकदम पिलभटाच्या अंगावर धावून आले.

पिलंभट त्यांना थोपवीत विष्णूला म्हणाला, "देवा, तुम्हांला असें करणें शोभत नाहीं. प्रत्येक प्राणिमात्राचें रक्षण करणें हें तुमचें कर्तव्य आहे. मी तुमच्या आश्रयाला इथें आलो आहें. मला तुम्हीं अभयदान द्यावयाचें सोडून नरकात पाठवता ? हें तुमच्या लौकिकाला शोभतें का ? आजपर्यंत किती तरी लोक तुमच्याकडे मदतीसाठीं धावत आलेले आहेत. मला काय माहीत नाहीं का ? मी देखील तुमचें पुराण वाचलें आहे. ह्या सर्व शरणागताना काय तुम्ही नरकांत परत पाठवून दिलें ? देवा, विनाकारण मला कडक बोलायला लावूं नका. नीट विचार करून तुम्हांला माझ्याबाबत काय करायचें तें करा."

पिलंभटाचे ते उद्गार ऐकून भगवान् विष्णु एकदम नरम पडले. ते म्हणाले, "मग तुमचें म्हणणें काय आहे ?"

"माझें म्हणणें एवढेंच कीं, ह्या तीन देवांना तुम्ही येथून हाकून द्या आणि

मला आपल्याजवळ कायमचें ठेवून घ्या!" पिलंभट म्हणाला.

पिलंभट विष्णुलोकामध्यें आल्यामुळें त्याच्यावर शंकर, ब्रह्मदेव आणि यम ह्याचा अधिकार मुळीं चालतच नव्हता. तेव्हा ते देखील मनातल्या मनांत चरफडतच होते.

विष्णूनीं त्याना आपापल्या लोकीं परत जावयाची विनंति केली आणि ते म्हणाले, "शरणागताला अभयदान देणें हें माझे ब्रीद असल्यानें मला ह्या माणसाला स्वर्गलोकात राहून घेतल्यावाचून आता उपायच उरला नाहीं!"

अशा रीतीनें जन्मभर अनत पापे करून सुद्धा आपल्या बुद्धीच्या बळावर पिलंभटानें शेवटीं स्वर्गामध्यें जागा पटकावली!

* * *

## १४ जांवई बापू

मोरया जन्माला आला आणि त्याचे वडील वारले. तरी पण तो आईचा एकुलता एक मुलगा होता. म्हणून आईनें त्याला फार लाडात वाढविलें. मोरया पहिल्यापासूनच अर्धवट होता. त्याच्या डोक्यात अक्कल घालायला देव विसरला कीं काय कोणास ठाऊक! कोणाशीं कसें वागावें किंवा कोणाशीं कसें बोलावें हें त्याला मुळीं कळतच नसे. त्यामुळें त्याला बाहेर कुठे पाठवायची सोय नसे. आळींतली मुलें त्याच्या मागे लागत आणि त्याची हुर्रे करीत. म्हणून त्याला आईनें शाळेतच पाठविले नाहीं. ती म्हणे, "माझ्या मोरयाला काहीं कमी नाहीं. त्याला काय करायचंय शिकून?" घर सोडून मोरया कुठे बाहेर जात नसे. घरात बसून तो चांगला 'गुळाचा गणपति' बनला.

पुढें आईनें त्याचें लगीन केलें. बायको मिळाली म्हणून मोरयाला फार आनंद झाला. दिवाळीला त्याला सासुरवाडीहून बोलावणें आलें.

मोरया म्हणाला, "आई, आई, मी एकटा कसा ग जाऊं बायकोच्या घरीं? तू चल कीं माझ्याबरोबर."

आई म्हणाली, "मोरया, अरे, आता तूं लहान नाहींस. जांवई आहेस. जांवयानें एकटेंच जायचें असतें सासुरवाडीला."

आईनें समजूत घातली तेव्हा मोरया तयार झाला सासुरवाडीला जायला. पण सासऱ्याच्या घरीं गेल्यावर मोरया कसा वागेल याची आईला फार काळजी पडली. म्हणून जाताना आईनें मोरयाला अगदीं बजावून बजावून सांगितलें, "मोरया, मी सांगतें तें नीट ध्यानात धर. अन् तसें वाग. कोणी भेटलें तर पहिल्यानें आपण त्याचें नाव विचारावें. मग त्याच्या बापाचें नांव पुसावें आणि मग आजोबाचें नांव. एवढें विचारून झाल्यावर मग विचारावें, 'तुमचें लग्न झालें आहे का? तुम्हाला मुलेंबाळें किती आहेत?' बोलायला विषय

सुचला नाहीं तर आजूबाजूला बघावें अन् जें दिसेल त्याची माहिती विचारावी. खाली जमिनीवर बसूं नये. उचावर बसावें. बायकामाणसाशीं बोलायचें असल्यास मोठ्यानें बोलूं नये. अगदीं कोमल आणि मधुर आवाजात बोलावें. फार खाऊ नये. पुष्कळदा तर नकोनकोच म्हणावें. स्वयपाकाची फार स्तुति करूं नये. म्हणावें, 'माझी आई मला रोज असेंच खाऊं घालते.' जेवणांत एकादा चागला जिन्नस आढळला तर त्याचें नाव नीट ध्यानांत धरून ठेव अन् परत आल्यावर मला साग."

मोरया म्हणाला, "आई, तूं मुळींच काळजी करू नकोस. अगदीं जसें सागितलेंस तसा वागेन. सासुरवाडीची सारी मडळी खूष होऊन माझी पाठ थोपटतील. म्हणतील, 'शाबास जावईबापू'!"

दुसऱ्या दिवशीं दुपारीं मोरया सासुरवाडीला निघाला. सासुरवाडीचें गांव काहीं फार लाब नव्हतें. अवघें दोन कोस. संध्याकाळचे आंत मोरया तेथें पोंचला. सासरा दारातच उभा होता. जावईबापूना बघून त्याना फार आनद झाला.

त्यानीं हसून विचारलें, "काय जावईबापू, प्रकृति ठीक आहे ना?"

कोणीही माणूस भेटला कीं त्याच्याशी कसें बोलावें हें आईनें मोरयाला सागून ठेवलें होते; त्याची त्याला आठवण झाली. सासऱ्यानें विचारलेल्या प्रश्नाला उत्तर द्यायच्या ऐवजीं मोरयानेंच त्याना उलट विचारलें, "आपलें नाव काय? आपल्या वडिलाचें नाव काय? आपल्या आजोबाचें नाव काय?"

मोरयाचे ते प्रश्न ऐकून सासरा चकित झाला. त्याला वाटलें कीं जावई-बापूनीं आपल्याला ओळखलेलें दिसत नाहीं. तो म्हणाला, "अहो, असं काय करता जावईबापू! मी तुमचा सासरा नव्हे का?"

"तें मला सागू नका!" मोरया म्हणाला, "तुमचें नाव काय आहे तें आधीं सागा."

सासऱ्याचा नाइलाज झाला. तो न उत्तर देऊन काय करतो? "माझं नाव रामचंद्र." सासरा म्हणाला.

"बापाचें नाव?" मोरयानें लागलेंच विचारलें.

"गणेश." सासरा उत्तरला.

"आजोबाचें नाव?" मोरयानें विचारलें.

"शकर." सासरा म्हणाला.

"ठीक." मोरया मान हलवीत म्हणाला. "आतां हें सागा कीं तुमचें

लग्न झालें आहे का?"

तो प्रश्न ऐकून सासरा मोरयाच्या तोंडाकडे पहातच राहिला.

"म्हणजे काय? माझें लग्न झालें नसतें तर तुमचें माझ्या मुलीबरोबर लग्न झालें असतें का? अन् तुम्ही माझे जावईबापू झालां असतां काय?"

मोरया म्हणाला, "तें काहीं मला सांगूं नका. मी विचारतों आहें त्याला मुकाट्यानें उत्तर द्या. माझा प्रश्न अगदीं सरळ आहे. बोला, आपलें लग्न झालें आहे का?"

"होय, झालें आहे." सासरा मनांतल्या मनांत चरफडत म्हणाला.

"बरें, काहीं मुलेंबाळें?" मोरयानें विचारलें.

"होय, एक मुलगी अन् तीन मुलगे." सासरा संतापून म्हणाला.

त्यानतर पुढें काय बोलायचें तें मोरयाला कळेना. तो थांबला. तेव्हां आईनें सागितल्याप्रमाणें त्यानें आजूबाजूला पाहिलें. घराच्या शेजारून एक नदी वाहात होती. तिच्याकडे बोट करून मोरयानें विचारलें, "ही नदी कुठें वाहात जाते?"

सासरा म्हणाला, "ही नदी कुठें का वाहात जाईना. तुम्ही आधीं घरांत चला."

मोरया म्हणाला, "मी विचारतों आहें त्या प्रश्नांचीं उत्तरें मिळाल्यावांचून मी घरांत येणार नाहीं. बोला, नदी कुठें वाहात जाते?"

"समुद्राकडे!" सासऱ्यानें उत्तर दिलें.

"बरें, पण काय हो, ही नदी खोदली कोणीं?" मोरयानें विचारलें.

"परमेश्वरानें खोदली!" सासरा म्हणाला, "दुसरें कोण खोदणार?"

"असें काय? पण काय हो, परमेश्वरानें जर नदी खोदली, तर त्या खोदलेल्या मातीचें काय झालें?"

तो प्रश्न ऐकून मात्र सासऱ्याचें डोकें फिरलें. तो चिडून म्हणाला, "काय व्हायचेंय? त्यांतली निम्मी माती माझ्या बापजाद्यांनीं खाल्ली अन् निम्मी माती तुमच्या बापजाद्यांनीं खाल्ली!"

"असें कसें होईल?"

"कां नाहीं होणार?"

"याला पुरावा काय?"

"पुरावा तुम्ही आणि मी. तुमच्या बापजाद्यांनीं माती खाल्ली म्हणून

त्यांच्या वंशांत तुमच्यासारखें रत्न जन्माला आलें. आणि आमच्या बापजाद्यांनीं माती खाल्ली म्हणून माझी सोन्यासारखी मुलगी तुम्हाला देण्याची बुद्धि मला झाली."

मोरया आणखी कांहीं प्रश्न विचारणार होता. पण सासऱ्यानें नोकराला हाक मारली आणि 'जावईबापूना खोलीकडे घेऊन जा' म्हणून सागितलें.

तेव्हां मोरयाला नोकराच्या मागून जाणें भागच पडलें. मोरयाला खोलींत सोडून नोकर निघून गेला. जावयासाठी खोली छानदार सजविली होती. एका बाजूला सुरेखशी बैठक घातली होती. दुसऱ्या बाजूला एक पलंग होता. आणि कपडे ठेवण्यासाठीं कोपऱ्यांत एक लाकडी कपाट होतें.

मोरयानें खोली नीट न्याहाळून पाहिली. आणि कुठें बसावयाचें याचा तो विचार करूं लागला. आईनें त्याला सागितलें होतें कीं खालीं जमिनीवर बसू नये. उचावर बसावें. तेव्हां बैठकीवर बसण्याचा मुळीं प्रश्नच नव्हता. खोलीत पलंग आणि कपाट एवढ्याच दोन उंच गोष्टी होत्या. पलंगापेक्षा कपाट उंच म्हणून मोरया खुंटीला धरून मोठ्या कष्टानें वर चढला. आणि खाली पाय लोंबकळत ठेवून आपला कपाटावर बसला.

संध्याकाळ झाली. नोकरानें दिवा आणून खोलींत ठेवला. त्याला जावई कुठें दिसलेच नाहींत. त्याला वाटलें कीं, गेले असतील कुठें बाहेर हिंडायला. मोरया आपला गुपचुप कपाटावर बसून होता.

जेवायला बोलावण्यासाठीं सासूबाई हसत हसत दाराशीं आल्या. आणि डोकावून म्हणाल्या, "म्हटलं, जेवायचं वाढलंय."

तेव्हां मोरया कोकिळेसारखा वरून ओरडला, "कुऊऽऽ! कुऊऽऽ!"

आईनें त्याला सांगितलें होतें ना, कीं बायकामाणसांशीं कोमल आणि मधुर आवाजांत बोलावें. म्हणून मोरयानें मनांत विचार केला कीं, कोकिळेपेक्षां अधिक मधुर आणि कोमल आवाज कोणाचा आहे ?

सासूबाईंनीं चमकून वर पाहिलें, तों जांवईबुवा कपाटावर बसून "कुऊऽऽ कुऊऽऽ" करताहेत. सासूबाई घाबरल्या. त्यांना वाटलें, आपल्या जांवई-बापूंना वेडबीड तर लागलें नाहीं ना ? त्या घाबरून स्वयंपाकघरांत पळाल्या.

मोरयाला भूक लागली होती. तो कपाटावरून खालीं उतरला, आणि कपडे काढून जेवायला आंत गेला. सासुरवाडीला जावईबापू पहिल्यानेंच आले होते म्हणून त्यांच्या जेवणाचा खूपच थाट केला होता. जांवयांना बसायला आणि

टेकायला छानदार रंगीत पाट ठेवले होते. समोर उदबत्त्या लावल्या होत्या.

त्याच्या शेजारीं त्याच्या तीन मेहुण्यांचीं पानें ओळीनें मांडलीं होतीं. सासरे रात्रीचे जेवत नसत. आणि शिवाय त्यांना जांवयाचें तोंड पाहायची इच्छाही पण नव्हती. म्हणून स्वयंपाकघरांत यायचें त्यानीं टाळलेंच. जांवईबापूंना बघायला त्यांच्या बायकोच्या मैत्रिणीही पण आल्या होत्या. त्या एका कोपऱ्यांत दाटीवाटीनें लाजून उभ्या होत्या.

थोरल्या मेहुण्यानें मोरयाला हातानें धरून मोठ्या आदरानें त्याच्या पाटावर बसविलें म्हणून ठीक झालें. कारण मोरयाला रात्रीचें दिसत नसे. तो रातांधळा होता. ही गोष्ट सासुरवाडीच्या लोकांना मुळीं माहीतच नव्हती.

सासूबाईनीं जावईबुवांसाठीं अनेक स्वादिष्ट पक्वान्नें केली होतीं. पण त्या वाढायला गेल्या कीं आईनें सागितल्याप्रमाणें मोरया मोठ्यानें 'नको–नको' म्हणायचा. त्यामुळें सासूबाईंचा फारच विरस होई. तरी पण अळेंबळें त्याच्या ताटात एकादा तरी जिन्नस त्या वाढीत.

मोरयाला भूक खूपच लागली होती. पण आईनें त्याला सांगितलें होतें कीं फार खाऊं नये. म्हणून वाढलेल्या जिनसांपैकीं एकादा-दुसराच तुकडा तो तोंडांत टाकी.

सासूबाईला वाटलें कीं, जावईबापूंना आपला स्वयपाक कांहीं आवडलेला दिसत नाहीं. त्यानीं भीत भीत विचारलें, "जांवईबुवा, साखरभात कसा झाला आहे?"

तेव्हा आईनें शिकवल्याप्रमाणें मोरया म्हणाला, "बरा आहे. माझी आई रोज मला साखरभात खाऊं घालते."

"अन् नारळीपाकाच्या वड्या तुम्ही खात नाहीं ते?" शेजारीं बसलेला मेहुणा म्हणाला.

ताटांत काय वाढलेलें आहे तें मुळीं मोरयाला दिसतच नव्हतें. त्यानें अजमासानें कांहीं तरी उचललें अन् तोंडांत घातलें. त्याला तें आवडलें.

'हीच नारळीपाकाची वडी दिसते आहे—' मोरया स्वतःशींच म्हणाला. अन् आईनें सांगितल्याप्रमाणें तो मनांतल्या मनांत 'नारळीपाक, नारळीपाक' असें तें नांव पाठ करूं लागला.

इतक्यांत एक मांजर आलें, अन् मोरयाच्या ताटांतले जिन्नस खाऊं लागलें. मोरयाला तें दिसलेंच नाहीं. तेव्हां सारी मंडळी गालांतल्या गालांत हसूं लागली.

शेवटीं धाकट्या मेव्हण्याला राहवलें नाहीं. तो मोठ्यानें म्हणाला, "जांवईबापू, अहो, माजर ताटातलें खातें आहे ना?"

तेव्हां मोरयाच्या तें लक्षात आलें. तो म्हणाला, "थांबा, त्याला असा धडा शिकवतों कीं, पुन्हा तें कोणाच्या ताटांतलें खाईल कीं नाहीं—"

मोरयानें आपला खरकटा हात वर उगारला. अन् माजराला कसें मारावयाचें याचा तो विचार करूं लागला. एवढ्यात सासूबाई काहीं तरी वाढायला म्हणून आल्या. अन् खालीं वाकून वाढूं लागल्या. मोरयाला वाटलें कीं, तें मांजरच आलें.

अंगांत होता नव्हता तेवढा जोर एकत्र करून मोरयानें माजराला मारण्यासाठीं म्हणून जी थप्पड लगावली, ती जोरानें सासूबाईच्या गालफडात बसली अन् सासूबाई एकदम किंचाळून खालीं पडल्या. अन् त्यांच्या हातांतलें भाडें कुठल्या कुठें उडालें.

त्याबरोबर मोरयाचे तिवेही मेहुणे संतापून उठले आणि आपल्या खरकट्या हातांनीं त्यांनीं मोरयाला बद्‌ड बद्‌ड बद्‌डलें. मोरया मोठमोठ्यानें ओरडूं लागला. आपल्याला हे कां मारतात हेंच मुळीं त्याच्या लक्षात येईना.

शेवटीं सासूबाईनाच त्याची दया आली आणि त्याच त्याच्या मदतीला धावल्या. आपल्या मुलांना आवरीत त्या म्हणाल्या, "प्रवासांत उन्ह फार फार लागलें म्हणून त्यांचें डोकें थोडेंसें फिरलें असेल झालें. होतें कधीं कधीं असें माणसाला. चला, व्हा बाजूला."

पण त्यानंतर जेवणाचा विरसच झाला. मेहुणे उठून बाहेरच गेले. मोरया आपला पाटावर तसाच एकटा बसून राहिला. तो कांहीं बोलेना आणि जेवीना.

तेव्हां सासूबाईना वाटलें कीं जांवईबापू रागावले. म्हणून त्या त्याची समजूत काढूं लागल्या, "मघाशीं जें काहीं झालें तें मनाला लावून घेऊं नका. मी त्याबद्दल तुमची क्षमा मागतें."

असें म्हणून सासूबाईनीं मोरयाला हातांनीं धरून उठविलें. आणि त्याच्या हातावर पाणी घालून त्याला आपल्या खोलीत नेऊन पोहोचविलें.

पलंगावर पडल्यावर मोरयाला ताबडतोब झोप लागली. दिवसभर त्याला प्रवासाचे श्रम झाले होते. आणि जेवतांना मेहुण्यांच्या हातचा मारहि त्यानें खाल्ला होता. पण पहिली झोप संपल्यानंतर तो एकदम जागा झाला.

त्याला शौचाला लागली. पण शौचकूप कुठें आहे हें त्याला माहीत नव्हतें.

शिवाय बाहेर काळाकुट्ट अंधार होता. काळोखांत त्याला कांहींच दिसत नव्हतें.

तो पलंगावरून उठला अन् हातानीं जमीन चापसूं लागला. तोंच त्याला एक लांबलचक दोरी मिळाली. तेव्हा त्याला फार आनंद झाला. त्यानें दोरीचें एक टोक पलगाच्या एका पायाला बाधलें. अन् दुसरें स्वतःच्या कमरेला बांधलें. आणि तो भिंतीला धरून हळूहळू कसा तरी खोलीच्या बाहेर पडला.

बाहेर अंगण होतें. त्याला वाटलें कीं अंगणाच्या दुसऱ्या टोकाला शौचकूप असेल. म्हणून तसाच तो अंधारात हलकेहलके समोर जाऊं लागला. वाटेंत गोठा होता. त्यांत एक बैल बांधला होता. मोरयाला काहीं बैल दिसलाच नाहीं. मोरयाचा धक्का लागतांच बैलानें आपल्या शिंगांनीं त्याला जी ढुसणी मारली, तों मोरया चार हात कोलमडत गेला, आणि शेजारीं एक आड होता त्या आडांत जाऊन पडला.

पण त्याच्या कमरेला दोरी बांधलेली होती. म्हणून तो खालीं पाण्यांत न पडतां मध्येंच लोंबकळत राहिला. मोरयाच्या वजनानें दोरीला जसजसा ताण बसूं लागला, तसें तिचें दुसरें टोक ज्या पलंगाला बाधलें होतें तो पलग हळूहळू सरकून बाहेर येऊं लागला. त्याच्या आवाजानें सासूबाई जाग्या झाल्या. त्यांना वाटलें, जांवईबापूंच्या खोलींत कोणी चोरबीर शिरला कीं काय?

दिवा लावून त्या पाहूं लागल्या. तो पलंग हळूहळू खोलीतून बाहेर येतो आहे अन् पलंगावर जावईबापू काहीं नाहींत. तेव्हा 'भूत! भूत!' म्हणून त्या मोठ्यानें ओरडल्या. घरातली सर्व मंडळी जागी झाली आणि तेथें धावली. चालत्या पलंगाचा तो चमत्कार बघून सर्वांची खात्री झाली कीं, हा काहीं तरी भुताटकीचा प्रकार आहे. आणि कोणी तरी भुतानेंच जांवईबापूंना पलंगावरून नेलें असावें. सासूबाई तर छाती पिटून मोठमोठ्यानें रडूं लागल्या.

इतक्यांत पलंगाच्या पायाला बाधलेल्या दोरीकडे एका मेहुण्याचें लक्ष गेलें, आणि त्या दोरीला दुसऱ्या बाजूनें हिसके बसताहेत हेही त्याला दिसलें. तेव्हा त्या दोरीच्या अनुरोधानें तो अंगणातल्या आडापर्यंत गेला आणि आंत डोकावून पाहूं लागला. तों आत दोरीच्या दुसऱ्या टोकाला जांवईबापू लोंबकळत आहेत.

मग सगळी मंडळी आडाकडे धावली. आणि सर्वांनीं मिळून जावईबापूंना आडांतून बाहेर ओढून काढलें. तो मोठ्या भीतीनें जवळजवळ अर्धमेलाच झाला होता. त्याला शुद्धीवर यावयाला पुष्कळच वेळ लागला. सासूबाईना वाटलें कीं, आधल्या रात्रीं आपल्या मुलांनीं जांवईबापूना मारलें, म्हणून त्यांनीं आत्महत्या

करण्याचा प्रयत्न केला असावा.

सासरा म्हणाला, "जांवईबापू येऊन एक दिवस झाला नाहीं, तो त्यानें घरांत एवढा गोंधळ उडवून दिला. तेव्हां दिवाळी होईपर्यंत त्याला घरांत ठेवून घेतलें तर घराचें दिवाळेंच वाजायचें!"

तेव्हां सासू-सासऱ्यांनीं दुसऱ्या दिवशींच जांवईबापूंची रवानगी केली.

दुपारचें जेवण आटोपून मोरया आपल्या गांवीं जायला निघाला. आधल्या रात्रीप्रमाणें दुपारच्या जेवणाच्या वेळींही सासूबाईनीं नारळीपाकाच्या वड्या केल्या होत्या. मोरयाच्या आईनें सांगितलें होतें कीं सासुरवाडीला एकादा चांगला पदार्थ मिळाला तर त्याचें नांव लक्षांत ठेव अन् परत आल्यावर मला सांग.

त्याप्रमाणें रस्त्यानें चालतां चालतां 'नारळीपाक-नारळीपाक' असें घोकत घोकत मोरया चालला. संध्याकाळचे वेळीं तो गांवाजवळ पोहोंचला. गांवाबाहेर एक तळें होतें. त्यांत हात-पाय-तोंड धुण्यासाठीं तो थाबला. पण तोंड धुतां धुतां 'नारळीपाक' हा शब्द तो एकदम विसरला. त्यानें आठवण्याचा खूप प्रयत्न केला. पण त्याला काहीं केल्या तो शब्द आठवेना.

'पडलें रे पडलें!' तळ्याच्या कांठीं बसून मोरया मोठमोठ्यानें हंबरडा फोडून रडूं लागला. रस्त्यानें जाणाऱ्या-येणाऱ्या लोकांना वाटलें, कीं या माणसाची कांहीं तरी मौल्यवान् वस्तु तळ्यामध्यें पडली असावी म्हणून हा रडतो आहे.

तेव्हां कपडे काढून ते तळ्यामध्यें उतरले, आणि शोधूं लागले. इतक्यांत पलीकडे एक नारळीचें झाड होतें. त्यावरचा एक नारळ धपकन् खालीं पडला. तो बघून मोरयाला 'नारळीपाक' शब्द एकदम आठवला.

त्याबरोबर 'सांपडलें रे सांपडलें!' असें म्हणून मोरयानें एकदम आनंदानें उडी मारली आणि तो गावाच्या रस्त्यानें धावत सुटला.

तळ्यांत उतरलेलीं माणसें मोरयावर खूपच रागावलीं. आम्हीं याच्यासाठीं एवढी खटपट केली आणि आम्हांला बक्षिशी न देतां तसाच पळून जातो आहे म्हणजे काय? तींही मोरयाला पकडण्यासाठीं त्याच्यामागून धावूं लागली.

एवढ्यांत संध्याकाळ झाली. अंधार पडला. मोरयाला दिसेनासें आलें. वाटेंत एक गाढव उभे होतें. मोरयाच्या हाताला त्याचें शेपूट लागलें. त्यानें तें घट्ट आवळून धरलें. त्याबरोबर गाढव एकदम पळत सुटलें. पण मोरयानें

त्याचें शेपूट सोडलें नाहीं.

मागून माणसें धावत येत होतीं. त्यांच्या गलग्यानें तर गाढव आणखीनच जोरानें पळूं लागलें. रस्त्यावर आदळून आदळून मोरयाचे कपडे फाटले आणि अंग रक्तबंबाळ झालें.

धावत धावत गाढव गांवांत शिरलें. गावांतल्या लोकाना ती मौजच वाटली. ते मोठमोठ्यानें आरोळ्या ठोकीत त्याच्याभोवतीं जमा झाले. हा कसला एवढा गलगा आहे हे पाहावयाला मोरयाची आईही बाहेर आली. पाहते तों गाढवाच्या शेपटाला मोरया लोंबकळतो आहे.

लोकांना सांगून आईनें गाढव थांबविलें. आणि मोरयाला सोडवून ती घरीं घेऊन आली. मोरयाचें सर्वांग ठणकत होतें. गुडघे अन् पाय रक्तबंबाळ झाले होते. आईनें त्याला औषधपाणी केलें आणि अंथरुणावर नेऊन नीट निजविलें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मोरया आईला म्हणाला, "आई, मी सासुरवाडीला पुन्हा कधीं जाणार नाहीं. मला नको जा बायको!"

* * *